


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)





महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

सदर प्रकल्पांतर्गत महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे ह्या संस्थेद्वारे प्रकाशित करण्यात येणाऱ्या महाराष्ट्र साहित्य पत्रिका ह्या नियतकालिकाच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात उपरोक्त संस्थेला आवाहनपर विनंती करण्यात आली होती.

सदर विनंती मान्य करून महाराष्ट्र साहित्य परिषदेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. हे अंक सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.
वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर/ संस्थांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका








३९३५

वार्षिक वर्गणी ४-८ ट. ह. सह

फुटकळ अंकास

महाराष्ट्र-साहित्य-परिषदेमार्फत प्रसिद्ध होणारी

# महाराष्ट्र-साहित्य-पत्रिका.

वर्ष २ रें.] वर्षप्रतिपदा शके १८५१ [अंक १ ला.

सह वीर्यं करवावहै । तेजस्वि नावधीतमस्तु ॥

## अनुक्रमणिका



एप्रिल १९२९







# रुद्र व कुबेर

( लेखकः-मुकुंद कृष्ण मोडक, बी. ए. )

प्राचीन वैदिक ग्रंथांतील शब्दांचे अर्थ निश्चित करणें हें महत्त्वाचें असलें तरी फार कठीण काम आहे. त्यांतहि एकाच शब्दाचे अनेक अर्थ होत गेल्यामुळें हें काठिण्य विशेषच भासमान होतें. उ० असुर व दैत्य हे शब्द घ्या; ह्यांचीं तीन तीन रूपें झालीं. अगदीं सृष्ट्युत्पत्तीच्या आरंभीं तुफानी समीरणांस ही संज्ञा लावीत. पुढें अंधःकारास लावीत. यानंतर अनार्य रानटी जातींस ही संज्ञा प्राप्त झाली. त्याचप्रमाणें रुद्र देवतेचींहि तीन रूपें झालीं. अगदीं प्रथम वेदकाळीं 'शंकर' हा ज्वालामुखी हिमालय होता. यास 'रुद्र' म्हणत. पुढें तो थंड पडून हिमालयपर्वतच राहिला व पुढें हल्लींची लिंगपूजा आली. वस्तुतः रुद्र ( शंकर ) ही देवता दुसरें तिसरें कांहीं नसून पेटता असलेला ज्वालामुखी (काराकोरम बाजूकडील हिमालय) होय.

आतां रुद्र म्हणजे ज्वालामुखी या अर्थानें कोठें कोठें आधार मिळतो तो पाहूं.—

या ज्वालामुखीच्या वारंवार स्फोटानें प्रजा अगदीं हैराण झाल्या. या रुद्राचा ऊर्फ ज्वालामुखीचा आपणांवर रोष होऊं नये म्हणून पुढील स्तुति आढळते—

'मा नो महान्तमुत मा नो अर्भकं मा न उक्षंतमुत मा न उक्षितम् ।
मा नो वधीः पितरं मोत मातरं मा नः प्रियास्तन्वो रुद्र रीरिषः ।
मा नस्तोके तनये मा न आयौ मा नो गोषु मा नो अश्वेषु रीरिषः ।
वीरान्मा नो रुद्र भामितो वधीर्हविष्मंतः सदमित्त्वा हवामहे ॥ ऋ. मं. १.११४.६,७.

याचा सारांश— 'हे रुद्रा, आमचे वृद्ध लोक — आमचे कच्चे बच्चे — आमचे आईबाप यांचा नाश करूं नको. आमचीं गुरेंढोरें — आमचे वीरपुरुष — यांचा नाश करूं नको. आम्ही हवियुक्त तुला नेहमीं ( कृपा करण्यासाठीं ) बोलावीत आहों.' यावरून ज्वालामुखीनें नवीनच झालेल्या सृष्टींत किती कहर केला होता हें स्पष्ट होतें. हिमालय हा पूर्वीं ज्वालामुखी असला पाहिजे हें यावरून स्पष्ट होतें. या ज्वालामुखींतून उडणारी राख हेंच त्याचें भस्म होय. यास चिताभस्महि म्हणतात.— उघडच आहे— सर्व सृष्टजात जाळून खाक करणाऱ्या लाव्ह्याची राख ही चिताभस्मच म्हणावयाची. रुद्राचा उल्लेख नरमुंडधारी असाहि करतात. उघडच आहे— याच्या स्फोटाच्या अनर्थानें ही देवता संहारक ठरली. आणखी स्तुति—

'इमा रुद्राय तवसे कपर्दिने क्षयद्वीराय प्रभरामहे मतीः ।
यथा शमसद्द्विपदे चतुष्पदे विश्वं पुष्टं ग्रामे अस्मिन्ननातुरम् ॥' ऋ. मं. १.११४,१

सारांश– 'वीरांचा नाश करणाऱ्या हे देवा तुझी आम्ही मननीय स्तुति करितों. आमच्या स्तुतीनें आमचे लोक–आमचीं गुरेंढोरें यांचा नाश न होईल असें कर.' इत्यादि.

'मृळा नो रुद्रोत नो मयस्कृधि क्षयद्वीराय नमसा विधेम ते ।
यच्छं च योश्च मनुरायेजे पिता तदश्याम तव रुद्र प्रणीतिषु ॥' ऋ. मं. १.११४.२

सारांश– 'हे वीरनाशका रुद्रा तुला प्रणिपात असो. मनूनें जें सुख, भयराहित्य आम्हांस दिलें तें तुझ्या कृपेनें आम्हांस (पुन्हा) प्राप्त होवो.' इत्यादि.

यावरून सृष्ट्युत्पत्तीसमयीं असलेली सुखस्थिरता वगैरेंत ज्वालामुखी जो हिमालय त्याच्या स्फोटांनीं अनर्थ उडवून दिला होता हें उघड आहे.

या रुद्राचा ऊर्फ ज्वालामुखीचा लाव्हा ( तप्त रस ) व तापलेले दगड यांचा उल्लेख पुढील उताऱ्यांत दिसतो—

'आरे ते गोघ्नमुत पूरुषघ्नं क्षयद्वीर सुम्नमस्मे ते अस्तु' ऋ. मं. १.११४.१०

याचा सारांश– 'हे वीरनाशका रुद्रा तुझें गोघ्न– गोहननसाधनाचें आयुध (म्हणजे लाव्हा), पुरुषहननसाधनाचें आयुध हीं आमच्यापासून लांब देशांत असोत' इत्यादि.

गोघ्न याचा अर्थ केवळ गुरांढोरांचें विध्वंसक असा न घेतां आम्ही जमीनहारक असा घेतों. गो शब्दाचे स्त्रीलिंगांत अनेक अर्थ आहेत. त्यांत भूमि असाहि आहे. गोरक्षण म्हणजे हल्लीं प्रचलित असलेला गाईचें रक्षण एवढाच अर्थ नसून भूमीचें रक्षणहि असावा असें वाटतें. धेनुहरणाच्या कथा एखाद्या इसमाची जमीन हिरावून घेतल्यामुळें उपस्थित झालेल्या कलहांसंबंधीं असाव्यात असें वाटतें. धेनूबरोबर वत्सहि नेल्याचें कथेंत आहे. धेनू म्हणजे भूमि तर वत्स म्हणजे तिजवरील उभें पीक. तेंहि कापून नेण्यांत आलें असावें. कर्णाच्या कथेंतहि गौः = जमीन या अर्थासच पुष्टि मिळते. कथेंत म्हटलें आहे कीं कर्णानें एकदां एका ब्राह्मणाच्या गाईस नकळत इजा केली; त्यावर त्यानें क्रुद्ध होऊन 'भूमि आयत्या वेळीं तुझें चाक गिळील' असा शाप दिला. येथें धेनू म्हणजे गौ म्हणजे गाय असा अर्थ घ्यावा तर शाप भूमीसंबंधीं कां? ही उपपत्ति जमत नाहीं. याचा उलगडा असा आहे कीं, कर्णानें गाय वगैरे मारिली नसून कोणाच्या तरी सुपीक जमिनीवर बेदरकारपणें रथ हांकून उभ्या पिकांची नासाडी केली. तेव्हां शाप असा झाला असला पाहिजे.— "कर्णा, ज्या मूल्यवान जमिनीवरून तूं बेदरकारपणें रथ चालवून पिकांची नासाडी केलीस तीच जमीन ऐन आणीबाणीच्या वेळीं तुझ्या रथाचें चाक गाडून टाकील." या विवेचनानें धेनुहरण = जमिनीचा अपहार हें स्पष्ट होतें. असो तर जमीनहारक लाव्हा व पुरुषमारक तापलेले दगड हीं शंकराचीं आयुधें ठरतात. आणखी—

'परि णो हेती रुद्रस्य वृज्याः परि त्वेषस्य दुर्मतिर्मही गात्' —ऋ. मं. २.३३.१४

याचा सारांश–'रुद्राच्या आयुधानें आम्हांस वर्जावें. तसेंच पेटलेल्या रुद्राची दुःख-

कारिणी बुद्धि आम्हास सोडून दुसरीकडे जावो' येथें 'पेटलेला रुद्र' म्हणजे दुसरें तिसरें कांहीं नसून 'भडकलेला ज्वालामुखी' हेंच होय. आणखी ऋचा—

'स्तुहि श्रुतं गर्तसदं युवानं मृगं न भीममुपहत्नुमुग्रं ।
मृळा जरित्रे रुद्र स्तवानोऽन्यं ते अस्मन्नि वपंतु सेनाः ॥' —ऋ. मं. २.३३.११

ही रुद्राच्या स्तुतिपर ऋचा आहे. यांत 'गर्तसदं रुद्रं' या शब्दांचा अर्थ उघड आहे. 'गर्त' म्हणजे 'खड्डा' यांत बसणारा देव म्हणजे खोल तोंडाचा ज्वालामुखीच होय! हा सरळ अर्थ सोडून सायणाचार्यांनीं गर्तेचा रथ अर्थ करून या 'खड्ड्यांतल्या देवास' कसेंबसें रथांत बसविलें! पण हा अर्थ येथें अप्रस्तुत आहे. हैमकोशांत शंकरास 'महाव्रती वह्निहिरण्यरेताः शिवोऽस्थिधन्वा पुरुषास्थिमाली' असें म्हटलें आहे. 'वह्निरेता' म्हणजे ज्या ज्वालामुखीच्या कुहरांत तापलेला रस सळसळत आहे तो. 'त्र्यंबकं यजामहे सुगन्धि'— यांत 'सुगन्धि' म्हणजे 'गंधकाचा वास येणारा' होय. ज्वालामुखीच्या प्रदेशांत गंधक (Sulphur) हें विपुल असावयाचेंच. यास कोठें 'पंचवक्त्र' तर कोठें 'त्रिनेत्र' म्हटलें आहे. यावरून या ज्वालामुखी हिमाचलाचीं लहान मोठीं आठ तोंडें (Craters) सदा 'पेटतीं' होतीं असें दिसतें. या रुद्रास (शंकरास) मदन दहन करणारा म्हणतात तें असें. 'मदन' यास 'काम' असेंहि म्हणतात. आर्य लोक नुकतेच पंजाबांत आले त्या वेळीं त्यांस जीपासून सर्व ऐहिक ऐश्वर्य मिळावयाचें ती धनधान्य देणारी भूमि हीच त्यांचा 'काम' किंवा इच्छासर्वस्व साहजिकपणें ठरली. हीस 'कामधेनु' हि म्हणण्यांत येत असे. 'धेनुहरण' वगैरे जमिनीच्या अपहारासंबंधीं कां याचा आतां उलगडा होईल. रुद्राच्या ऊर्फ हिमाचलज्वालामुखीच्या स्फोटांनीं 'काम' ऊर्फ नवीनच पैदा झालेली 'लागवडीची जमीन' योजनेंच्या योजनें बेचिराख झाली! हेंच तें मदनदहन होय. पुढें प्रद्युम्नाच्या ( म्हणजे ऐश्वर्याच्या = सुपीक जमिनीच्या ) रूपानें काम जिवंत झाला असें म्हटलें आहे. म्हणजे काय तर कालांतरानें पेटता ज्वालामुखी ( Active volcano ) हिमाचल थंड पडून जमिनीची विनहरकत लागवड होऊं लागली.

येथें हें सांगितलें पाहिजे कीं वेदकालीं ज्यास रुद्र म्हणत तो पेटता ज्वालामुखी हिमालय हा काश्मीराजवळचा ईशान्येकडील काराकोरमचाच भाग होय. वैदिक वाङ्मयांतील रुद्र, हिमालय हे उल्लेख याच ईशान्येच्या हिमालयास ( काराकोरम टापूस ) लागू आहेत. नेपाळांतील गौरीशंकर वगैरे हिमालयाच्या मुलुखाशीं वैदिक आर्यांचा कांहींच संबंध नाहीं. याच पंजाबांतील भागांत 'ज्वालामुखी' नांवाचें यात्रेचें ठिकाण आहे असें ऐकतों व यानें आमच्याच म्हणण्यास पुष्टि येते. कालिदासहि ज्या कैलासाचा मेघदूतांत उल्लेख करीत आहे तो वैभवशाली मुलूख हाच काश्मीरलगतचा होय. नेपाळी लांबचा मुलूख नव्हे. आर्यांच्या टोळ्या खैबर घाटांतून पंजाबांत आल्या व तेथून गंगायमुनांच्या अंतर्वेदींत उतरल्या. त्यांस नेपाळ तिबेटकडील हिमालयाची चौकशी करण्याची कांहींच जरुरी नव्हती व त्यांनीं केलीहि नाहीं. रुद्र, हिमालय वगैरेसंबंधीं सर्व उल्लेख पंजाब, काश्मीर, काराकोरम एवढ्याच टापूचे आहेत; असो.

या शंकरास 'षडानन' नांवाचा मुलगा होता. 'कुमारः षण्मुखो गुहः'. हा 'सहा तोंडांचा' मुलगा म्हणजे हिमाचलाच्या मुख्य ज्वालामुखीपासून कांहीं अंतरावर असलेला सहा Craters तोंडें असलेला दुसरा ज्वालामुखी होय. यास 'क्रौंचदारण' असेंहि म्हणतात. 'क्रौंच' पर्वत म्हणजे हल्लींचा काराकोरम' होय. या क्रौंच पर्वतराजींतील बगळयाच्या आकाराच्या एकाद्या शिखरावरून सबंध पर्वतराजीस हें क्रौंच नांव पडलें असावें. क्रौंच म्हणजे करकोचा-बगळा. यास तेथील भाषेंत 'करकरा' म्हणतात. 'काराकोरम्' हें 'करकऱ्याचें' रूपांतर उघड आहे. 'षडानन' यास 'क्रौंचदारण' म्हणतात याचा अर्थ या ज्वालामुखीच्या भडक्यानें काराकोरम दुभंग होऊन भयंकर खिंड पडली. परशुरामासहि 'क्रौंचदारण' हीच संज्ञा पण निराळ्या अर्थानें आहे. वैदिक आर्यांची ही शेवटली टोळी वाल्योध भार्गवराम याच्या हाताखालीं पंजाबांत घुसली ती नेहमींच्या खैबर मार्गानें न येतां यारकंद-लडक-लेह या मार्गानें भयाण काराकोरमच्या घोर दरींतून पंजावांत खालीं उतरली. पुढें याच प्याऱ्या लढवय्यांसह भार्गवराम दर्यांत शीड सोडून आर्यावर्तांतून कोंकण प्रांतीं कां व कसा आला तें विवेचन इतरत्र येईल. या अति बिकट घाटांतून हा अप्रतीम योद्धा प्रथमच आल्यामुळें त्या घाटाचें व त्या योद्ध्याचें नांव 'क्रौंचदारण' भार्गवराम असें निगडित झालें आहे. शंकरास ' गजानन ' असा एक मुलगा होता. त्यास ' विघ्नराज ' असेंहि म्हणतात. यावरून हाहि एक लहानसा ज्वालामुखी जवळपास होता असें दिसतें. यास 'एकदंत' म्हणतात. 'दंत' म्हणजे शिखर. तेव्हां या पर्वतास 'एकच शिखर' होतें असें दिसतें. याचा घेर फार मोठा ( लंबोदर ) असून शिखराच्या जवळ हा पर्वत हत्तीच्या सोंडेसारखा ( गजानन ) दिसत असावा. असो. आतां कुबेर ही देवता कोण तें पाहूं.

कुबेर म्हणजे आमच्या मतें अत्यंत संपन्न सोन्याचांदीच्या खाणी असलेला उत्तरेकडील एक पर्वत होय. तो कोठेंतरी पंजावच्या उत्तरेस असला पाहिजे. त्यास 'त्र्यंबकसख' असें म्हटलें आहे. त्र्यंबक म्हणजे हिमालय. अर्थात् त्याचा मित्र त्याच्या शेजारींच असणार. हिमालयास ऊर्फ शंकरास 'ईशानीचा' अधिपति म्हटलें आहे. कारण तो भरतवर्षाच्या ईशान्येस आहे. कुबेर 'उत्तराधिपति' आहे अर्थात् तो ( पंजावच्या ) उत्तरेस असला पाहिजे. ईशान्य व उत्तर जवळजवळच येतात. कुबेर या नांवाशीं जुळणारें पर्वताचें नांव सांप्रत आढळत नाहीं. तरी 'खैबर' हा कुबेराचा अपभ्रंश होऊं शकेल. 'कांबोज-काबूल' असा पर्याय आहेच. आतां या 'खैबर' पर्वताच्या आसपास ( हल्लीं हा एक भयंकर घाट आहे. तथापि या नांवाचा सोन्याचांदीच्या खाणी असलेला पर्वत पुरातन काळीं आसपास असण्याचाहि संभव आहे. ) प्राचीनकाळीं मोठमोठ्या धनसंपन्न खाणी असाव्यात हें उघड दिसतें. खाणीवाला पर्वत अफाट उंचीचा असला पाहिजे असें मुळींच नाहीं. तो लहान टेकडीवजाहि असूं शकेल. आमचें तर असें मत आहे कीं, विस्तारानें छोटा परंतु मूल्यानें मोठा असा 'सात शिखरांचा' व 'तीन लहान पायथ्याशीं टेंकड्या असलेला' ( या संज्ञांचें स्पष्टीकरण पुढें येईल ) 'कुबेर' नांवाचा

४

खाणीचा टापू फार प्राचीन काळीं विद्यमान "खैबर" घाटाच्या आसपास असलाच पाहिजे. कालौघांत ह्या खाणी लुप्त झाल्या असतील ती गोष्ट निराळी. याच्या पुत्रास 'नलकूबर' असें संस्कृतांत म्हणतात. हें उघड उघड रूपांतर आहे. कुबेराच्या पुत्राचें 'नलकूबर' असें संस्कृत नांव असणें शक्य नाहीं. 'नाला--खैबर' वगैरे कांहींतरी परभाषेंतील शब्दाचा हा अपभ्रंश आहे. असे अपभ्रंश होऊन आलेले शब्द संस्कृतांत पुष्कळ आहेत. उदाहरणार्थ सिनीवाली, इन इत्यादि.

. आतां या 'कुबेर' देवतेचा शोध लावितांना 'मेरु', 'सुमेरु' यांचा शोध येथें सहज लागतो. तो कसा तें पाहूं. 'मेरु' म्हणजे हल्लींचा अफगाणिस्थानच्या उत्तरेकडील 'मर्व्ह' शहराचा टापू होय. हें शहर अति प्राचीन असल्याचें प्रसिद्धच आहे. 'सुमेरु' अथवा 'सुमेरुखंड' म्हणजे हल्लींच्या 'समरकंद' शहराच्या आसपासचा प्रदेश होय. मेरु–सुमेरु फार उंचावर असल्याचें वर्णन आहे. मर्व्ह–समरकंद या टापूंतहि बाराबारा-हजार, वीसवीस हजार फूट उंचीचीं कित्येक शिखरें आहेत. पौराणिक काळांतील 'स्वर्ग' म्हणजे ( संपन्नतेच्या ऐहिक दृष्टीनें ) खैबर ते ताश्कंद–समरकंद व कंदाहार ते यारकंद हा टापू होय. दशरथराजा वगैरे अनेक राजे 'स्वर्गांतील' राजांस साह्य करावयास जात म्हणजे ते कोठें आकाशांत उडून जात नसून याच प्रदेशांतील राजाच्या प्रसंगोपात्त मदतीस जात असले पाहिजेत. पुढें पुढें अनेक कारणांनीं हा संबंध सुटला. एकेकाळीं हा मुलूख अत्यंत वैभवशाली असून यासच ' स्वर्ग ' ( ऐहिक-दृष्ट्या ) म्हणत. 'मेरुः सुमेरुर्हेमाद्री रत्नसानुः सुरालयः ( अमर )' असें म्हटलें आहे. जशी मेरु–सुमेरूंची जोडी तशीच मर्व्ह–समरकंदची जोडी आहे. सुमेरु म्हणजे सोन्याचा पर्वत हें प्रसिद्धच आहे. समरकंद शहराचीहि तीच गोष्ट आहे. हाहि टापू अत्यंत प्राचीन असल्याचें प्रसिद्ध आहे. एवढेंच काय, तर या शहराजवळून वाहणारी नदी जी झरफशान तिचा अर्थ gold spreading 'सुवर्ण पसरणारी' असा आहे. या प्रदेशासंबंधीं ब्रिटिश एन्सायक्लोपेडियांत— 'Traces of auriferous sands have been discovered in many places ' म्हणजे या प्रदेशांत सुवर्णमिश्रित वालुका कित्येक ठिकाणीं आढळते असें म्हटलें आहे. तर असा हा रत्नमाणिकांनीं एकेकाळीं भरलेला मर्व्हसमरकंदचा टापू हाच पौराणिक स्वर्ग होय. कुबेराचा ( खैबराचा ) टापूहि याच प्रदेशांत येतो. असो; आतां पुन्हा कुबेराकडे वळूं.

कुबेर म्हणजे 'खैबर' (-किंवा आसपास पूर्वी सोन्याचांदीच्या खाणींनीं भरलेला कालौघांत खाणी लुप्त झालेला याच नांवाचा छोटा पर्वत ) हें आम्ही वर सुचविलेंच आहे. हल्लीं खैबर हा एक भयंकर दऱ्यांचा घाट आहे. तथापि प्राचीनकाळीं याच्याच आसपास सोन्याचांदीच्या खाणी असल्या पाहिजेत हें उघड आहे. याच्या राजधानीस 'अलका' म्हणतात. हेंहि एकादें प्राचीन काळचें mining town खनिज पदार्थांच्या-रत्नांच्या–देवघेवींचें शहर असलें पाहिजे. 'चित्ररथ'च्या समानवाचक विद्यमान 'चित्राल' आढळतें. कुबेर ह्यास गंधर्व--गुह्यक–यक्ष–किंनर यांचा राजा म्हणतात. म्हणजे काय,

तर या संपत्तिमान पर्वताच्या किंवा 'खैबर खाणींच्या' आसपास या लोकांची वस्ती होती. तरी आतां त्या त्या अर्थाचे विद्यमान काय शब्द आढळतात तें पाहूं.

गंधर्व—गांधार—कंदाहार असा अपभ्रंश साहजिक आहे. तेव्हां या व्युत्पत्तीनेंहि वरील अफगाण मुलूखच निर्दिष्ट होतो. पूर्वी हस्तिनापुरच्या धृतराष्ट्राची स्त्री 'गांधारी' होती. तिनें डोळ्यास पट्ट्या बांधिल्या होत्या असें म्हणतात. आमच्या मतें ह्या पट्ट्या नसून बुरखा असावा. ती गांधार देशांतील कंदाहारकडीलच होती; यावरून त्या काळींहि त्या देशांत बुरख्याची चाल तेथें विशेष प्रचलित होती हें उघड दिसतें. हे 'गंधर्व' उर्फ 'कंदाहारी' लोक त्या काळीं नृत्यगीतांत बरेच प्रवीण होते असें दिसतें. सप्तसुरांतील खुद्द एका सुरासच 'गांधार' हें नामाभिधान प्राप्त होण्याचें कारण कंदाहारी लोकांचें गाननैपुण्य होय. तेव्हां 'गंधर्व' म्हणजे कंदाहार टापूंतील रहिवासी होत. आतां 'गुह्यक' कोण हें पाहूं. 'क' हें अक्षर आनुषंगिक लावण्याचा संस्कृतांत प्रघात आहे. फारशीचें संस्कृतांत पारसीक असें रूप आढळतें. तेव्हां ह्या 'क' काढून टाकतां 'गुह' लोक राहिले. गुहांचा मुलूख म्हणजे गुहस्थान; म्हणजेच 'कोहिस्तान' होय. संस्कृतांतील गुहा ( पर्वतांतील दरी ) व फारशी कुह् ( पर्वत ) हे कांहींसे समानार्थकच आहेत. पहाडांत राहणारे ते पाहाडी तसेंच गुहांमध्यें राहणारे ते गुहक किंवा गुह् व त्यांचें स्थान तें गुहकस्थान = गुहस्थान = कोहिस्तान होय. काबुलच्या उत्तरेस अलीकडेच 'कोहिस्तान' नांवाचा प्राचीन टापू व शहर सांपडलें आहे असें ब्रिटिश एनसायक्लोपेडियांत म्हटलें आहे. तेव्हां गंधर्व कंदाहाराचे व गुह्यक कोहिस्तानांतील काबूलच्या उत्तरेकडील ठरले. आतां यक्ष कोण तें पाहूं. 'यक्ष' ही जातहि समरकंदच्या पूर्वप्रदेशांत यारकंदच्या जवळपास असावी असें दिसतें. खोतानची राजधानी-योत्कान (किंवा आमच्या मतें यक्ष – स्थान = योत्कान) हें फार प्राचीन शहर असून त्या जागीं प्रसिद्ध पुराणवस्तुसंशोधक स्वीडिश विद्वान डॉ. स्वेन हेडिन यांनीं शोध चालविले आहेतच. गंधर्व म्हणजे कंदाहारमुलुखांतील रहिवाशी होत. पामीर टापूच्या जवळच 'कुनार' नांवाची दरी व प्रदेश आहेत. हेंच तें किंनर जातीचें वसतिस्थान होय. 'कुनार व्हॅली' ही चित्रालच्या ( चित्ररथाच्या ) जवळपासच आहे. 'गंधमादन' म्हणजे गंधकाचा ( Sulphur ) वास येणारा ज्वालामुखीच होय. मग तो पेटता असो किंवा विझलेला असो. याच्या समानवाचक अफगाणिस्तानांत ' गंडमक ' हें पर्वतांतील ठिकाण आहे. मर्व्ह ( मेरूच्या ) च्या उत्तरेस असलेलें ताश्कंद म्हणजे 'तार्क्ष्य-खंड' होय. तार्क्ष्य याचा अर्थ हिंगूळ, सोनें किंवा घोडा असा दिलेला आहे. मर्व्ह प्रांतांतील घोडे नामांकित असल्याचें प्रसिद्धच आहे. किंवा त्या प्रांतांत 'गेरू सोनें' हें विपुल असल्याचें सिद्ध झालें तरी या मेरुप्रदेशाच्या पुरातन वर्णनास तें जुळतेंच आहे. असो. या कुबेराच्या वर्णनांत त्यास तीन 'पाय' असून फक्त 'आठच दांत आहेत असें म्हटलें आहे. आतां पर्वतसंबंधांत 'पाद' म्हणजे मोठ्या पर्वताच्या पायथ्याजवळील लहान पर्वत होय 'पादाः प्रत्यन्तपर्वताः—अमरे' व 'दांत' म्हणजे शिखरें. तर ह्या

कुबेर पर्वत किंवा खाणींचा पर्वत आठ शिखरांचा असून त्याच्या कडेला तीन उप-पर्वत आहेत हें सिद्ध होतें. एवंगुणविशिष्ट हल्लींचा खैबर घाट (पूर्वी या नांवाचा पर्वतहि असेल) हुबेहूब नसला, तरी त्याच्या आसपास याच टापूंत हा धनवान कुबेर पर्वत किंवा खाणी असल्या पाहिजेत हें उघड आहे. या एकंदर वर्णनावरून दक्षिणोत्तर अटकेपासून ताश्कंदपर्यंत व पूर्वपश्चिम यारकंद ते कंदाहारपर्यंत हा वैभवशाली टापू प्राचीनेतिहाससंशोधनाच्या दृष्टीनें अत्यंत महत्त्वाचा ठरतो. एवढ्या टापूंत आपणांस आतांच पुढें लिहिल्याप्रमाणें प्राचीन संज्ञा हल्लींच्या रूपांत आढळून आल्या. त्या अशा :—(१) कुबेर (खैबर), (२) चित्ररथ (चित्राल), (३) गुह्यकस्थान (कोहिस्थान), (४) यक्षस्थान (योत्कान-योत्कान), (५) गंधर्व (कंदाहार), (६) किंनर (कुनार व्हॅली), (७) मेरु (मर्व्ह), (८) सुमेरुखंड (समरकंद), (९) तार्क्ष्यखंड (ताश्कंद), (१०) गंधमादन (गंडमक), (११) क्रौंचपर्वत (काराकोरम).

# भारतीय भूघटना



( लेखकः–कृष्णाजि विनायक वझे )

[ या निबंधांतील कांहीं माहिती रावसाहेब वझे यांच्या 'प्राचीन हिंदी शिल्पशास्त्र' या पुस्तकांत खनिशास्त्रावरील प्रकरणांत येऊन गेली आहे; तथापि निबंधांतील माहिती फार महत्त्वाची असल्यामुळें सबंध निबंध पत्रिकेंत छापला आहे. —सं. म. सा. पत्रिका ]

वृक्षा वदंति, कथयंति कथाः स्रवंत्यः।
वृत्तानि शंसति धरा, ब्रुवते करोऽस्यः॥
गायंति संततशिराः, प्रथयंति श्रेण्यः।
ब्रह्मात्मवृत्तकथने तु जगत्प्रवृत्तं॥ १॥

" झाडें बोलत आहेत, नद्या कथा कथित आहेत, पृथ्वी इतिहास सांगत आहे, कवळ्या ( पुराणें ) सांगत आहेत, विस्तृतभूभेगा गात सुटल्या आहेत, थरावरथर इतिहास प्रसिद्ध करीत आहेत. याप्रमाणें सगळें जग ब्रह्मापासून आपल्यापर्यंतची घडलेली हकीकत सांगण्यांत गढून गेलें आहे." ही हकीकत समजून घेऊन मागील अनुभवांचा उपयोग करून घेईल तो भाग्यवान् व या सुप्रसंगीं 'सोवेगा सो खोवेगा' जो झोंपी जाईल तो लाभाला अंतरेल.

पृथ्वीची मागील घडामोडींची हकीकत सांगणारें जें शास्त्र त्याला इंग्रजींत Geology असें म्हणतात. या शब्दाचें भाषांतर आपल्या लोकांनीं 'भूगर्भशास्त्र' असें केलें आहे. परंतु पृथ्वीचा व्यास बावीसशें मैल आहे, त्यापैकीं फार तर पांच दहा मैलांतील माहिती सांगणाऱ्या शास्त्राला भूगर्भ ( पृथ्वीच्या गर्भातील माहिती सांगणारें ) शास्त्र म्हणणें शोभत नाहीं. याला 'भूघटनाशास्त्र' किंवा 'भूस्तरशास्त्र' असें नांव देणें योग्य होईल. पृथ्वीच्या वरच्या सायीसारख्या थराची माहिती सांगणारें भूस्तरशास्त्र हा शब्द याला अन्वर्थक दिसतो. विधिनिषेधात्मक तें शास्त्र व वर्णनात्मक तें दर्शन म्हणून याला भूस्तर दर्शन म्हटलें पाहिजे.

पृथ्वीवरील घडामोडी ह्या जगांतील घडामोडींचा एक अंश असल्यामुळें त्या घडामोडींची सामान्य रूपरेषा सांगून मग पृथ्वीवरील घडामोडींची त्रोटक हकीकत व भरतवर्षांतील घडामोडींची सविस्तर हकीकत आज थोडक्यांत सांगण्याचें ठरविलें आहे. जग हें अनादि आहे खरें. तथापि त्याची माहिती सांगावयाची म्हणजे कोठून तरी प्रारंभ करणें भाग पडतें. वर्तुळाला प्रारंभ व शेवट अमुक ठिकाणीं आहे असें कोणासहि सांगता येत नाहीं; तरी त्याची लांबी मोजणें असेल तर कोणचा तरी बिंदु प्रारंभ कल्पून मोजण्यास सुरवात करावी लागते. त्याप्रमाणें हें विश्व अनंत आहे तरी त्याची हकीकत सांगण्यासाठीं कोणत्या तरी क्षणापासून प्रारंभ करणें भाग आहे. या क्षणाला 'कल्पादि' असें नांव दिलें आहे. मागील सृष्टीचा संहार होतां होतां सर्व विश्व पूर्ण समतेला पोंचलें व सर्व सृष्टि निर्गुण स्वरूप झाली; तो क्षण नवीन सृष्टीच्या प्रारंभाचा व म्हणून कल्पादि होय.

या निर्गुण ब्रह्मांत विकार उत्पन्न होऊन सृष्टीला–चालू सृष्टीला–प्रारंभ झाला. त्या वेळचें वर्णन हिंदुशास्त्रकारांनीं

आसीदिदं तमोभूतं अप्रज्ञातमलक्षणम् ॥
अप्रतर्क्यं अविज्ञेयं प्रसुप्तमिव सर्वतः ॥
ततः स्वयंभूर्भगवानव्यक्तं व्यंजयन्निदं ॥
महाभूतादिवृत्तौजाः प्रादुरासीत्तमोनुदः ॥
तदंडमभवद्धैमं सहस्रांशुसमप्रभं ॥
तस्मिञ्जज्ञे स्वयं ब्रह्मा सर्वलोकपितामहः ॥ ( खनिशास्त्र )

याप्रमाणें केलें आहे. या विकाराचा अंमल जितक्या भागावर चालला तितक्या भागाला 'विश्व' हें नांव दिलें आहे. हा विकृत भाग एका मोठ्या अंड्याप्रमाणें असून त्या अंड्यांत हा विकारमध्य ( याला 'ब्रह्मा, प्रजापति, सृष्टिकर्ता' अशीं नांवें आहेत ) गुरफटलेला अनुभवास येऊं लागला. या क्षणापासून या सृष्टीचें आयुष्य किंवा काल मोजण्यास सुरवात झाली; ती 'अद्य ब्रह्मणो द्वितीये परार्धे' इत्यादि. तसेंच या मध्यबिंदूपासून याच्या पूर्वेस, उत्तरेस, वर, खालीं असें स्थलनिदर्शन करण्यास सुरवात झाली. या बिंदू-पासून निघणाऱ्या ज्या अनंत विकाररेषा-या विकारालाच आज आपण गुरुत्वाकर्षण म्हणतों—त्यांना गुण संज्ञा देण्यांत आली. गुण म्हणजे दोरी. या दोरीनें तो मध्य बिंदु सर्वांना आपआपल्या ठिकाणीं व आपल्या ताब्यांत वागवीत असतो. याप्रमाणें

कालस्थलगुणैस्तस्य त्रिविधः प्रतिसंक्रमः ।

या विकारामुळें काल, स्थल आणि गुण अशा तीन गोष्टींची उत्पत्ति झाली. विश्वांतील एक एक परिमाणु जसा या मध्य बिंदूकडे ओढला जाऊं लागला तसा त्यांत फरक पडत चालला. त्याचें पूर्वीचें स्वातंत्र्य नष्ट होऊन त्याच्या मोबदला त्यांत निरनिराळ्या शक्ती प्रादुर्भूत होऊं लागल्या. हा मध्य बिंदु विश्वाच्या ( विश्वालाच विष्णु असें नांव ठेवलें आहे ) अगदीं मध्यांत नसून नाभिस्थानीं ( जरा एका अंगाला ) आहे. यामुळें निरनिराळ्या परमाणूंवर या शक्तींचा निरनिराळा परिणाम झाला व ब्रह्मांड, ब्रह्मांडापासून अदिति, अदितीपासून आदित्य, आदित्यापासून ग्रह, वगैरे निर्माण झाले. ब्रह्मांड आकाशतत्त्वमय, अदिति वायुतत्त्वमय, आदित्य तेजतत्त्वमय, ग्रह आपतत्त्वमय व उपग्रह पृथ्वीतत्त्वमय अशी विभागणी होत गेली. या घडामोडींचें वर्णन हिंदु शास्त्रकारांनीं खालीलप्रमाणें केलें आहे.

तस्मिन्नंडे स भगवानुषित्वा परिवत्सरः ॥
स्वयमेवात्मनो ध्यानात्तदंडमकरोद् द्विधा ॥
ताभ्यां च शकलाभ्यां तु दिवं भूमिं च निर्ममे ॥
अदितिर्दितिनाम्ना च तौ ख्यातौ पृथिवीतले ॥
दितेस्तु मरुतो जाता अदितेर्भास्करादयः ॥
उल्कानिर्घातकेतूंश्च ज्योतींष्युच्चावचानि च ॥
नक्षत्राणां सहस्राणि चादितिस्तु प्रसूयत ॥ खनिशास्त्र

या ब्रह्मांडात केंद्रोत्सारिणी व केंद्रगामिनी अशा दोन शक्तींचा झगडा चालून त्यांचे अनेक तुकडे व तुकड्यांचे तुकडे झाले. या तुकड्यांना अदिति ( विन कापलेली किंवा अखंड ) व दिति ( कापलेली किंवा खंडित ) अशीं नांवें दिलीं. अदितीपासून नक्षत्रें, सूर्य, उल्का, केतु वगैरे लहान मोठ्या अनेक ज्योती निर्माण झाल्या. या सर्व एका ठिकाणीं घट्ट बसल्याप्रमाणें दिसतात, म्हणून यांना 'अदिति' असें सार्थ नांव दिलें गेलें.

ज्या भागांतल्या घडामोडी माणसांच्या लक्षांत येतात त्या भागाला 'दिति' हें नांव दिलें गेलें. या भागांत शनि, गुरु, पृथ्वी, चंद्र वगैरे ग्रहांचा समावेश होतो.

त्वष्टा दुहित्रे वहतुं कृणोति। ऋ० ७।२३।१
दितेस्तु मरुतो जाता ग्रहाश्चोपग्रहास्तथा ॥
संवत्सरभ्रमात्तस्य विश्वकर्मा रवेस्ततः ॥
तेजसः शातनं चक्रे ग्रहास्तेनाभवन् दिवि ॥
ग्राह्यग्राहकभावेन ग्रहत्वमभिगम्यते ॥
विद्युतो जनिमेघाश्च रोहितेंद्रधनूंषि च ॥
आप एवाभवन्पूर्वं तासु वीर्यमजायत ॥
उद्भिज्जाः स्थावराः सर्वे अंडजाः स्वेदजास्ततः ॥ खनिशास्त्र

दितीमध्यें पहिल्यानें ग्रह उत्पन्न झाले. हा अमका धारण करणारा व त्यानें धरलेलें हें अशी जेथें जाणीव उत्पन्न झाली त्यांना ग्रह म्हणतात. हे शनि, गुरु, मंगळ, पृथ्वी, शुक्र, व बुध. हे सर्व सूर्याच्या —आपल्या विवस्वान् नांवाच्या आदित्याच्या–ताब्यांत आहेत. या आदित्यापासून हे ग्रह कसे व केव्हां उत्पन्न झाले हें सोबतच्या नकाशांत दाखविलें आहे. एक एक ग्रह सूर्याच्या ज्या ज्या भागांतून निघाला तें त्याचें घर असें ज्योतिषशास्त्री म्हणतात. तेथून तो उडाल्याबरोबर सूर्यापासून लांबच लांब अंतरावर गेला तें त्याचें 'उच्चस्थान' व तेथून तो सूर्याच्या आकर्षणानें अगदीं सूर्याच्या जवळ आला तें त्याचें 'नीचस्थान' होय. हीं स्थानें खालीं दिलीं आहेत.

| ग्रह | घर | उच्चस्थान | नीचस्थान |
|---|---|---|---|
| शनि | ( पुनर्वसु ) मकर ( कर्क ) | तूळ | मेष |
| गुरु | ( उत्तराभा. ) मीन | कर्क | मकर |
| मंगळ | ( ज्येष्ठा ) वृश्चिक | मकर | कर्क |
| पृथ्वी | ( मघा ) सिंह | तूळ | मेष |
| शुक्र | (स्वाती) तूळ | मीन | कन्या |
| बुध | ( रोहिणी ) मिथुन | कन्या | मीन |

शनीची दृष्टि उलटी असल्यामुळें त्याचें घर कर्क असून मकर असें मानण्यांत येतें. पृथ्वीच्या बाहेरील ग्रहांना पुरुषग्रह म्हणतात. यांच्यावरील सूर्यप्रकाश परावर्तनानें दोन बाजूंनीं पृथ्वीवर येतो म्हणून यांना दोन दृष्टी आहेत. पृथ्वीच्या आंतील जे ग्रह त्यांना स्त्रीग्रह म्हणतात. यांचें आकर्षण मात्र पृथ्वीवर एक बाजूनें परिणामकारक आहे म्हणून यांना दोन दृष्टी नाहींत.

ग्रहांचे पडलेले जे तुकडे त्यांच्या ताब्यांत नियमितपणें वागतात त्यांना 'उपग्रह'–ग्रहांचे ताबेदार– असें म्हणतात. आपल्या पृथ्वीचा एक असा तुकडा झालेला आहे तो 'सोम' नांवाचा चंद्र होय. हा तुकडा गेल्यानें पृथ्वीवर जो खड्डा पडला तो 'उदधि' होय. हा चंद्र मार्गशीर्ष महिन्यांत पृथ्वीमधून बाहेर पडला म्हणून मासांचा प्रारंभ मार्गशीर्ष मासापासून आहे. आपली पृथ्वी सूर्यांतून बाहेर पडली तो क्षण म्हणजे वसंतऋतूचा प्रारंभ होय. म्हणून ऋतूंत वसंत ऋतु पहिला. याप्रमाणें ग्रह व उपग्रह होतांना विश्वाचे सात पदर झाले व या पदरांचे एकतीस तुकडे झाले. ते सोबतच्या चित्रांत दाखविले आहेत.

सप्तास्यासन्परिधयस्त्रिः सप्त समिधः कृताः।

पृथ्वींतून चंद्र बाहेर पडल्यावर ती निवत निवत चालली व तिच्यावर सात मूळ वायू व त्यांचीं एकमेकांशीं एकंदर एकुणपन्नास मिश्रणें झालीं. यांना 'मरुत्' अशी संज्ञा आहे. हे वायु अद्याप वायुरूपांतच असून पृथ्वी अतिशय थंड झाली तरी ते वायुरूपच राहणार म्हणून यांना 'देव' असें म्हणतात. या वायुमंडलांत पुढें पाण्याची वाफ, ढग, विजा, इंद्रधनुष्य, वगैरे गोष्टी उत्पन्न झाल्या. मग पृथ्वी



आणखी निवल्यावर तिच्यावर घन पापुद्रा आला व तिची सावली पडूं लागली. पृथ्वीच्या अगोदर चंद्र घट्ट होऊन त्याची सावली पडली व तिला 'केतु'– ध्वजाकार आकृति पाहून–नांव दिलें. सावली सगळ्यांच्या शेवटीं निर्माण झाल्यामुळें तिला 'अंत्यज' असें म्हणतात. रंगांचा जन्म पुढील अनुक्रमानें झाला व हाच त्यांचा अनुक्रम उत्तम, मध्यम वगैरे गोष्टांना लावण्यांत आला. बिनरंगी, पांढरा, तांबडा, पिवळा, निळा व शेवटीं काळा अशी परंपरा देव, ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, शूद्र व अंत्यज या पारिभाषिक नांवांनीं ओळखण्यांत येत असते.

घनपदार्थ पृथ्वीवर दोन प्रकारचे आहेत. एक दिव्य म्हणजे आकाशांतून उल्का वगैरे रूपानें पडलेले व दुसरे भौम म्हणजे पृथ्वीवरच निर्माण झालेले. दिव्य आयुधें वगैरे जें पुराणांतून वर्णन येतें तें या दिव्य खनिजांपासून केलेल्या आयुधादिकांचें आहे. या दिव्य धातू फार चांगल्या व शुद्ध असतात. पृथ्वीवर पहिली उत्पन्न झालेली जी साय ती म्हणजे तामस खडक होत. कारण यांची पहिल्यानें सावली पडूं लागली व ती सावली म्हणजे तम किंवा राहू होय.

अग्निजा जलजाश्चैव द्विविधा आकरोद्भवाः ।
पाषाणधात्वाद्यग्निजा जलजाः प्रस्तरा मृदः ॥
एते भौमा इति प्रोक्ता उल्काद्या दिव्ययोनयः ।

या पृथ्वीवरील सायीला नेहमीं सुरकुत्या पडतात. या सुरकुत्यांचा उंच भाग म्हणजे पर्वत व खोलगट भाग म्हणजे नद्या, समुद्र होत. पूर्वी या सुरकुत्या नेहमीं कमीजास्त होत व याच घडामोडींचें 'पर्वतांना पूर्वी पंख होते व ते उडून जात' असें पुराणांतून वर्णन आहे. या वरचेवर उलथ्यापालथ्या घड्या पडल्या म्हणजे खडकांचे थर मोडत व त्यांतून आंतील द्रव बाहेर येई. या द्रवाचे जे खडक ले त्यांना द्राविड खडक म्हणतात. डोंगरांवर पावसाचें पाणी पडून तें वाहून एकत्र झालें म्हणजे त्यांची नदी होते. एकमेकांशीं मिळत

यत्र यत्रापुरैक्यं ते तत्र तत्रापगाभवत् ॥

जाण्याचा पाण्याचा गुण पाहूनच त्याला 'आप्' हें नांव दिलें गेलें. या पाण्याबरोबर खडकांचें चूर्ण वाहून जाऊन तें एका ठिकाणीं सांचल्यावर त्याचे जे खडक झाले त्यांना 'राजस' धुळीचे खडक असें म्हणतात. पृथ्वीच्या चामड्याला सुरकुत्या पडाव्या, तें कोठें कोठें फाटून त्यांतील रस बाहेर यावा, कोठें सुरकुत्यांनीं खडक वर उचलले जावे, कोठें ते खोलगट व्हावे, हवेच्या क्रियेनें खडकांचें पृथक्करण व चूर्ण व्हावें, हें चूर्ण पावसाच्या पाण्याबरोबर नदींत व तेथून समुद्रांत जावें, या चूर्णाचे फिरुन दगड व्हावे, मध्येंच दगड मोडावे, फुटावे, उलथे पालथे व्हावे, त्याचे मोठे लहान तुकडे वाहून जावे वगैरे अनेक उलाढाली या पृथ्वीच्या घन कवचांत आजवर झाल्या व आजहि होत आहेत. त्यानंतर झाडें, प्राणी, माणसें वगैरे उत्पन्न झाल्यामुळें या घडामोडींत जास्तच भर पडली. झाडांनीं, प्राण्यांनीं, माणसांनीं खडक फोडले व या खडकांच्या चूर्णाबरोबर व तुकड्यांबरोबर त्यांचेहि अवशेष वाहून गेले अगर रसांत व खडकांत सांपडले व खडक बनले.

जमीन झाल्यावर जमिनीवर झाडें उगवलीं. जमीन मऊ, हवा गरम, पाणी मुबलक अशा स्थितींत या झाडांचीं मोठीं जंगलें माजलीं, व हीं जंगलें केव्हां सुरकुतींत, केव्हां फटींतून निघालेल्या रसांत सांपडलीं, जळलीं, दाबलीं गेलीं व त्यांचा अर्क एका ठिकाणीं गोळा झाला. आजचा दगडी कोळसा, राकेल तेल, डामर या जिनसा याप्रमाणें पृथ्वीवर उत्पन्न झाल्या. खडक दाबले जात असतांना अनेक स्फटिक व रत्नें बनलीं. खडकांच्या सांधींतून धातूंचे रस वाहून येऊन तेथेंच गोठून गेले. कित्येक धातूंवर हवा, पाणी वगैरेंचे परिणाम होऊन त्यांचे क्षार झाले. हे क्षार पाण्याबरोबर वाहून जाऊन मोठमोठ्या तलावांत, लहान लहान

समुद्रांत जमले. या समुद्राचें पाणी आटून आत असतां व गेल्यावर या क्षाराचे थर, खडे व खडक झाले. कांहीं समुद्रांचे तळ उचलले जाऊन ते कोरडे पडले व त्यांचीं वाळवंटी मैदानें झालीं. कित्येक नगरें व देश हीं ज्वालामुखींनीं, धरणीकंपांनीं पृथ्वीच्या पोटांत गडप झालीं, कोठें कोठें किडयांनीं पोंवळीं, खडू यांचे डोंगर व प्रदेश निर्माण केले. अशा उलाढाली या पृथ्वीच्या पाठुग्यांत झाल्या आहेत, होत आहेत व होणार आहेत.

वर जो श्लोक लिहिला आहे त्यांत झाडें बोलतात, नद्या कथा कथितात, पृथ्वी कीर्तन करते, कवच्या पुराणें सांगतात वगैरे जें वर्णन आहे तें या घडामोडींच्या अभ्यासानें कळणारें आहे. प्राचीन काळीं तीर्थयात्रा वगैरेंसाठीं पायीं प्रवास होत असल्यामुळें भूस्तरविद्येचा व भूपृष्ठाचा निराळा अभ्यास करावा लागत नसे. दिवसेंदिवस ही प्रथा मोडत चालली आहे व यामुळें कांहीं माणसांनीं या भूस्तर-शास्त्राचाच अभ्यास करण्याकडे आपणांस वाहून घेतलें पाहिजे. या अभ्यासाचा उपयोग काय हें पाहून आपण पुढें चालूं.

भूस्तरशास्त्राचा अभ्यास शिल्पज्ञाला फार जरूर आहे. कोणते खडक कसे निर्माण झाले, पुढें त्यांत कोणत्या घडामोडी झाल्या व आज त्यांची स्थिति काय आहे हें समजलें म्हणजे ते दगड योग्य कामीं वापरण्यास बरें पडतें. रस्ते, आगगाडया वगैरे बांधतांना कोठें पूल बांधावे म्हणजे पाया चांगला लागून व पुलाची बाजू घट्ट राहून खर्च कमी लागेल, कोठें बोगदे पाडणें इष्ट आहे व कोठें नुसते डोंगर फोडणेंच बरें हें ठरविण्यास त्याला या शास्त्राची मदत होते. खाणींचें काम करणाऱ्या माणसांना कोणत्या खडकांत कोणतीं द्रव्यें सांपडतात, कोणत्या ठिकाणीं कोणतें खनिज द्रव्य सांपडण्याचा संभव आहे या गोष्टी फारच महत्त्वाच्या आहेत. शेती करणाऱ्या माणसांना कोठें विहीर पाडावी, कोठें पाणी लागण्याचा संभव आहे, कोणत्या थराची रचना कशी आहे व कोणती रचना पाण्याच्या प्रवाहांना अनुकूल आहे वगैरे गोष्टी समजणें अगत्याचें आहे. कोणत्या जमिनींत कोणतीं रासायनिक द्रव्यें आहेत, नांगरल्यामुळें कोणतीं द्रव्यें मिळूं शकतील, कोणत्या थरांत पाणी किती मुरेल अगर मुरणार नाही. गोष्टी समजल्या तर योग्य परिस्थितींत योग्य पीक करण्यास व योग्य व्यवस्था ठेवण्यास बरें पडतें. इतिहाससंशोधकास एकंदर पृथ्वीचें आयुष्य किती, त्यांत कोणकोणते काळ कधीं आले, त्या काळांत कोणत्या घडामोडी झाल्या, त्यावेळीं विवक्षित प्रदेशांत काय परिस्थिति होती, कोणते प्राणी रहात, आजपर्यंत प्राणी वगैरेंची परंपरा कशी चालत आली आहे वगैरे गोष्टी समजतील.

याप्रमाणें या शास्त्राचा उपयोग व विश्वाची रचना व पृथ्वीवरील घडामोडी यांची सामान्य माहिती सांगितल्यावर आपण आपल्या भरतखंडाच्या रचनेचा विस्तारानें विचार करूं.

हिमाचलस्य याम्येन क्षाराब्धिवृतमन्यतः ॥
वर्षं तु भारतं नाम प्रकृष्टधनुराकृति ॥
हिमाद्रिकन्ययोरंतर्गतो देशस्तु भारतः ॥
सोपि देशस्त्रिधा भिन्नस्तत्तद्देशभवैर्गुणैः ॥
त्रियुगं तत्त्रिचक्रं च त्रिगुणं च क्रमात्स्मृतम् ॥

या भरतवर्षाला पूर्वी जंबुद्वीप-पेरूच्या आकाराचें बेट असें म्हणत असत. या पेरूचा देंठ हिमालयाकडे असून याचा शेंडा रामेश्वराकडे आहे. चारी बाजूंनीं पाण्यानें वेष्टित जो प्रदेश त्याला द्वीप किंवा बेट असें म्हणतात. एका अंगाला बर्फाच्छादित हिमालय, दोन अंगाला सिंधु व ब्रह्मपुत्रा व चवथ्या अंगाला क्षारसमुद्र असें हें चारी अंगांस पाण्यानें वेढलेलें बेट आहे. यालाच पुढें आर्यावर्त, भारतवर्ष, भरतखंड, हिंदुस्थान अशीं निरनिराळीं नांवें पडलीं आहेत. हा देश तीन युगांत, तीन चक्रांनीं व तीन गुणांनीं युक्त असा बनलेला आहे.

कलिः शयानो भवति, संजहानस्तु द्वापरः ॥
उत्तिष्ठंस्त्रेता भवति, कृतः संपद्यते चरन् ॥

एकंदर काळाचे शास्त्रकारांनीं चार प्रकार केले आहेत. ( १ ) कलि म्हणजे ज्यांत फारशा घडामोडी होत नाहींत तो झोंपेचा काळ, ( २ ) ज्या काळांत पुष्कळ गाळ टाकण्यांत येतो तो काळ म्हणजे द्वापर, ( ३ ) ज्या काळीं पुष्कळ ज्वालामुखी सारखे स्फोट होतात तो काळ म्हणजे त्रेता व ( ४ ) ज्यांत सारख्या उलथापालथी होत असतात तो काळ म्हणजे कृत. या काळांना 'युग' अशी पारिभाषिक संज्ञा आहे. पृथ्वीवरील घडामोडींचा इतिहास या चार काळांत विभागून सांगतात.

हिमवद्विंध्ययोर्मध्यं सात्विकं भूतलं स्मृतं ॥
नागरस्तु स्मृतो देशो हिमवद्विंध्यमध्यगः ॥
विंध्यशैलादि कृष्णांतं राजसं परिकीर्तितं ॥
द्राविडस्तु स्मृतो देशो विंध्यतुंगांतरे स्थितः ॥
तुंगकृष्णादिकन्यांतं तामसं भूतलं स्मृतं ॥
अगस्त्यतुंगामध्यस्थो देशो वेसरसंमतः ॥
आग्नेया विंध्यसह्याद्याः सौम्यो हिमगिरिस्ततः ॥
कृष्णाया दक्षिणो भागस्तामसः परिकीर्तितः ॥

हिमालयापासून विंध्य पर्वतापर्यंतचा भाग द्वापरयुगांत झाला असून त्याला सात्विक, नागर किंवा सौम्य अशीं नांवें आहेत. विंध्य पर्वतापासून कृष्णा किंवा तुंगभद्रापर्यंतचा प्रदेश त्रेतायुगांत झाला असून याला द्राविड किंवा राजस असें नांव आहे. यालाच आग्नेय असेंहि म्हणतात. कृष्णा किंवा तुंगभद्रा यांच्या दक्षिणेचा रामेश्वरापर्यंतचा प्रदेश कृतयुगांत झाला असून त्याला तामस किंवा वेसर असें म्हणतात.

एक एक युगांत तीन तीन चक्रें व एक एक चक्रांत तीन तीन वर्ण किंवा गुण आहेत. याप्रमाणें भरतवर्षाचे सत्तावीस भाग होतात. त्यांपैकीं सोळा भाग स्पष्ट व प्रमुख आहेत. या सोळा भागांचें वर्णन खालीं देत आहें.

( १ ) भूभुजा वालिशेनापि शक्यते या प्रशासितुम् ॥
या च भद्रजना सा स्याद् वालिशस्वामिनी क्षितिः ॥

ज्या ठिकाणीं लोक इतक्या सचोटीनें वागतात कीं तेथें वेडा राजा चालूं शकतो, तो देश 'वालिशस्वामी' होय. हिमालय हा प्रदेश असा आहे.

( २ ) वितरंत्यधिकं यस्यां भागभोगादिकान् करान् ॥
नरा भूरिश्रियः सात्र भोग्येति क्षितिरुच्यते ॥

ज्या देशांतील लोक संपन्न असून राजाला पुष्कळ कर मोठ्या खुषीनें देऊं शकतात तो देश 'भोग्य' होय. बंगाल व सिंध हे प्रदेश असे आहेत.

( ३ ) यस्यां नदाश्च नद्यश्च गिरिर्मध्येऽथवा बहिः ॥
विभक्तक्षेत्रसीमा या सीतागोचररक्षिणी ॥

ज्या देशाच्या मधोमध किंवा चारी बाजूंनीं डोंगर असून जेथें नद्या, नद पुष्कळ व मुबलक पाणी असणारे आहेत त्या प्रदेशाला 'सीतागोचररक्षिणी' म्हणावें. पंजाब असा आहे.

( ४ ) सरिदद्रिवनाद्येषु त्रासाद्यस्यां विशेज्जनः ॥
जनापश्रययोग्यत्वाद् अपाश्रयवती च सा ॥

नद्या, डोंगर व जंगल या ठिकाणीं त्रस्त झालेले लोक जेथें आश्रयाला येतात ( व सुखी होतात ) असा प्रदेश 'अपाश्रयवती' होय. माळवा हा प्रदेश याप्रमाणें लोकांना आश्रय देणारा आहे.

( ५ ) वनोपवनवत्यद्रिसरित्कुंजमनोहरा ॥
देहिनो रमयत्युर्वी या सा कांतेति कीर्तिता ॥

जंगलें, बागा, डोंगर, नदी कुंज वगैरेंनीं मनोहरपणामुळें जी जमीन लोकांना रमविते ती 'कांता' होय. बहार हा प्रदेश असा आहे.

( ६ ) यस्यां सदैव जायंते कलधौतादिधातवः ॥
लवणानि च भूयांसि प्राहुः खनिमती च तां ॥

ज्या प्रदेशांत स्वच्छ, मळकट अशा अनेक धातु व क्षार सांपडतात त्याला 'खनिमती' म्हणतात. कल म्हणजे कोळसा. वऱ्हाड हा प्रदेश अशा प्रकारचा आहे.

( ७ ) यात्यंतं नानुगृह्येत दंडकोशासनादिभिः ॥
स्फीतलोकाश्रया या च सा स्याद् भूरात्मधारिणी ॥

ज्या प्रदेशांतील लोकांना शिक्षा, द्रव्य, लष्कराचा तळ वगैरे गोष्टींनीं दाबांत ठेवतां येत नाहीं व जो देश धटिंगण लोकांचा देश आहे त्याला 'आत्मधारिणी' म्हणतात. महाराष्ट्र असा प्रदेश आहे.

( ८ ) प्रसिध्यंत्यसकृद्यत्र पण्योपक्रयविक्रयाः ॥
वणिक्प्रसाधितेत्युक्ता सा भूर्वणिगलंकृता ॥

ज्या देशांत वारंवार खरेदीविक्रीच्या उलाढाली होतात व जो व्यापाऱ्यांनीं गजबजलेला आहे त्या जमिनीला 'वणिक्प्रसाधिता' म्हणतात. गुजराथ काठेवाड असा प्रदेश आहे.

( ९ ) शाकाश्वकर्णखदिरश्रीपर्णीस्यंदनासनैः ॥
वेणुवेत्रशराद्यैश्च युक्ता द्रव्यवती च भूः ॥

जेथें बाभूळ, अश्वकर्ण, खैर, श्रीपर्णी(सावरी), स्यंदन(तिवस), असाणा, बांबू, वेत, देवनळ (बोरू) वगैरे झाडांनीं भरलेलीं जंगलें मुबलक त्या जमिनीला 'द्रव्यवती' म्हणतात. कोंकण व कर्नाटक असे हे आहेत.

(१०) यस्या जनपदाः साधु विभक्तास्त्यक्तविक्रमाः ॥
योगं यांति च मित्राणि स्याद् भूः सामित्रघातिनी ॥

ज्या प्रदेशांतील खेडीं दूर दूर, लोक गरीब व मित्रत्वाला चांगले त्या जमिनीला 'अमित्रघातिनी' म्हणतात. केरळ, मलबार हा प्रदेश या प्रकारचा आहे.

(११) न क्षुद्रा वंदिनो यस्यां दुर्गाः प्रत्यंतसंश्रयाः ॥
भूः सा श्रेणीमनुष्येति विनीतैराश्रितैर्जनैः ॥

ज्या देशांत वेश्या व भाट नाहींत, जिच्या हद्दीवर किल्ले आहेत, जेथील माणसें विनीत, विद्वान् व आश्रित आहेत ती जमीन 'श्रेणीमनुष्या' होय. आंध्र ( तेलंगण ) हा प्रदेश असा आहे.

(१२) मंत्रोत्साहादिवैमुख्याद् यस्यां सामंतभूभुजः ॥
भजंते सा स्मृता शक्यसामंता भूः समंततः ॥

मंत्र, उत्साह वगैरे नसल्यामुळें ज्यांत लहान राजे फार अशा जमिनीला 'शक्यसामंता' ( घेरतां येणारी ) असें म्हणतात. राजपुताना, मारवाड हे प्रदेश असे आहेत.

(१३) जीवंति क्षेत्रिणो यस्यां महानद्यादिवारिभिः ॥
तां नदीमातृकेत्याहुः अनपेक्षितवारिदाम् ॥

जेथील शेतकरी मोठ्या नदीच्या पाटावर निर्वाह करतात त्या प्रदेशाला 'नदीमातृक' म्हणतात. यांत पाण्याचा पुरवठा अनपेक्षित रीतीनें होतो. सिंध हा देश असा आहे.

(१४) निष्पद्यंतेऽधिकं यस्यां बीजान्युप्तान्ययत्नतः ॥
कृष्टानुपहतक्षेत्रधान्या सा धान्यशालिनी ॥

ज्या प्रदेशांत पेरलेलें बीं फार यत्न न करतां येतें. पेरल्यावर जेथील धान्य न्यावयाचें यासिवाय काम नाहीं ती जमीन धान्यशालिनी होय. मद्रासप्रांत असा देश आहे. तेथील जमीन भुसभुशीत असून आठ महिने पाऊस मिळतो; त्यामुळें कष्टाशिवाय पिकतें.

(१५) पर्यंतेष्वद्रयो यस्यां या च हस्तिवनाश्रया ॥
सा हस्तिवनवत्युर्वी भूभृतां शक्तिवर्धिनी ॥

जिच्या सभोंवार डोंगर व रानांत हत्ती पुष्कळ ती जमीन राजाची शक्ति वाढविणारी आहे. हिला 'हस्तिवनवती' म्हणतात. म्हैसूर प्रांत असा आहे.

(१६) दुष्प्रधृष्यैव या नित्यं विषमत्वादरातिभिः ॥
विषमाद्रिसरिद्गुप्ता सा सुरक्षेति भूः स्मृता ॥

जी फार उंच सखल असल्यामुळें शत्रूंनीं हल्ला करण्यास कठीण असते व जींत डोंगर, नद्या फार ती जमीन 'सुरक्षा' होय. नेपाळ, आसाम हे प्रदेश असे आहेत.

वर जे निरनिराळे देशांचे प्रकार सांगितले असे प्रदेश सर्वत्र असतात. एका प्रांतांत निरनिराळे जिल्हे व एका जिल्ह्यांत निरनिराळे तालुके व गांव या गुणांनीं युक्त सांपडतील. परंतु सगळे सोळा अठरा प्रकार एका ठिकाणीं असे पृथ्वीवर भरतवर्षाशिवाय इतरत्र नाहींत. उदाहरणार्थ इजिप्त नदीमातृक आहे, स्वित्झरलंड सुरक्ष आहे, वगैरे. या भरतखंडाचा हाच विशेष आहे कीं सगळ्या पृथ्वीवरील स्थिति येथें आहे, परंतु येथील सर्वसंग्रह इतरत्र नाहीं. म्हणूनच हा देश परमेश्वराचा लाडका असें समजण्यांत येतें.

पृथ्वी घट्ट झाल्यावर पहिल्यानें तयार झालेला भाग विषुववृत्तावर होता व ध्रुवाकडे तेव्हां पृथ्वी पातळ होती. पृथ्वी स्वतःच्या आंसाभोंवती गरगर फिरत असल्यामुळें ती पातळ होती तेव्हां विषुववृत्ताकडे तो पातळ भाग जास्त येऊन गोळे होऊन उडून जात असे व त्यामुळें तेथील भाग पहिल्यानें घट्ट झाला. हे गोळे कणीदार व रवाळ असतात. यांत रत्नें सांपडतात. वनस्पती अगर प्राणी सांपडत नाहींत. या भागांत वरचेवर फार उलथापालथी झाल्यामुळें हे गोळ्यांचे बनलेले दगड वांकडे तिकडे झाले आहेत व म्हणून यांना वेसर Metamorphic दगड म्हणतात. कृतयुग म्हणजे पहिलें युग म्हणून या दगडांना Primary असेंहि म्हणतात. यांत सत्वांचे अवशेष सांपडत नाहींत म्हणून यांना Archian, किंवा Azoic असेंहि म्हणतात. मद्रास, निलगिरी, बेझवाडा, ओरिसा व बुंदेलखंड या भागांत असले दगड आहे. त्यांपैकीं मद्रास, बेझवाडा व ओरिसा हा भाग आजतागायत समुद्राखालीं गेलेला दिसत नाहीं.

या कृतयुगांत तीन चक्रें झालीं. तीं रत्नचक्र, हेमचक्र व अश्मचक्र या नांवांनीं प्रसिद्ध आहेत. पहिले जे दगड तयार झाले ते रत्नचक्रांतील होत. यांत गोवळकोंडा वगैरे भाग अगदीं पहिले होत. रावणाची लंका असल्याच प्रदेशांत होती म्हणून तेथें सोनें व रत्नें विपुल होतीं. त्यानंतर हेमचक्र आलें वरच्या कवचाला चिरा पडून त्यांत सुवर्ण, रजत या धातूंचा रस त्यांत येऊन दसला व त्यांचा जो थर बनला त्याला धारवाड थर म्हणतात. धारवाड, कोलार हा प्रदेश या प्रकारचा आहे. सोन्याला अग्नीचें रेत किंवा वीर्य म्हणण्याचें कारण तें अग्नींतून पातळ होऊन बाहेर आलेलें दिसतें. सोनें, चांदी यांना धातु शब्द यासाठींच लावतात व या धातू वीर्यवृद्धिकर व आयुष्कर आहेत असें वैद्यशास्त्रहि सांगतें. हेमचक्रांतील प्रदेशांत सोनें चांदी या धातू पुष्कळ सांपडतात.

कृतयुगांतील दगडांचे दोन प्रकार आहेत. एक ओरिसा प्रांतांत सांपडतो. यांतील शिरगोळा ( Felspar ) हा पापड-(सोडा) खाराचा बनलेला आहे व दुसरा बुंदेलखंडांत सांपडतो. यांतील शिर-

गोळा पोटाशचा बनलेला आहे. या काळचे घट्ट दगड उरले व मऊ भाग वाहून गेला; यामुळें निलगिरी, पारसनाथ, अबू हे डोंगर उरले आहेत. मऊ भागाचे बुंदेलखंड वगैरे पठार बनले असून शिरांच्या नद्या (कावेरी, चंबळ) झाल्या आहेत. बुंदेलखंडाप्रमाणेंच बालाघाट, होतूर हे भाग ओरिसाचे व बेल्लारी, कडाप्पा हे निलगिरीचे आहेत. यापलीकडचा खोलगट भाग म्हणजे बुंदेलखंडाचा गंगा व यमुना यामधील भाग, ओरिसाचा बंगाल व निलगिरीचे कर्नाटक, सेलिम हे भाग होत.

धारवाड व अरवली हे भाग सारखे आहेत. अरवलीच्या डोंगरांत झिंदसंस्थानांत लवचीक दगड ज्यांना संस्कृतांत 'जलचामर' व इंग्रजींत Asbestos म्हणतात ते सांपडतात. हे दगड निलगिरींत पण सांपडतात. गोळ्यांचा प्रदेश म्हणजे गदग होय. येथील गोटे बर्फाच्या जोरानें वाहून आले असावे. नाहीं-तर इतका जाड म्हणजे चार हजार फूट खोलीचा थर बसण्यास फार वेळ लागेल. हजारीबाग, एरिण-पुरा, वेलोर इकडे अभ्रक फार सांपडतो. असले थर कोइमतूर, विजगापट्टण व कृष्णगडकडे आहेत. हा अभ्रक कारखान्यास उपयोगी पडेल असा व इतका आहे.

धारवाड हे थर गोदावरी, विजगापट्टण, हैदराबाद व गोदावरी आणि महानदी यांच्या दरम्यान नाहींत. हे फक्त धारवाड, बल्लारी, म्हैसूर, नेलोर, बालाघाट, नागपूर, जबलपूर, बहार, ओरिसा, हजारीबाग, रेवा, अरवली व शिलांग या भागांत आहेत. हिमालय व मध्यदेश यांच्या दोन्ही बाजूंस हे थर 'वैकृत' आहेत. त्यांत उत्तरेकडचे फार विघडले असून दक्षिणेकडे सिमला, जानपूर, दार्जिलिंग, सयाम या बाजूचे कमी विघडलेले आहेत. यांत सोनें, चांदी, लोखंड व तांबें या धातू सांपडतात.

सोनें ज्या गारगोटीच्या थरांत सांपडतें तिचे दोन प्रकार आहेत (१) पांढरी व (२) निळी. यां-पैकीं निळी जुनी असून पांढरी नवी आहे. कारण पांढरी गार निळ्या गारींत दाबलेली सांपडते. यावरून निळ्या गारेंतील सोनें जुनें व पांढऱ्या गारेंतील नवें असें ठरतें.

धारवाड हा भाग सुरकुत्यांनीं झालेला असून कडाप्पा वगैरे भाग उचलून वर आलेले आहेत. विंध्यसुद्धां असाच वर उचलून येत येत फार उंच वाढला होता. विंध्य मोठा होता तेव्हां हिमालय नव्हता व विंध्याच्या पायथ्याशीं खोल समुद्र होता. हा समुद्र गाळानें भरून जाऊन व हिमालय वर येऊन विंध्य हल्लीं ठेंगणा झाला आहे. कडाप्पाचे डोंगर जोरानें वर उचलले असून विंध्याचे डोंगर हळूच वर उचललेले आहेत. ही उचलण्याची क्रिया वेळोवेळीं झाली असून त्यामुळें थर वांकडेतिकडे फार झाले आहेत, हें खालील चित्रावरून कळेल.




कडाप्पाचे थर हिमालयांत नाहींत. विंध्याचे थर मात्र हिमालयांत सर्व लांबीभर तळाशीं आहेत व त्यावर हिमालयाचा गाळ बसलेला आहे. यावरून विंध्य पर्वत जुना असून त्याचे पायथ्याचे समुद्रांत हिमालय जन्मत होता असें दिसतें. विंध्य व सह्याद्रि हे पर्वत समकालीन असून यांच्या दगडांचे थर नर्मदा व तापी यांच्या तळांच्या व कोळशाच्या थरांच्या वर चढलेले आहेत. यावरून या कोळसे वगैरेंच्या थरा-नंतर हे ज्वालामुखींचे स्फोट होऊन हे डोंगर उत्पन्न झाले हें उघड आहे. विंध्य पर्वत झाला तेव्हां

पापघ्नी, शोण, नर्मदा; व सह्य झाला तेव्हां गोदा, कृष्णा, या नद्या बनल्या. बेळगांव, कलादगीकडचे तांबडे दगड व माती हीं ज्वालामुखींच्या आगीनें भाजून गेलेलीं आहेत.

तामस खडकावर पाऊस पडून त्याचा मऊ भाग नद्यांच्या पाण्यावरोबर वाहून गेला व त्यांतील कठीण टोले उरले; हे पुढें या खडकांना सुरकुत्या पडतांना खोलगट भागांत जाऊन बसले. या काळाला 'अश्मचक्र' म्हणतात. असा प्रदेश बल्लारी, कडाप्पा, रायचूर हा भाग आहे. या गोळ्यांवरूनच या काळाला अश्मचक्र असें नांव पडलें आहे. कोणी याला 'प्रावचक्र' असेंहि म्हणतात. या खडकांना राजस ( धुळीचे ) खडक म्हणतात.

कृतयुगांतील खडकांची जाडी सुमारें २६ हजार फूट असावी असा अंदाज आहे. यानंतर पृथ्वी बरीच निवली व तिजवर नद्या म्हणण्यालायक असे पाण्याचे ओघ निर्माण झाले. भारतवर्षांतील असे पहिले ओघ म्हणजे कावेरी व तापी होत. यासाठींच यांना पुराणांत 'सूर्यकन्या' असें नांव आहे. कृत-युगाचा भाग नकाशांत तुटक्या आडव्या रेघांनीं दाखविला आहे.

दुसरें युग म्हणजे त्रेतायुग होय. या युगांत शंखचक्र, मत्स्यचक्र व वृक्षचक्र अशीं तीन चक्रें झालीं. भारतवर्षांत या चक्रांत मोठमोठे ज्वालामुखी पर्वत झाले. सह्य व विंध्य हे असले पर्वत होत व म्हणून या पर्वतांना 'आग्नेय' पर्वत म्हणतात. ज्वालामुखी पर्वतांतून जो दगडांचा रस बाहेर पडला व त्याचे जे खडक बनले या खडकांना 'द्राविड' रसाचे झालेले खडक म्हणतात. त्रेतायुगाच्या प्रारंभीं ओरिसापासून रत्नाकरा – अरबीसमुद्रा – पर्यंत तापी नदी वहात असून सभोंवार मोठें जंगल होतें. या जंगलाच्या खालीं तामस खडक होते. ज्या ठिकाणीं पाणी होतें तेथें या काळीं शंख असून त्यांचें खडूचे खडक बनविण्याचें काम चालू होतें. तसेंच यानंतर या पाण्यांत हळूहळू मासेहि निर्माण झाले. खडू ज्या काळीं झाला त्या काळाला शंखचक्र व मासे झाले त्या काळाला मत्स्यचक्र म्हणतात. भरतवर्षांत या काळीं विंध्याद्रीचे उत्तरभागीं समुद्र होता व त्यांत हे थर पहाण्यास मिळतात. नंतर वृक्षचक्र झालें व या-काळांत गोंडवनापासून अरबस्थानापर्यंत तापी जात होती व तेथें दंडकारण्य नांवाचें मोठें जंगल होतें. वऱ्हाड वगैरे भागांत सांपडणारा दगडी कोळसा हा याच जंगलाचा झाला आहे. भुसावळखालीं १८ शें फुटांवर व नाशकाखालीं तीन हजार फुटांवर हा कोळसा आहे. या कोळशावर ज्वालामुखीच्या 'लाव्हा' नांवाच्या दगडी रसाचे तीन हजार फूट उंचीचे थर बसले आहेत.

त्रेता युगांतील खडकांचे थर सुमारें ३९ हजार फूट जाड आहेत. जेव्हां ज्वालामुखींच्या स्फोटांनीं सह्य पर्वत बनला तेव्हां पृथ्वीला सुरकुती पडून रत्नाकर ऊर्फ अरबी समुद्र खड्डा झाला व तापी त्याला मिळूं लागली. सह्य पर्वत उंच झाल्यावर गोदावरी व कृष्णा या दोन नद्या व विंध्य पर्वत उंच झाल्यावर नर्मदानदी निर्माण झाली. या नद्या पुराणांतरीं चंद्रापासून म्हणजे सूर्यापासून उत्पन्न झालेल्या नद्यांनंतर झाल्याचें वर्णन आहे. तसेंच दंडकारण्याला आग लागून तें जळल्याचें व त्या ठिकाणीं नवी जमीन वगैरे झाल्याचेंहि वर्णन पुराणकारांनीं लिहून ठेवलें आहे. या त्रेतायुगांतील खडकांत कोळसा, लोखंड, नीललोह, ( मांगानीज ) तांबें, कथील या जिनसा सांपडतात. धारवाड, जबलपूर, मिदनापूर ते जयपूर, रामगड ते बालाघाट या प्रदेशांत या काळचे खडक भरतवर्षांत आहेत. द्राविड प्रदेश कोणी कृष्णेपर्यंत व कोणी तुंगभद्रेपर्यंत असा जो भेद दाखवितात याचें कारण हा धारवाड भाग द्राविड नसून परंतु राजस असून या काळचा आहे हें होय. यांना इंग्रजींत Secondary असें म्हणतात. हा भाग चौकटींनीं दाखविला आहे.

यानंतर द्वापरयुग लागलें. या द्वापरयुगाच्या प्रारंभीं हिमालय समुद्रांतून वर येऊं लागला व पूर्व समुद्रापासून पश्चिम समुद्रापर्यंत पृथ्वीला मोठी सुरकुती पडली. ही सुरकुती म्हणजे शांघायपासून स्पेनच्या

टोंकापर्यंत असलेली डोंगराची मोठी ओळ होय. या द्वापर युगाचे सर्पचक्र, शृंगचक्र व दंतचक्र असे तीन मुख्य भाग आहेत. हा भाग आडव्या अखंड रेषांनीं दाखविला आहे.

नर्मदेपासून यमुनेपर्यंत जे थर पसरलेले आहेत त्यांजकडे नजर फेंकली म्हणजे द्वापरयुगांत शांतपणें समुद्राचे तळांत हे दगड बनत असल्याचें दिसतें. यांत वांकडे तिकडे किंवा उलथे पालथे थर नाहींत. हीच स्थिति डेहरी, हुशंगाबाद, ग्वाल्हेर, आग्रा येथें आहे. बिजावर थराचे दगड वाहून येऊन त्यांचे पन्ना व गोवळकोंडा, दक्षिणेंत कर्नूल, भीमा व गोदावरी आणि हिमालयांत चक्रत, सिमला, हैमंत, अटक व पंजल हे थर बनलेले सांपडतात. उत्तम चुन्याचे व रेतीचे दगड ग्वाल्हेर, दिल्ली, आग्रा इकडे मिळतात. यांच्यावर एका टोंकास मिठाचे ( शिवालकचे ) डोंगर व दुसऱ्या टोंकास कोळशाचे थर आहेत.

हिमालयांत तीन ते चार हजार फूट कडाप्याचे थर व त्यावर विंध्याचे एक हजार फूट थर आहेत. त्यांवर मिठाचा थर चिखलांत रुतलेला आहे. यावरून मीठ होत होतें व गाळ बसत होता अशी दुं क्रिया एकदम चालू होती असें दिसतें. हिमालयाचे पूर्वेस व पश्चिमेस आराका, योमाव व बलुचिस्थ यांत कोळशाच्या खालचे थर मुळींच नाहींत. तिबेटांत प्रवालमय (खडूचे) थर पंधराशें फूट, त्यावर पंधरा फूट गार व त्यावर सहाशें फूट चुनखडी आहे. काश्मीरची पंजल टेकडी, स्वाट, चित्रल, उत्तरशान येथें, हीच स्थिति आहे. यांच्या पलीकडे चीन, हजारा इकडे ज्वालामुखींचे स्फोट झाले आहेत. हा भाग मध्यंतरीं समुद्राच्या वर येऊन ज्वालामुखीचे स्फोट झाल्यावर फिरून बुडाला असावा. याच वेळीं दक्षिणेंत सह्य वगैरे पर्वत बनले व हिमालय वर आल्यावर सिंधु, ब्रह्मपुत्रा वगैरे नद्या निर्माण झाल्या व त्या कराची व कलकत्त्याकडे समुद्राला मिळूं लागल्या. याप्रमाणें विंध्य व हिमालय यांमधील सर्व भाग य द्वापर युगांत झाला.

द्वापर युगांतील विंध्य व हिमालय यांमधील गाळाचे थर सुमारें सत्तावीस हजार फूट आहेत. हे पाण्यांत निर्माण झाले म्हणून यांना जलज, किंवा सौम्य म्हणतात. ही जमीन सपाट आहे म्हणून हिला नागर ( नगर रचनेस योग्य ) असें म्हणतात. ही सुपीक असल्यामुळें हिला गौड म्हणतात. गौड म्हणजे गुड ( गूळ ) उत्पन्न करण्यालायक रूर्फ बागाइती जमीन होय. या थरांत प्राण्यांचे अवशेष सांपडतात म्हणून यांना 'सात्विक' असें म्हणतात.

द्वापरयुगांत सर्पचक्र आलें. यावेळीं हिमालय समुद्रांत होता. सरडे, पाकोळ्या वगैरे प्राणी या थरांत सांपडतात. यापुढें शृंगचक्र आलें. यांत हरणें, बकऱ्या वगैरे जनावरें सांपडतात. त्या नंतर दंतयुग आलें. यांत गेंडा, हत्ती, जिराफ, उंट, घोडा हीं जनावरें सांपडतात. या भागांत शिवथेरिअम नांवाचा प्राणी सांपडतो. याला चार शिंगे, व सोंड आहे. हा सशृंग व अशृंग प्राण्यांच्या मध्यें आहे. या भागांतील जमीन सपाट आहे. यानंतर हिमालय व विंध्य यांमधील मुलूख वर आल्यावर हिमालयांत भोंक पाडून भगीरथानें गंगानदी दक्षिणेस आणली व तिच्या काठीं नाना शहरें वसलीं. पुढें राजपुतान्यांतील समुद्र आटला व कच्छचें रण व राजपुताना हा रेताळ मुलूख निर्माण झाला. हा प्रदेश आहे.

येथून कलियुग सुरू झालें. या युगांत नकाशांत पांढरा ठेवलेला भाग उत्पन्न झाला. यांत पन्नास फूट खोलीवर हत्ती, घोडा, बैल, माणूस यांची हाडें सांपडतात. ह्या काळीं आर्यावर्त झालेला होता व गुजराथ व काठेवाड झाला. गुजराथ म्हणजे साबरमती, मही, नर्मदा व तापी यांचा गाळ. आधुनिक काळांत मुंबईजवळ महालक्ष्मीपाशीं, सिंधूचे मुखांजवळ, गंगेचे मुखांजवळील सुंदरवन, कृष्णा व गोदावरींचीं मुखें येथें नवी जमीन तयार होण्याचें काम आज चालू आहे. यांत अर्वाचीन झाडें, प्राणी, माणसें वगैरे पांच पन्नास फुटांत आंत सांपडतात. या युगांत इतकाच गाळ बसलेला आहे असें दिसतें.

सारांश भारतवर्षाची जमीन खालील प्रमाणें झालेली आहे.

**१ कृतयुग**—रत्नचक्र – मद्रास, बेझवाडा, ओरिसा, बुंदेलखंड.

हुमचक्र – धारवाड, अरवली, निलगिरी, पारसनाथ.
प्रावचक्र – कडाप्पा, बल्लारी, बाळापूर, होसूर, बंगाल, कर्नाटक.
२ त्रेतायुग— वृक्षचक्र – गोंडवण, राजमहाल, छत्तिसगड, छोटानागपूर, सातपुडा.
शंखचक्र – तालचेर, दामोदा, पांचेट, जबलपूर, रामगड, मिदनापूर.
आग्नेय – सह्य, विंध्य.
मत्स्यचक्र – त्रिचनापल्ली, पांदेचरी, भडोच, मंडालेश्वर.
राजस – दक्षिणचे पठार, पंजाब, काश्मीर, तिबेट.
३ द्वापरयुग—सर्पचक्र – मध्यभाग, सिंध, आसाम.
शृंगचक्र – कडलोर, तंजावर, कोंकण, हिमालय.
दंतचक्र – आर्यावर्त, लवणासुर ( शिवालिक ).
४ कलियुग—प्राचीन – पोरबंदर, राजपुताना, रण, गुजराथ.
अर्वाचीन—नर्मदा, तापी, सिंधु, गंगा, गोदा वगैरे नदीमुखें सुंदरवनादि त्र्यक्षभाग.

हिंदुशास्त्रकार सात धातू, सात उपधातू, सात रत्नें व पांच महार्घ्य ( मूल्यवान् ) वस्तू असें सांगतात. या जिनसा अशा :—

धातु — सुवर्ण, रजत, ताम्र, पारद, त्रपु, सीसक व लोह ( कृष्ण, नील, श्वेत ).
उपधातु — हरताल, मनःशिला, अभ्रक, सोमल, मोरचूत, गंधक व अंजन (सुरमा).
रत्नें — वज्र, नील, पुष्पराग, गोमेद, पाच, लाल व स्फटीक.
महार्घ्ये – मौक्तिक, प्रवाल, शंख, शुक्ति, गजदंत.

या जिनसा हिंदुस्थानांत खालीं लिहिल्या ठिकाणीं मिळतातः-

सोनें – लंका, म्हैसूर, धारवाड, सांगली, हिमालय.
चांदी, शिसें – बल्लारी, भागलपूर.
तांबें – नेपाळ, अजमीर, कामरूप, बंगाल.
कथील – बंगाल, मध्यप्रांत.
लोखंड – सांवतवाडी, म्हैसूर व वऱ्हाड.
अभ्रक – चांपानेर, हजारीबाग, एरणपूर, वेलोर, कोईमतूर.
गंधक – सिंगभूम, हिमालय.
मनशीळ, हरताल, सोमल – नेपाळ, हिमालय.
मोरचूद – अजमीर, मिर्जू.
रत्नें – पन्ना, गोवलकोंडा.
महार्घ्य – रत्नाकर ( आरबीसमुद्र ).
गजदंत – म्हैसूर.
स्लेट – विंध्य, शहाबाद.
जलचमर ( आस्बेस्टास ) – झिंद, ग्वाल्हेर.
कलधातु ( कोळसा ) – वऱ्हाड, ब्रह्मदेश, हिमालय.
मीठ, सैंधव – ( शिवालिक ) लवणासुर.
पापडखार – लोणार ( वऱ्हाड ), माळवा, मध्यप्रांत.
कुरुंद – धारवाड, कलादगी, झांशी.
चिनीमाती – जबलपूर, कटनी.

शंखजिरें – जबलपूर, कटनी.
पाषाण – विंध्य, सह्य ( कोरीव लेणी करण्यालायक )
रेतीचे दगड – झांशी , दिल्ली,
चुन्याचे दगड—पोरबंदर, कटनी.

[ खनिशास्त्राची अर्धवट पोथी रा. वझे यांस अजमीरकडे तांबेंकथलाच्या खाणींचें काम करणाऱ्या माणसाजवळ आढळली. पोथी शके १७७२ त लिहिलेली आहे. ती संस्कृतांत आहे. पोथी अर्धीमुर्धी असल्यामुळें ग्रंथकर्त्याचें नांव नाहीं. ही माहिती रा. वझे यांजकडूनच मिळाली आहे. त्या पोथींतील माहिती व भूगर्भशास्त्रांतील आधुनिक शोध यांच्या आधारें हा लेख लिहिला आहे —संपादक म. सा. पत्रिका. ]

---

# कोंकणी गाणीं

[ सं. महादेव विनायक डोंगरे, महाड. ]

"हीं गाणीं जेव्हां बरीचशीं गोळा होतील व लोकांच्या तोंडांत बसलेलीं गाणीं आणि नागर वाङ्मयांतील लोकांच्या तोंडीं असलेला भाग हीं प्रत्यक्ष अवलोकन करून नोंदलीं जातील तेव्हां प्रचलित वाङ्मयापैकीं समाजांत कोणतें वाङ्मय जिरून पचनीं पडतें याची बरोबर कल्पना होईल, व लोकांच्या काव्यग्राहकतेविषयीं महत्त्वाचे नियम हातीं लागतील. हा एक मोठा अभ्यास आहे." डॉ. केतकर

## स्त्रियांचीं धार्मिक गाणीं

### १ तुळशीचें गाणें

तुळशी तुळशी तूं माझी काशी । नगरांत होते ऋषीकेशी
नगरराज्य कोणाचं । थोर रामरायाचं
रामानीं आणिली । लक्ष्मणानीं लावीली
सितेनीं प्रतिपाळण केलं । तसं तुम्ही आम्ही करावं ॥

२

तुळशी तुळशी तूं माझी काशी । तिळातांदुळाच्या राशी
अरे अरे ब्राह्मणा । तूं कुठें जाशी !
हरीजवळ काय आहे । पिवळा पीतांबर नेसला आहे
गरुडावर बसला आहे, । कुंकवाचा सडा
हळदीचा पुडा । माझा चुडा । अक्षय राहो ॥

३

तुळशी तुळशी तूं माझी काशी । वृंदावनीं एकादशी
नांव घ्यावं तुळशीचं । पातक जाई जन्माचं ॥

४

तुळशी तुळशी तूं माझी काशी वृंदावनी एकादशी
नांव घ्यावं तुळशीचं पातक जाई जन्माचं
अरे अरे रामा तुझ्याजवळ काय आहे
पिवळा पितांबर नेसला आहे गरुडावर बसला आहे
हळदीचा सडा कुंकवाचा पुडा दे जन्म अक्षयी दे माझा चुडा

[ ह्यांना गाणीं म्हणण्यापेक्षां पद्यकहाण्याच म्हणावें. सकाळीं स्नानानंतर तुळशीला पाणी घालतांना हीं म्हणतात. ]

५ स्नानानंतरचें गाणें

खळखळ गंगा वाहते । मला स्नानाला बोलावीते
चला जाऊं स्नानाला । ऋषीदर्शन घ्यायाला
असे साधू जे पहावे । मस्तकीं चरण वंदावे
रामनामाची बुचकळी । आणिक नलगे ती आंघोळी
रामनाम स्मरा वाचें । त्यांत तुमचें काय वेंचे
पार्वती म्हणे गा देवा । एवढा मंत्र मला द्यावा
येतां जातां होइल ज्ञान । अंतरीं ध्यान रामाचें ॥

६

खळ खळ गंगा वाहते । मला स्नानाला बोलावीते
चला जाऊं स्नानाला । ऋषीदर्शन घ्यायाला
असे साधू जे पहावे । मस्तकीं चरण वंदावे
रामाचें विमान आलें । रघुनाथाचें दर्शन झालें
वाजती शंख घांटा । मी जातें वैकुंठा
भवानीशंकरा हात दे । उमा माये परतून पाहे
थोर पात्र गंगेचें । एवढें पुण्य आंग धुतल्याचें
पडदणीची घातली घडी । बरवी थडी गंगेची
पडदणीचा घातला पिळा । बरवी लीळा गंगेची
पडदणीचा घातला घाव । जागे झाले वैकुंठींचे माधवराव ॥

७ माघस्नान

प्रथम वंदूं गजानन । चौदा विद्यांचें निधान
भीमातीरीं माघस्नान । पुंडलीक करीतसे
धर्मराजाची द्रौपदी । माघस्नान करती विधी
जवळ उभ्या रिद्धी सिद्धी । गोविंद तिथे तिष्ठती
माघस्नान झालं पूर्ण । म्हणती सांगावं मेहुण
एवढें संधान लावून । आपण निघाले द्वारके
अर्जुन म्हणती रथ आणा । हत्ती घोडे तो पाळणा
घाव घातला नीशाणा । सहदेव जाऊं द्या द्वारके
सहदेव बैसले रथीं । पुढे वाजंत्री वाजती
नमस्कारुनी रमापती । हर्षें चित्तीं निघाले
मार्गी जातां शकून झाले । सहदेव आनंदांत डोले
लक्ष्मीसहित गोविंद आले । ऐसें मनीं भासलें
पाहूं द्वारका पट्टण । आनंदलें त्रिभुवन
लक्ष्मीसहित नारायण । सिंहासनीं बैसले ॥

नकुल सहदेव कारभारी । अर्जुन तिथें कारागिरी
रंगभूमिका रेखील्या । भीमें मांडूनिया पाट
लावले समयांचे थाट । केले उदबत्त्यांचे घाट
लावियले परोपरी । स्नान करा यदुवीरा
राधेसहित दामोदरा । नेसले पाटाऊ पीतांबर
एका आसनीं बैसले । रायी नै[illegible]ाटावर
जवळ बैसले मुरारी । सत्यभामेशीं श्रीहरी
वृंदेसहित गोवर्धनधारी । त्याजवळ दूसरी
पंचामृतें वाढीलीं । घारगे वडे पुरणपोळ्या
पुऱ्या वाढील्या वरव्या । तिथें जिलब्या सांवळ्या
खाज्या करंज्या वाढील्या । घावन पातोळ्यांच्या ओळी
तिथें वाढली खापरपोळी । भर्जी तळीलीं पीवळीं
तिथें सांधणें वाढीलीं । वडे केले चोखुट*
लाडू बुंदीचे गोमट[१] । तिथें चिरोटे धाकूट
आणि आनरसे वाढीले । मांडीयाच्या घडीवरी
बरवी शोभे गुरवळी । तारफेणीच्या शेजारीं
साखरफेणी वाढीली । काढला नारळाचा चऊ (चव)
पक्वान्न केलेसें मऊ । गणोवाला मोदक
साखरभात वाढला वरा । वांगीयाचा तो दूसरा
आणि केशरी तिसरा । चवथा वाढीला साळीचा
वरण वाढीलं परोपरी । वडा वाढीला कुसरी
त्याजवळ दुसरी । भातवडी कुरवडी । खिरी यांच्या परी
मधुसूदनाच्या शेजारीं । मनकर्णिका बैसली
उमा म्हणे पुरुषोत्तमा । जानकीशीं मेघःश्यामा
सीता म्हणे हो श्रीरामा । आपण येथें बैसावें
सोळा सहस्र शेजारीं । आपण बसले कंसारी
यादव मूर्ती साजीरी । दिसे गोजिरी सर्वांसी
गंधाक्षता तुळसीमाळा । घाली श्रीकृष्णाच्या गळा
आपण घनःश्याम सांवळा । अनंतरूपी अवतरला ॥
हळदीकुंकवाच्या परी । गंध रेखिलें केशरी
सुगंध सुमनें नानापरी । पूजिल्या नारी कृष्णाच्या
धूपदीपाच्या परी । वाद्यें वाजतीं सुस्वरी
हरी म्हणे हो सुंदरी । आतां लौकर वाढावें

* सुरेख, चांगले, १ सुंदर.

शाखांच्या वाढल्या परी । डावीकडे कोशिंबिरी
लाल लोणच्याच्या परी । आणि करंबुळ्या[1] रायतीं
केल्या सांबाऱ्याच्या परी । आमटीं वाढीती कूसरी[2]
साखर वाढीली रायपुरी । घृत वाढीतो कूसरी
धर्मराज आपण । धर्मराज उदक सोडी
भीमसेन हात जोडी । अर्जुन म्हणती बांधली घोडी
स्वस्थ चित्त जेवावें । भोजन करून उठले हरी
येऊन बसले पाटावरी । उष्णोदक त्यांच्या हातावरी
घाली द्रौपदी सुंदरी । कर्पूराची ती सुपारी
पानें आणिलीं जंजीरी । मोतीयाचा चुना वरी
वेळा लवंगा सोन्याच्या । कातगोळ्या केल्या यंत्रीं
जायफळ जायपत्री । तेरा जणांची
असे सामित्री । बरवा रंग शोभतो
विडे केले परोपरी । तबकीं भरले ते जरी
म्हणे द्रौपदी सुंदरी । वहिनी आतां विडे घ्या
दिंडं सोडलीं परोपरी । शेले दिले जरतारी
कंचुकी घड्या उचलुनी जरी[1] । नेसल्या नारी कृष्णाच्या
आतां चला हो लौकरी । बोले रखमाई सुंदरी ।
संत उभे महाद्वारीं । दर्शन दिलें पाहीजे
पाकशाळेंत गेले हरी । म्हणती निरोप द्यावा जरी
म्हणे द्रौपदी सुंदरी । स्वस्थ चित्त असावें
मग ती लागली चरणां । कृपा करी नारायणा
चुकवी संसार बंधना । अक्षय राज्य तुमचेंची

[ गाण्याचें नाव 'माघस्नान' असलें तरी स्नानानंतर नेहमीं हें गाणें म्हणतात. ]

८ शंख

आदित्याचा शंख । अनंताचा वेश
शंख भीमाचा हेरसा । पांढरा कमंडलू
त्यानें गर्जे भूमंडलू । मार्तंड ऋषीचें चिंतन केलें
अवचित स्मरल्या पाप जाय । कलंकी स्मरल्या दोष जाय
गांधारी स्मरल्या सौख्य होय । कुंती स्मरल्या मुक्त होय
सीते स्मरल्या श्रीराम भेटे । ऐसीं अठरा बारा ध्यानें
सहा शंख सहा पुरुष । देव आले देवभूमीं

---

१ बारीक आंबे, २ कौशल्यानें

१ जरीच्या ( घड्या )

पटू दिले असुचा वर्ण । सोनसळी काया
हिऱ्याचे दंत । पोवळ्याचे ओठ
माणकाचे डोळे । मोत्याचे अलंकार
सोन्याचीं शिंगें । रुप्याचे खूर
तांब्याची पाठ । काशाचा अभिवर्ण
गंगा वर्ण । ऐसे कोण बोले
व्यास ऋषी बोले । व्यास माता बोले
व्यास ऋषीश्वर बोले । साठ तीनशें संवत्सर
कपिला रुपिला गाईचीं गोधनें । दान देईजे कुठें देईजे
अच्युतीं नारायणीं । त्रिवेणी संगमीं
गयागदाधरीं । कृष्णामहाबळेश्वरीं
शेवाळी मुद्राळी । हरिद्वारीं कुरुक्षेत्रीं
तुंगभद्राहरिहरीं । शिवकांचीं विष्णुकांचीं
अरुणोदयी पिला मोरेश्वरी । दुःख दारिद्री
स्त्रियांच्या स्त्रीमूर्ती । गौरीमोरी माध्याह्नीं
कावेरी रंगनाथीं । नेत्रपती वैकुंठीं श्रीपती
आदि आदि अनंत जन्मीं । पापनाशनी नोहे पाषाणी
मुक्काम अंबिकेश्वरीं । सेतूबंध रामेश्वरीं
द्वारकेस गेल्याचें पुण्य घडे । त्रिकाळ शंख जपला तर
काय पुण्य घडे ? । विडी विण्‌किणी फिटे
ऋणाचे पांग फिटे । दिल्या वृत्तीचें दान
गंगाभागीरथीचें स्नान । विष्णु चरणीं मुक्ति होय

## भोंडल्याचीं गाणीं

[ हीं गाणीं हस्तनक्षत्रांत सोळा दिवस मध्यें मोंडला ठेवून भोंवतालीं घेर धरून मुली म्हणतात. यांस हातग्याचीं गाणीं असेंहि म्हणतात. हा प्रघात कोंकणापेक्षां देशावरच विशेष प्रचलित आहे. ]

भोंडला । भावें भावें । करूं पेवें पेवें ।
कांडा तिळ बाई । तांदुळ घ्या । आमच्या आया । तुमच्या आया
खातिल काय । दूध उंडे उंडयाची । लागली टाळी ।
आयुष्य । दे रे बा माळी । माळी गेला शेता भाता ।
पाऊस लागला येतां जातां । पड पड पावसा थेंबा थेंबी ।
थेंबी थेंबी आल्या लोंबी । आल्या लोंबी अंखणी ।
अंकणा तूझी सात कणसें । हतग्या तूझी सोळा वर्षें ॥

२

आला चेंडू । गेला चेंडू । रामा चेंडू । झुगारिला ।
आपण चाले हत्ती घोडे राम चाले पायी ।
एवढा डोंगर शोधीला राम कोठें नाहीं ।
राम ग वेचीतो कळया । सिता ग गुंफिते माळा ।
आल्या ग लगीन वेळा । आकाशीं घातीला मंडप
धरणी घातलं बोहलं । धरलन् धरती बसले पारती
पारतीन् पारती । तिळ बाई राळा । तिळबाई राळा मुंजाबाळा
मुंजा बाळाची मुंज कदोरी । तीच दोरी सांवत मारी
सांवता सांवता पर्वतकाठ । पर्वतकाठाचा शिंपा बाई राळा
शिंपाबाई राळ्याचा आणा दोर । आणा दोर बांधा चोर
झाड झपका फूल टपका ॥

३ जातें

अक्कण माती चिक्कण माती । खळगा जो खणावा ।
अस्सा खळगा सुरेख बाई । जातं जें रोवावें ।
अस्सें जातें सुरेख बाई । पीठ जें दळावें ।
अस्सें पीठ सुरेख बाई । करंज्या ज्या कराव्या ।
अश्शा करंज्या सुरेख बाई । माहेरीं धाडाव्या ।
अस्सें माहेर सुरेख बाई । खायाला मीळतें ।
अस्सें आजोळ सुरेख बाई । खेळाला मीळतें ।
अस्सें सासर द्वाड बाई । कोंडूनी मारीतें ॥

## घरोघर म्हणावयाचीं गाणीं [मंगळागौरीच्या वेळीं]

"पोवाडे लावण्याच्या काळांत अप्रसिद्ध अशीं स्त्रियांचीं गाणीं पुष्कळ जन्मास आलीं व स्त्रियांच्या मुखांतूनच प्रसार पावलीं. जात्यावरील ओव्या, झोपाळ्यावरच्या ओव्या, भोंडल्याचीं गाणीं, खेळांतील गाणीं, लग्नांतील वगैरे उखाणे यांमधून स्त्रियांची विशिष्ट मनोवृत्ति व काव्य दिसून येऊं लागलें. बालपणाच्या कल्पना आधींच तरळ, त्यांतून मुली एकत्र जमल्या म्हणजे त्यांच्या वक्तृत्वाला, कोट्यांना व बालिशपणाला अधिकच हुरूप चढे. घरांतील प्रत्येक गोष्ट, प्रसंग, घरांतल्या माणसांसंबंधीं आपले विचार, आजूबाजूच्या परिस्थितीसंबंधीं विधानें मनमोकळेपणानें मुली करूं लागल्या व हें सर्व साहजिकच यमकप्रासमय वृत्तबद्ध भाषेंत गळ्यावर म्हणूं लागल्या. खेळण्याचें वय गेलेलें नसल्यामुळें सासरची भीति, माहेरचा ओढा व त्याच वृत्तीस अनुरूप अशा आकांक्षा त्या वेळच्या ओव्या-गाण्यांत दिसून येतात. पातिव्रत्याचें महत्त्व आर्य स्त्रियांच्या हाडीं मासींच खिळलें गेलें असल्यामुळें, पुरती ओळख न झालेल्या पतीसंबंधीं आदर,

व पूज्यभावना, ओव्या-गाण्यांतून व नांव घेण्याच्या उखाण्यांतूनहि दिसून येतात. रमणी-हृदय व्यक्त करणाऱ्या ह्या भावगीतांना योग्य उत्तेजन मिळायला हवें होतें."

—कै० सौ० मनोरमाबाई रानडे, बी. ए.

## १ वईवरचें कालें

वईवरलं कालें । साजिर ग सये । गोजिर ग ।
चिमणाबाई[1] सुगरिणिन । तोडलन् ग सये । तोडलन् ग ।
त्याचीच भाजी । रांधलन् ग सये । रांधलन् ग ।
आपल्याच पतिला । वाढलन् ग सये । वाढलन् ग ।
तिचाच पती । रुसला ग सये । रुसला ग ।
शेजारच्या घरीं जाउन् । बसला ग सये । बसला ग ।
(चाल) शिंप्याकडला शेला ।
माळ्याकडला तूरा ।
तिनें आपल्या पतिला : समजावला । सये समजावला ॥
[ हें गाणें सर्व मुली घेर धरून म्हणतात ]

१ ह्या ठिकाणीं प्रत्येक मुलींचें नांव घालून सर्वांवर पाळी येईपर्यंत हें गाणें म्हणतात.

## २ तारूं

गुलाबाच्या[1] फुलाचं तारूं गेलं । तारूं गेलं हो बंदरीं
त्याचं मोल् कोण करी । मोल् कोण करी हो । नारायणराव करी ।
त्यांनीं हो मोडीलि । जोशांचि खोलि हो । जोशांचि खोलि ।
जोशांचि खोलि मोडुन् । यशवंत झाले हो । यशवंत झाले ।
लक्षुम्‌बाइ राणिच्या । मंदिरांतुन् गेले हो । मंदिरांतुन् गेले ।
लक्षुम्‌बाई राणी । पुसु लागली हो । पुसु लागली ।
एवढा वेळ तूला । का लागला । का लागला ।
वाकिंचा जोड तुम्हि । कां मोडिला । कां मोडिला ।
तोडयांचा जोड तुम्हि । कां घडविला । कां घडविला ॥

१ येथें कोणत्याहि फुलाचें नांव घेऊन हें गाणें म्हणतात.

## ३ रुष्ट राधा

राधा रुसली । सुंदरी । समजावीतो हरी । कीं राधे । चल् ग मंदीरीं ॥
तोडे[1] ठेविले । तबकांत माझ्या गळ्याची शपथ । राधे । घाल ग पायांत ।
राधा रुसली । सुंदरी । समजावीतो हरी । कीं राधे चल् ग मंदीरीं ॥

१ येथें कोणत्याहि दागिन्याचें नांव घेऊन हें गाणें म्हणतात.

### ४ चिमणीचें लग्न

माझ्या चिमणीचं : लगीन ग । वऱ्हाडि कोणू कोणू येणें ।
माझ्या चिमणीचं : लगीन ग ॥ धृ० ॥
आई म्हणते : मी आई । करीन् मांडवांत घाई । माझ्या चिमणीच० ॥१॥
बापू म्हणतो : मी बाप । खर्चिन् हुंडा लाख । माझ्या० ॥२॥
चुलता म्हणतो : मी चुलता । येइन् पोळी पुरता । माझ्या० ॥३॥
चुलती म्हणते : मी चुलती । येइन् करंजीपुर्ती । माझ्या० ॥४॥
भाऊ म्हणतो : मी भाऊ । देईन् नवरा पाहुन् । माझ्या० ॥५॥
भट म्हणतो : मी भट । धरीन अंतरपाट । माझ्या० ॥६॥
भटीण म्हणते : मी भटीन् । सगळ्याच पोळ्या लाटीन् । माझ्या० ॥७॥

### ५ रुसलेली सून

सासुरवाऽऽशी । सुन रुसून बसली कैशी ।
यादव राऽऽया । राणि रुसून बसली कैशी ॥ धृ० ॥
सासू गेली । समजावयाला । ऊठ उठ मुली। चल घराला ।
मी आपला संसार । देतें तूला । तुमचा संसार नक्को मला ।
मी नाहीं यायची। तुमच्या घराला । सासुर० ॥ १ ॥
सासरा गेला । समजावयाला । ऊठ उठ मुली । चल घराला ।
दौत लेखणी । देतों तूला । दौत लेखणी नक्को माला ।
मी नाहिं यायची । तुमच्या घराला । सासुर० ॥ २ ॥
नणंद गेली । समजावयाला । उठा उठा वहिनी । चला घराला ।
मी आपली सुपली । देतें तुम्हाला । तुमची सुपली । नक्को माला ।
मी नाहिं यायची । तुमच्या घराला । सासुर० ॥ ३ ॥
दीर गेला । समजावयाला । उठा उठा वहिनी । चला घराला ।
लाल चेंडू । देतों तुम्हांला । लाल चेंडू नक्को माला ।
मी नाहिं यायची । तुमच्या घराला । सासुरवासी० ॥ ४ ॥
पती गेला । समजावयाला । ऊठ उठ राणि । चल घराला ।
लाल चाबूक देतों तूला । उठ्ली ग उठ्ली । खड्बडून ।
पदर घेतलान् । आवरून । सासुरवाऽऽसी । सुन घरासि ।
आली कैसी । यादवराऽऽया । राणि घरासि । आली कैसी ॥ ५ ॥

### ६ कुऱ्हाडी

घ्या घ्या कुऱ्हाऽऽडी । चला जाऊ डोंगरीं ।
चंदनि वृक्ष तोडावया । तोडावया ।
गणपतिचे देउळ तिथें बांधावया । बांधावया ।
गणपतिच्या देवळांत् राजा मोर नाचे । राजा मोर नाचे

आलि आलि सरस्वती । टाकीले फासे । टाकीले फासे ।
घ्या घ्या कुऱ्हाऽऽडी । चला जाऊ डोंगरी ॥

७

आलेगांव नगरी । पालेगांव नगरी ।
भोवतालुन् तगरी । काटयाचि कुलपं । मोत्याची झुलपं ॥
आम्ही लेकी थोराच्या । कानीं बुगड्या मोत्याच्या ।
पिकलीं पानं खाऊं । आम्ही देशात्र जाऊं ॥

८ 'अरडी परडी'

अरडी बाई परडी ग । परडी एवढें फूल ग
दारीं मूळ कोण ग । दारीं मूळ सासूबाई
सासूबाइनि काय जोड आणिला
पाटल्यांचा जोड त्यानि आणिला
पाटल्यांचा जोड मी घ्यायची नाहीं हो ।
सासूबाईसंगें मी जायची नाहीं ॥ १ ॥

आरडी बाई परडी ग । दारीं मूळ कोण ग
दारीं मूळ मामंजी । मामंजींनि काय जोड आणिला
वाकींचा जोड त्यानि आणिला । वाकींचा जोड मी घ्यायची नाहीं हो।
मामंजीसंगें मी जायची नाहीं ॥ २ ॥

आरडी बाई परडी ग । दारीं मूळ कोण ग
दारीं मूळ भाऊजी । भावजींनी काय जोड आणिला
गोटांचा जोड त्यानि आणीला । गोटांचा जोड मी घ्यायची नाहीं हो ।
भावजीसंगें मी जायची नाहीं ॥ ३ ॥

आरडी बाई परडी ग । दारीं मूळ कोण ग
दारीं मूळ वन्सबाई । वन्सांनीं काय जोड आणली
तोड्यांचा जोड त्यानि आणीला । तोडयांचा जोड मी घ्यायची नाहीं हो ।
वन्ससंगें मी जायची नाहीं ॥ ४ ॥

आरडी बाई परडी ग । दारीं मूळ कोण ग
दारीं मूळ पतीराज । पतीनीं काय जोड आणीला
हिऱ्यांचि कुडिं त्यांनि आणिली । हिऱ्यांचि कुडीं मी घेईन ।
पतीच्या संगें मी जाईन ॥ ५ ॥

[ स्त्रियांचा स्वभावसहज दागिन्यांचा लोभ यांत दिसून येतो ]

९ खुरचन् मिर्ची

खुरचन् मिर्ची जाशिल कशी ।
आई[1] मारीते बरं करीते
खुरचन् मिर्ची जाशिल कशी ॥

[ १ ह्या ठिकाणीं सर्व नातेवाईकांचीं नांवें घेऊन हें गाणें म्हणतात. हें गा म्हणतांना फेरामधून वाट सांपडल्यास निसटून बाहेर पळावें. पळतां न आल्यास मात्र त्या मुलीला पतीचें नांव घ्यावें लागतें. मुलींच्या खेळांतील ही एक नेहमींचीच गोड शिक्षा आहे.

१० कळंब

खुळ खुळ कळंबाची डहाळी ग । खुळ खुळ कळंबाची डहाळी ग ॥
कृष्ण खेळे चेंडू फळी ग । कृष्ण खेळे चेंडू फळी ॥
तिथुन चेंडू झुगारिला हो । तिथुन चेंडू झुगारिला ॥
कळंब खांदी आडकला वाई । कळंब खांदी आडकला ॥
कळंब खांदी कडाडली बाई । कळंब खांदी कडाडली ॥
देवकाबाई रडुं लागली हो । देवकाबाई रडुं लागली ॥
रडुं नका रडुं नका देवकाबाई हो । रडुं नका रडुं नका देवकाबाई ॥
तुम्हांला कृष्ण झाला नाहीं हो । तुम्हांला कृष्ण झाला नाहीं ॥
घरांत बिंदोल्याचा जोड । कृष्ण माझा न्यायला नाहीं ॥
कृष्ण माझा न्यायला नाहीं हो । डोळा भरुनि पाहिला नाहीं ॥
खुळ खुळ कळंबाची डहाळी ग । खुळ खुळ कळंबाची डहाळी ॥

११ झिम्मा

सरसर गोविंदा येतो । मजवर गुलाल फेकीतो
त्याच्या गुलालाचा मार । आमच्या वेण्या झाल्या लाल
आमच्या वेण्या मोकळ्या । सोनियाच्या साखळ्या
घडव घडव रे सोनारा । माणिक मोत्यांचा डोल्हारा
डोल्हाऱ्याला खिडक्या । आम्ही घालूं फुगड्या ॥

१२ भोवर भिंडी

भोवर भिंडी भोवरी नाचे । आरसा खिडक्या नक्षीदार ।
कोणा एका वाटे गेली नार । सोनसाखळीचा झाला भार ।

१३ गोफाचें गाणें

धिन्नक धिन्नक धिन्नाडे । तो हरी नाचे आम्हांपुढें ।
सावळ्या हरीची पिचकारी । कृष्ण राधेचा कैवारी ।
लाल पदर हाती धरितो । गंडेरी गोफ आम्ही विणितों ।

# कथा

[ संग्राहक, ना. गो. चापेकर ]

[ ही कथा एका कातोड्यानें सांगितली. ती त्याच्याच भाषेत दिली आहे. ]

एक धर्मपूर नगर. या नगरांत व्हानखीत राजा राज्य करी हता. तहां त्याने दाराशी अहंकाराना झाड हता. त्या नगरांत माणसाला मुर्त नाहीं. त्या राजानी आस्तुरी शरमाकांता. तिनी पोटीं बाल जन्म लिधा. त्याना नांव जबनकेत. तहां बारा दिवसांत त्या बालनी आईस मरनी. तहां राजा विचारांत पडना कीं ए बालानी सोय किशी करवा. तहां नगरांतल्या लोकांहीं विचार काय करा कीं राजाला ठार मारूं ने राज्य लेवूं. तहां सर्व लोक जमीहीन ते राजाने राजवाड्यांत ग्यात. तहां राजाला काय सांगह कीं तुला ठार मारीहीन राज्य लेवूं. मग राजा काय आखह कीं, माना लहान बाळ आहा मला मारसा नको. तर माझे नगरांतून मी निंगी ग्या. तर तो निंगीन कोसभर जाग्यामा ग्या. तहां देह अहंकाराना झाड नाहींशी हीना. तहां ते नगरांत मुर्तु पुन्हा हिनी. तहां राजा निगीहीन भयिसरवनांत ग्या. जातां जातां दिवस अस्मानी ग्या. तहां लहान बाल रडूला लागना. तहां राजा काय बोले कीं याला खावला काय घालूं. वनांत रात्र हिनी. वस्ती कशी करवा. एक चंदनाना मोठा इरिक्षा (वृक्ष) हता. त्याने बुडाशीं राजानें वस्ती करी. तहां रात्रीने अमलांत भयंकर सैतन आना. मोठ्यान् तो किंकाळी मारुला लागना. तहां राजा घाबरना. आतां भूत खाहां किं काय करह. भूत जंगलांतून हिंडत हिंडत राजाने कडेला ग्या. तहां राजानें त्याला हेरल्या बरावर राजाना सामर्थ्य खलास हीना. आतां इथ बाळाला खा का माला खा. तहां भूत काय बोले कीं तूं कोण आहास. राजा काय आखह की मा राजा स्वतःच आहा. भूत बोले तूं राजा आहास मा तुला खां. राजा त्याला आखह की माला खाशील नको. भूता तुला मी वळखां. तूं मुक्ताबाई सैतन आहांस. जर माला आशीर्वाद दीनास तर तुला जागा लंकाभवानीनी देवळांत मी दिईन. तहां भुतानी सांगह कीं राजा तुला सूट. ती रात निगी ग्यी. ते वनांतून निंगीनी दुसरे ऐरवणांत ग्या. तहां राजाला फार सोक लागना. ऐरवणामा तळा पाण्याना हता. ते तळावर राजा ग्या. तथ राखणदार हता. तो राजाला सांगह कीं ए तळाना पाणी पिईस नको. पाणी पीधां कीं बाईल हीन. तहां राजा बोले कीं बाइल हीनी तरी हरकत नाहीं. मग राखणदार काय सांगह तुला सोक लागना. माने घरा परत चल. मग राजा राखणदाराने घरा ग्या. तहां घरा जाईन पाणी प्यावाला हपा. त्या ठिकाणीं राजाला मोठा आनाद वाटना. तो तथ रही ग्या. तथ राजाला वर्षे सहा हीना. राजाना बाळ शहाणा हीना. तहां बाळ बापाला काय सांगह कीं बा मा वनामा जातां आहां. बाहास काय सांगह कीं वनानी तुला माहिती नाहीं. बाळ काय सांगह कीं माला माहीत नाहीं तरी अक्कल आहा. बापाना आग्रह

मोडीनी वनामा ग्या. वनामा हिंडतां हिंडतां शक्तिपूर नगरामा ग्या. तहां नगराना शिपाई आना. शिपाई सांगह तूं कसना ? तूं जहास कस्. बाळ म्हणह कीं आईबापाना घर इसराना. शिपाई आखह आमने राजा परत चल. तो सांगे त्याप्रमाणें ऐक. तहां बाळ नगरामा ग्या. राजाला रामराम करी राजवाड्यामा ग्या. राजा बोले तूं कसना यवगी (योगी) ? बाळ काय सांगह कीं माला घर नाहीं दार नाहीं. तहां राजा बोलह माने नगरांत लाव पिजनी. (सवकली आहे). मारशील तर फार चांगलें हीन. मारशील तर पोटने कन्याशीं लग्न लावीन. सर्व्यानीं बारी पुरी हिनी. ते नगरामा चार भाऊ ब्राह्मण हता. त्यानी वडील भावावर बारी आनी. तेव्हां चारी भाऊ रडूला लागना. तहां एक गाडीभर अन्न लिहीन गांवाबाहेर ठेवा. तहां राजा काय सांगह बाळा तुना नांव काय? माना नांव म्हणे जबनकेत. तर म्हणे आज बाराना टेमा लाव यीयीन. तहां बाळ गांवाना बाहेर ग्या. जाहीन हाक मारह कीं बिसना कोण ? तेव्हां तो ब्राह्मण काय सांगह कीं बाला मा आहां. तो बाल काय सांगह अरे दादा तूं जग. ब्राह्मण काय सांगह कीं तूं माने पायीं मरस कासा ? बाल काय सांगह कीं जर ब्राह्मणाला जीवदान दीना तर माला फार पुण्य हीन. तहां ब्राह्मण निगिहीन एक बाजूला ग्या. ब्राह्मणानें जागावर यो बाल बिसना. बारानी टेमाला लाव आनी. लाव काय बोलह आज खावनी मजा आहा. तहां बाल काय म्हणे अरे तूं कोणाला खाहास ? तहां लाव म्हणे तुला खावला आना. दोन जणांनीं मोठी लठ्ठा झोंबी हिनी. शेवटला लावेला मारा. इतक्यांत ब्राह्मण यीईन बालाने पायावर डोई ठेवी. काल काढास हा फार चांगला हीना. याना आम्हाला त्रास हता. लाव मारी तिशी राजाला बातमी कळनी. साफ उजाडना तहां बाल आणि ब्राह्मण नगरामा ग्या. राजाला रामराम करा. आतां म्हणले राजा तूं माला वरतना (वचन) दीधास तो दे. राजा काय बोले कीं तूना लग्न करा. तहां राजानी ब्राह्मण बोलवी नावरशी काढीहीन पंचमीनी हळदी आणि दशमीना लग्न. लग्न हिईन सर्वा लज्जाहोम करी तयारी हिनी. तेव्हां राजा काय बोले कीं या राज्यावर तुम्ही सर्वा राज्य बाळाने मार्फती मारा. राजा काय सांगह कीं जवाय (जांवई) हा राज्य तुम्ही आटपा. माला फार तीर्था करूला आहा. खाईपिई तुम्ही राज्य करा. सर्वा इसरा जा. पण देवाचा उपदेश इसरूं नको.

---

## पावसाचा तोडगा

पाऊस पाडण्याचा एक तोडगा पूर्वी करीत असत. वस्त्र सोडून पाला नेसून रात्रीच्या वेळीं कोणीतरी बाई घरोघर हिंडत असे. तिच्या अंगावर लोक पाणी घालीत. अर्थात् ही बाई काळोखांतच हिंडावयाची. पण तोंडानें गाणें म्हणत फिरावयाची. तें गाणें असें:—

अरगुंड बुरगुंड बैल बुका। चंदनी चुका मृगराजा। पाणी दे रे बाबा पाणी दे ॥

ना. गो. चापेकर

# भालदेव पूजा-व्रत

( लेखकः—भास्कर वामन भट )

खानदेश जिल्ह्यांत भालदेव पूजाव्रत हा एक देशाचार आहे. या देशाचाराची हिती प्रस्तुत लेखांत आम्ही देत आहों. खानदेश खेरीज अन्य प्रांतांत हा देशाचार स्तित्वांत आहे कीं नाहीं याचा खुलासा साहित्यपत्रिकेच्या वाचकांपैकीं कोणी केल्यास देशाचाराचा विस्तार किती प्रदेशांत आहे हें निश्चित होईल. साहित्यपत्रिकेंत कुला-रांविषयीं व देशाचारांविषयीं माहिती प्रसिद्ध करण्याचा सुरू करण्यांत आलेला उप-म योग्य आहे. या उपक्रमास अनुसरून कांहीं कुलाचारांसंबंधीं व देशाचारांसंबंधीं हिती प्रसिद्धहि झाली आहे. या माहितीच्या उपयुक्ततेच्या दृष्टीनें एक सूचना मनांत ली ती येथें नमूद करितों. आजपावेतों ज्या कुलाचारांविषयीं व देशाचारांविषयीं हिती प्रसिद्ध करण्यांत आली आहे ते कांहीं विशिष्ट प्रांतांत रूढ असल्याचें लेख-ांनीं नमूद केलें आहे. हे देशाचार व कुलाचार लेखकानें नमूद केलेल्या विशिष्ट ांताखेरीज अन्यत्रहि अस्तित्वांत असण्याचा संभव आहे. ही बाब लक्षांत घेतली सतां साहित्यपत्रिकेच्या वाचकांनीं ज्या देशाचारांविषयीं अगर कुलाचारांविषयीं माहिती पत्रिकेंत प्रसिद्ध केली जाते ते देशाचार व कुलाचार त्यांच्या प्रांतांत अस्तित्वांत आहेत किंवा नाहींत याचा शोध करून मिळालेली माहिती प्रसिद्ध करणें उपयुक्त होणार आहे. या माझ्या नम्र सूचनेचा विचार वाचकांकडून केला जाईल अशी आशा व्यक्त करून भालदेव पूजाव्रतासंबंधीं मिळालेली माहिती नमूद करितों.

१ **भालदेवपूजाव्रताचा कालः**—भालदेव पूजाव्रताचा प्रारंभ भाद्रपद शुद्ध १ रोजीं करण्यांत येतो. हें व्रत तीन, सात, नऊ किंवा तेरा दिवस पाळण्याचा प्रघात आहे.

२ **भालदेवपूजाव्रत कोणत्या जातीच्या लोकांत पाळण्याचा प्रघात अस्तित्वांत आहेः**—खानदेश जिल्ह्यांत राहणाऱ्या सर्व जातीच्या लोकांत हें व्रत करण्याचा प्रघात आहे. गवळी लोकांचें हें खास व्रत आहे. गवळी लोकांखेरीज जे दुभतीं जनावरें पाळितात त्यांच्यांत भालदेव पूजाव्रत करण्याचा प्रघात रूढ असल्याचें आढळतें. दुभतीं जनावरें न पाळणाऱ्या लोकांतहि हें व्रत क्वचित् पाळण्यांत येतें. रसाल हें व्रत पाळलेंच पाहिजे अशा प्रकारचा निर्बंध नाहीं.

३ **भालदेवपूजाव्रतविधिवर्णनः**—भाद्रपद शुद्ध १ पूर्वीं सर्व घर झाडून साफ करण्यांत येतें. घरांतील केर गोळा होईल तो घराच्या आंगणांत—घरास आंगण नसल्यास घराच्या पुढील रस्त्यावर—एके जागीं सांठवून ठेवण्यांत येतो. या सांठविलेल्या केरावर राख व शेण टाकितात. शुद्ध १ पासून व्रतसमाप्तीच्या दिवसापावेतों घरांतील

दुभत्या जनावरांचें दूध, दहीं, ताक व तूप जें होईल तें घरांतील माणसांखेरीज अन्य कोणासहि फुकट अगर विकत द्यावयाचें नाहीं. हे सर्व पदार्थ घरांतील सर्व माणसांनीं खावयाचे. जरुरीपेक्षां अधिक राहातील ते पदार्थ खाण्याकरितां इष्टमित्र, शेजारीपाजारी यांस आपल्या घरीं बोलावून आणून त्यांना खाऊं घालावयाचे. भालदेवपूजाव्रत च असतां व्रत करणाराचे इष्टमित्र आपल्या भाकरी, पोळ्या वगैरे घेऊन व्रत करणारा दहीं, दूध, तूप, ताक खाण्याकरितां जातात; व व्रत करणारा त्यांना हे पदार्थ लागत तेवढे पुरवितो. दहीं, दूध, ताक वगैरे खाण्यास कोणी न आल्यामुळें ते पदार्थ शिल्लक राहिल्यास नदीच्या अगर ओढयाच्या पाण्यांत टाकून देण्यांत येतात. या व्रताचें पालन सुरू असतां व्रत करणाराच्या दारावर भिक्षेकरी भिक्षा मागण्यास आल्यास त्य भिक्षा घालावयाची नाहीं असा सक्त निर्बंध आहे.

४ **भालदेव पूजाव्रतोद्यापनविधिः**—व्रतपालन करणाऱ्याचा व्रतोद्यापना जो दिवस ठरला असेल, त्या दिवशीं म्हणजे तिसऱ्या, सातव्या, नवव्या अगर तेरा दिवशीं सकाळीं उठल्याबरोबर व्रत करणाऱ्या माणसाचे घरांतील कोणातरी इसम नदीच्या अगर नाल्याच्या वाळवंटांतील सात खडे व मूठभर वाळू, त्याचप्रमाणें नदीं तील लव्हाळे घरीं आणावयाचे. हे पदार्थ घरीं आणल्यानंतर घरांतील घुसळखांब शेजारीं ते सात खडे ठेवून तेथेंच आणलेली वाळू पसरावयाची. वाळू पसरल्यानंत तीवर शेणाची बाहुली करून ती बसवावयाची व तिचे भोंवतालीं नदींतून आणले लव्हाळे भिंतीस लावून उभे करून ठेवावयाचे. याप्रमाणें बाहुलीची स्थापना केल्याव तिची पूजा गंध, फुलें, अक्षता, हळद-कुंकू इत्यादि द्रव्यांनीं करून धूपदीप कराव याचा. कणकेचा सांजा, गूळ व तूप घालून तयार करून त्याचे दिवे तीन, पांच अगर सात तयार करावयाचे. त्यांत तूप, वात घालून ते दिवे लावून बाहुलीभोंवतीं ओंवाळावयाचे. दीप ओंवाळीत असतां "जय देव जय देव जय पांडुरंगा...." इत्यादि आरती म्हणण्याचा प्रघात आहे. याप्रमाणें बाहुलीस दिवे ओंवाळून आरती केल्याव इष्टमित्रांसह भोजन करावयाचें. बाहुलीस ओंवाळण्याकरितां केलेले सांज्याचे दिवे भोजन करणारांस प्रसाद म्हणून देण्यांत येतात. या व्रतोद्यापनाच्या दिवशीं घरांत होणा दूध, दहीं, ताक, तूप हे पदार्थ शेजाऱ्यापाजाऱ्यांस त्यांच्या घरीं खाण्याकरितां देण्यांत येतात. भोजनोत्तर सायंकाळीं घुसळखांबाशेजारीं स्थापन केलेली शेणाची बाहुली, खडे, वाळू, लव्हाळे हीं सर्व एकत्र करून नदींत टाकून देण्यांत येतात. व घराच्या आंगणांतील केराचा पुंजका उकिरड्यावर फेंकून देण्यांत येतो.

या स्वरूपाचें भालदेवपूजाव्रत खानदेश प्रांतांत निरनिराळ्या ज्ञातीच्या लो[illegible]कडून पाळण्यांत येतें. श्रीकृष्णाच्या गोपाळ या विशिष्ट स्वरूपाचा भालदेवपूजाव्रत हा [illegible]क पूजाप्रकार आहे, असा लोकसमज या प्रांतांत आहे.

---

# कै० वि. का. राजवाडेप्रशस्ति

( लेखकः--प्र. धों. कानिटकर )

नमः श्रीविश्वनाथाय कूटसंकेतसंयुता- ।
लिपिर्माहानुभावानां विवृता येन लीलया ॥ १
पाणिनेः सूत्रकारस्य तथैव च पतंजलेः ।
निश्चिकाय यः कालं प्रमाणैः सूत्रसंस्थितैः ॥ २
राधामाधवयोः केलीश्चरितं शाहभूपतेः ।
आश्रित्य च कृता चंपू लब्धा येन प्रकाशिता ॥ ३
वसतिर्नागलोकानां पुराऽभूद्दक्षिणापथे ।
इति स्वीयं मतं चंप्वाः प्रस्तावे येन दर्शितम् ॥ ४
पाणिनेः कालमारभ्य वैय्याकरणलक्षिता ।
व्यवस्था शीर्षबिन्दूनां येनासीद्विशदीकृता ॥ ५
महाराष्ट्रयां भाषां प्रकृष्टं प्राकृतं विदुः ।
इति दण्डिमतं येन स्वीयलेखे पुरस्कृतम् ॥ ६
प्राच्यभाषाप्रवीणैश्च यूरोपस्थितपंडितैः ।
प्रकाशितेषु ग्रंथेषु दर्शिता दोषपंक्तयः ॥ ७
ताम्रपट्टशिलालेखवाचने लब्धलाघवः ।
शिवनामांकितो यश्च विश्वनाथेति कीर्तितः ॥ ८
तनुजः काशिनाथस्य वैजनाथस्य सोदरः ।
प्रणामाः सन्तु मे तस्य शतशोऽथ सहस्रशः ॥ ९

योऽनंतपारं किल शब्दशास्त्रम् ।
स्वधीत्य वेदांश्च कविप्रबंधान् ॥
ज्ञानेश्वरी-व्याकरणं चकार ।
तं विश्वनाथं सततं स्मरामि ॥ १०

तं णमह वीसणाहं जोण्हाधअलो रेहइ जसो जस्स ।
णाणेस्सरीवाअरणरअणाकउसलेण मरहट्टे ॥ ११
छंदःशास्त्रनिघंटुप्राकृतकृतीः सारस्वतप्रक्रियाम् ।
ज्ञात्वा येन च साधितं सुविमलं व्युत्पत्तिशास्त्रे यशः ॥
माहारट्ठगतेतिहासरचनाबुद्ध्या स्वयं व्याचिनोत् ।
सामग्रीं विपुलां नतोऽस्मि कृतिनं तं विश्वनाथं गुरुम् ॥ १२

समर्थांचिया श्लोकवृत्तासरीसें ।
तुळोनी 'कचीमा विवक्षायि' ऐसें ॥
स्तवी जो बहू त्या भुजंगप्रयाता ।
नमस्कार माझा तया विश्वनाथा ॥ १३

समर्थांचिया दासबोधा मथूनी ।
जयें लाविल्या धीटपाठादिश्रेणी ॥
कवींच्या सदा वानि मुक्तेश्वराला ।
तया विश्वनाथा नमस्कार केला ॥ १४
स सुहणिरहिलासो रठ्ठकज्जे णिवुड्ढो ।
अपरशिव इवाऽभूच्छाहसूनुः शिवाजिः ॥
मनसि मनुनि ऐसें आदरी जो शिवाला ।
जयतु जयतु तस्य श्लोकरूपा प्रशस्तिः ॥ १५

---

## व्युत्पत्ति

[ लेखकः—प्र. धों. कानिटकर ]

### १ अलचपुर ( इलिचपुर-एलिचपुर)

अचलपुर या शब्दांतील 'च' 'व' 'ल' यांचा व्यत्यय होऊन अलचपुर असें प्राकृ रूप सिद्ध होतें. (अचलपुरे चलोः । हेमचंद्र). वऱ्हाडांत हल्लीं इलिचपुर–एलिच नांवाचें शहर आहे, त्याचें पूर्वकालीन नांव अचलपुर असावें काय ? अचलपुर = अलचपुर; यापासून इलिचपुर किंवा एलिचपुर होणें अशक्य नाहीं.

### २ आश्राप

मराठे लोक गरीब जनावराला आश्राप म्हणतात. मूळ संस्कृत शब्द आश्रवः आज्ञाधारक. त्यावरून मराठी शब्द बनला आहे.

विधेयो विनयग्राही वचनस्थित आश्रवः । अमर. कां. ३

### ३ उळिग, ओळगी = सेवा

उळिग शब्द कानडी भाषेंत प्रचलित आहे. वोळगी, वोळगण, ओळगणें सर्व शब्द ज्ञानेश्वरींत अनेक ठिकाणीं आढळतातः—

हुडप मी वोळगेन । मीचि उगाळू घेईन । उळिग मी करीन । आंघोळीचें ॥४२०॥
जंव देह हें असेल । तंव वोळगी ऐसी कीजेल । मग देहांतीं नवल । बुद्धि आहे ॥
॥४३१॥ ज्ञा. अ. १

'ओळग' शब्द सेवा या अर्थानें नवव्या शतकांतील कर्पूरमंजरींत आढळतोः—
ओलग्गाविअ भविअ णिवेदइस्सम् = सेवकीभूय निवेदयिष्यामि । कर्पूरमंजरी पृ. ५४
यावरून ओळगा = सेवा, अवलग्ना = प्राकृत ओलग्गा. ओदवापयोः । या वररुचीच्या सूत्राप्रमाणें अव–अप या उपसर्गांचें विकल्पानें ओ असें रूप प्राकृतांत होतें:–अपसृत ओसरिअ; अवनत = ओणअ = मराठींत ओणवा. अवलग् = to be attached to, to attend upon; यावरून ओळगा, वोळगा उळिग = सेवा असा अर्थ निष्पन्न होतो.

४ ओळ

पंक्तिवाचक 'आलि' शब्दांतील 'आ' बद्दल 'ओ' आदेश होऊन आलि = ओळ असा शब्द सिद्ध होतो. ( हेमचंद्र ) आवलि शब्दावरून ओळ हा शब्द झालेला नाहीं.

५ अंतोरिया = विवाहित स्त्रिया

अंत:पुर याचें प्राकृत रूप अंतोर; यावरून अंत:पुरिका = अंतोरिआ = अंतोरिया. याच शब्दापासून अंतुरी, अंतौरि हे शब्द झाले आहेत. ज्ञानेश्वरींत अंतोरिया हा शब्द आला आहे.

अंतोरिया कुमरें । सांडोनिया भांडारें । शस्त्राग्रीं जिव्हारें । आरोपुनी ॥ ज्ञा. १।२२०

६ करादिवा, करवली, कऱ्हेरी, करा

करक = कमंडलु ( कुसुंभः करकश्चैत्यमुखः कमंडलुः । हारावली. ) करकदीपक = प्राकृत = करअ दीवअ = करादिवा; करक = करअ = करा; करकवती = करवली; करकस्य नारिकेल: = कऱ्याचा नारळ. करकधर = करअहर = कऱ्हेर-री पाणी देणारा सेवक). लग्नांत करवली व करादिवा वगैरेंस महत्त्व असतें हें प्रसिद्ध आहे. सबब प्रत्येक शब्दाचे अर्थ देण्याचें कारण नाहीं. ( करभ-करह-कऱ्हा = उंट हा शब्द अगदीं वेगळा आहे. )

७ खापर, खिळा, खुजा

कर्पर, कीलक व कुब्ज या शब्दांतील प्रारंभींच्या 'क' बद्दल प्राकृतांत 'ख' आदेश होऊन त्या शब्दांपासून वरील शब्द सिद्ध होतात. ( हेमचंद्र )

८ खिडकी

हेमचंद्रानें खिडकी हा देशी शब्द म्हणून दिला आहे. व गाथासप्तशतींतहि तो देशी म्हणूनच आढळतो. परंतु कांहीं कोशांत पूर्वीचे देशी शब्द संस्कृत म्हणून कोशकार देतात; त्यांपैकींच हा शब्द आहे. पक्षद्वारं खडक्किका—त्रिकांडशेष. मूळ शब्द खडक्किका; त्याचें मराठी रूपांतर खिडकी. मूळ अर्थांतहि बदल झालेला आहे:—

पक्षद्वार = गुप्त दार. हल्लीं हा अर्थ लुप्त होऊन खिडकी = १ उजेडाकरितां केलेलें द्वार, २ भिंतींतील कपाट; असे अर्थ झालेले आहेत व खिडकीचा उपयोगहि तसाच होतो.

९ खेंव = आलिंगन, भेटणें ( ज्ञानेश्वरी )

संस्कृत क्षेम = प्राकृत खेम = अपभ्रंश खेवँ = मराठी खेंव.
भेटणें:— सीमांतपूजनाचे वेळीं व्याही भेटतात त्याप्रमाणें.

१० गुरुळा = चूळ भरून टाकणें, गुळणा.

ज्ञानेश्वरींत हा शब्द आढळतो:—

मीचि होईन सागळा । करूं सुईन गुरुळां । सांडिती
ती नेपाळा । पडिघा मीचि ॥ अ. १३-४१९

कानडी भाषेंत गुरुळा हाच शब्द प्रचारांत आहे. श्रीचक्रधराच्या दिनचर्येंत 'गुळळा' असा याच शब्दाचा पर्याय येतो. (भा. इ. सं. मंडळ वा. इतिवृत्त श. १८३७)

११ घागर, कळशी.

हे दोन्ही शब्द संस्कृत शब्दांत योडा फरक होऊन मराठींत आले आहेत:— गर्गरी कलशिर्मता । त्रिकांड शेष.

१२ चौमेरीं = चारी बाजूनें

चतुर्मिरा = चउमेर. मिरा = मर्यादा. मिरायां मेरः । हेमचंद्र; ज्ञानेश्वरींत येतो.

१३ चितांक

हा अलंकार सोन्याचा असून मराठे लोक वापरतात. याचा आकार कमरपट्या-सारखा असून तो गळ्यांत सरीसारखा घालतात. नाथांच्या रुक्मिणीस्वयंवरांत याचा उल्लेख आहे:—

फिटला चिंतेचा दचकू । म्हणोनी न घाली चितांकू ।
कृष्णपदींचा पदांकू । तेंचि पदकू हृदयींचें ॥ प्रसंग ७।३८

नाथांच्या वेळेसहि तो गळ्यांतील दागिना होता. परंतु आठव्या शतकाच्या सुमारास तो कमरेचा दागिना होता असें दिसतें; चितिका कटिशृंखला—हारावली. तसेंच आकार पट्याप्रमाणें नसून सांखळीसारखा होता.

१४ छत्रभंग

मृताच्या आप्तेष्टाकडे समाचारास गेलें असतां, छत्र नाहींसें झालें, असें ण्याचा परिपाठ आहे (मृत मनुष्य वडील असेल तर). पूर्वकालीं विधवा स्त्रीच्या चारास गेल्यास 'छत्र मोडलें' असें म्हणण्याचा परिपाठ असावा असें कोशांतील अ वरून दिसतें:—

वैधव्ये नृपनाशे च छत्रभंगः प्रकीर्तितः । त्रिकांडशेष.

१५ नाहीं

संस्कृतांत 'न' 'हि' असे निपात आहेत. त्यांपासून "नहि" असा जोड शब्द झाला आहे:—नहि नहि तत्र धनाशा । नहि नहि रक्षति डुकृञ् करणे ॥ अपभ्रंश भाषेंत 'नहि' याचा आदेश 'नाहिं' असा होतो असें हेमचंद्र सांगतो. अपभ्रंश भाषेंतील आदेश अनुस्वारयुक्त होता; परंतु वर्तमानकाळीं अनुस्वाराचें रूपांतर अनुनासिकांत झालें असून, बोलण्यांत अनुनासिकाचाहि लोप झाला आहे. मूळ संस्कृत शब्दांत शीर्ष बिंदु नसून मराठींत तो कसा येतो त्याचें हें एक नमुनेदार उदाहरण आहे.

१६ पडिघा = पिकदाणी, तस्त

मूळ संस्कृत शब्द 'पतत्प्रह' याचें प्राकृतद्वारां ज्ञानेश्वरीकालीन रूप वर दिल्याप्रमाणें आहे. पतत्प्रह = पडग्गअ = पडघा = पडिघा (अ बद्दल इ आदेश). मराठींत पडघा असाहि शब्द आहे परंतु त्याचा अर्थ मात्र अगदीं भिन्न आहे. वर गुरुळा शब्दाखालीं ज्ञानेश्वरींतील ओवी दिली आहे त्यांत पडिघा हा शब्द आला आहे.

१७ पन्नासिलें = सैन्याची मांडणी केली

प्रन्यासित=पण्णासिअ=पन्नासिल ( ल प्रत्यय )

आतां याचेनि बळें गवसलें । हे दुर्ग जैसें पन्नासिलें ।
येणें पाडें थेंकुलें । लोकत्रय ॥ ज्ञानेश्वरी ११।११६

१८ पाटोळा = स्त्रियांचें नेसण्याचें मौल्यवान वस्त्र

पटोलं वस्त्रभेदे स्यात् । मेदिनी कोश. नाथांच्या रुक्मिणीस्वयंवरांत हा शब्द आला आहे:---

पूर्वी क्षीरसिंधूची बाळा । नेसली क्षीरोदक पाटोळा ।
तों तो पहावया घनसांवळा । कांसे लागला क्षीराब्धी ॥ प्रसंग ७।४५

१९ पुंसा = पोपट

पुंशुक=पुंसुअ=पुंसअ ( उ लोप व अ आगम)=पुंसा. ज्ञानेश्वरींत फार ठिकाणीं हा शब्द येतो:—

तुतें आराधी ना आइके । होती पुंसा बोलावीत कौतुकें ।
तियें वैकुंठीं तुवां गणिके । सुरवाड केला ॥ ज्ञा० ११।१०७

२० पेलणें = प्रेरणें, फेंकणें

प्रेरयति=पेल्लइ......( मार्कंडेय )
क्षिपति=पेल्लइ.......( हेमचंद्र )

प्राकृतांत जे धात्वादेश होतात त्यांपैकीं 'पेल्ल' हा आदेश आहे. मार्कंडेयाचा आदेश योग्य दिसतो.

ते वेळीं अर्जुन म्हणतसे देवा । आतां झडकरी रथ पेलावा ॥ १६९ ॥
आइका अर्जुन इतुकें बोलिला । तंव श्रीकृष्णें रथ पेलिला ॥ १७४॥ ज्ञा. अ.१

पेलणें=तोल सांवरणें याचा वरील आदेशाशीं ( प्रेर् ) संबंध दिसत नाहीं; तथापि 'जोड्या पेलणें' यांतील पेलणें हा धातु क्षिप् पासून आदेशरूपानें मराठींत आल्याचें दिसतें.

२१ पातेजणें = विश्वास ठेवणें

प्रति+इ=विश्वास ठेवणें. कर्पूरमंजरींत खालील वाक्य आहे:---णाहं पत्तिज्जामि= नाहं प्रत्येमि । रघुनाथ पंडितानें पातेजणें या क्रियापदाचा उपयोग केला आहे:--

असो, सांपडतों तुझ्या करामाजी । पुन्हा सुटका करशील काय माझी ॥
कसा पातेजूं बाळबुद्धि तुझी । स्त्रीस्वभावें बहु आणशील बाजी ॥

नलदमयंती स्वयंवर.

२२ पोथी

पुस्तकम्=A book, पुस्ती=A manuscript हे दोन्ही शब्द संस्कृत आहेत. त्यांचीं प्राकृतांत रूपें होतात तीं:—

पुस्तकम्=पोत्थओ.
पुस्ती=पोत्थी=( मराठी ) पोथी.

**२३ पोळी, पोपी, चपाती**

पोली पूपालीचर्पटी च सा । त्रिकांडशेष-वैश्यवर्ग.
पोली=पोळी; पूपाली=पोपी ( अनियमित )
चर्पटी=चप्पट्टी=चप्पत्ती चपाती.

**२४ बावन = मैलागिरी चंदन**

बावनचंदन, बावन असे दोन शब्द आढळतात.

(१) तरी फळाद्देशें सांडिलिया । वाढती जेवी सरळिया ।
शाखा कां चंदनाचिया । बावनया ॥ ज्ञा० १८।६३१

(२) त्रयोदश करून चतुर्गुण । भोगी वेष्टीत जों तरु जाण ।
तुझ्या विरहें करून । पंक त्याचा न शिवेचि ॥
( १३×४=५२=बावन ) श्रीधर-पांडव प्रताप २५।४४

(३) सत्संग आवश्यक आजि पाहें । जो ईश्वर प्राप्तिस हेतु राहे ॥
जो सज्जनांच्या निववी मनाला । जो लाजवी बावनचंदनाला ॥
सामराज रुक्मिणीहरण स० १।३८

प्रो. तुळपुळे यांनीं रुक्मिणी हरणांत वरील श्लोकाचा चवथा चरण छापला आहे तो असाः—

जो लाजवी, बा, वनचंदनाला ।

यामुळें बा हें संबोधनार्थक अव्यय होऊन, वनचंदन असा शब्द शिल्लक रहातो. वनचंदनाचा अर्थ देवदारु वृक्ष असा आहे; यामुळें बा याच्यापुढें विराम चिन्ह ठेवणें इष्ट दिसत नाहीं. श्रीधराच्या ओवीवरून बावन असा चंदनवाचक स्वतंत्र शब्द असल्याचें दिसतें; व ज्ञानेश्वरींत 'बावनचंदन असा जोड शब्द आल्यामुळें, जो लाजवी बावनचंदनाला । असा पाठ घेणें उक्त दिसतें. बावन शब्दाची व्युत्पत्ति मात्र समजत नाहीं.

**२५ बिक-बीक = सौंदर्य, बल, तेज.**

हे दोन्ही शब्द ज्ञानेश्वरींत येतात व वर दिल्याप्रमाणें त्यांचे अर्थ आहेत. संस्कृत शब्द प्राकृत व अपभ्रंश भाषांच्या द्वारानें मराठींत येतांना जे विलक्षण फेरफार होतात ते लक्षांत घेतले असतां बिक शब्दाची संभवनीय व्युत्पत्ति देतां येईल. ती योग्य किंवा अयोग्य हें तज्ज्ञांनीं निश्चित करावें. अ-कारानें प्रारंभ होणाऱ्या संस्कृत शब्दांचीं मराठींतील रूपें पाहिलीं असतां अ चा लोप झाल्याचें कांहीं ठिकाणीं दिसतें; अपिलग् = विलग्; अरिष्ट = रिठा; अध्यवसाय = धिवसा; अनंतर = नंतर. संस्कृतांत 'अभिख्या' शब्द सौंदर्यवाचक आहे. ( अभिख्या नामशोभयोः । अमर. कां. ३ ) यावरून बिक शब्द साधतां येतो; यास कै. राजवाडे यांचा आधार आहेः-अभिख्या = भिख्या = भिख = बिक-बीक.

२६ वीज = गमन

वीज = जाणें.– आत्मनेपद १ गण (वीजते)

तिये कडोनि येतसे वारा। देखोनि धांवे सामोरा। आड पडे म्हणे घरां वीजें कीजो॥ ज्ञा. अ. १३।३७६ कीजो = क्रियताम्

२७ भुँवई–भँवई

भ्रू शब्दाचीं प्राकृत भाषेंत भुमया–भमया अशीं रूपें होतात. (हेमंचद्र)

भ्रू = भुमया = भुँवया = भुँवई

भमया = भँवया = भँवई.

२८ भोंक = छिद्र

भूकं छिद्रे च काले च। मेदिनीकोश. भूक = भोंक.

२९ मान = क्रोध

मान पासून मान शब्द निघाला आहे; मुंच मयि मानमनिदानम्।–गीत-गोविंद; उदा. आज तुला फार मान आला आहे. मान = सन्मान हा शब्द मान् (चुरादि) या धातूपासून सिद्ध झाला आहे; (मान पूजायां).

३० वढवाण

संस्कृत वाचकांस वर्धमान नगर परिचयाचें आहे. वर्धमान = प्राकृत वड्ढमाण= अप. वड्ढवाँण = वढवाण.

३१ वावरणें = प्रहार करणें

व्या + पृ. प्रयोजकरूप व्यापारयति। प्रयोजक रूपांत अर्थ वेधणें, फेकणें असा होतो. उदा. व्यापारितं शिरसि शस्त्रमशस्त्रपाणेः। व्यापारयति = (ज्ञा.) वावरइ. = मराठी वावरणें. ज्ञानेश्वरींत विशिष्ट अर्थानें हा शब्द आला आहे.

देवा नवनिशितीं शरीं। वावरोनि यांच्या जिव्हारीं।

भोग गिंवसावे रुधिरीं। बुडाले जे॥ ज्ञाने. २।४८

मराठींत वावरणें हें जें क्रियापद आहे तेंहि व्या + पृ या धातूपासूनच आलें आहे.

३२ विटाळ = अस्पृश्य संसर्ग

नवव्या शतकापासून ज्ञानेश्वरकाळापर्यंत विटाळ याचा अर्थ अस्पृश्य संसर्ग असाच होता. कर्पूरमंजरींत व हैमव्याकरणांत त्याची गणना देशी शब्द म्हणून केली आहे; ज्ञानेश्वरींतहि अस्पृश्य संसर्ग याच अर्थाचा तो द्योतक आहे. (कै. राजवाडे यांनीं विटाळ याची व्युत्पत्ति दिली आहे.)

(१) परपुत्त विट्टालिणि = परपुत्र विट्टालिनि

विट्टालिनि = भ्रंशिका (देशी) कर्पूरमंजरी, जवनिका १

(२) अपभ्रंशे अस्पृश्यसंसर्गस्य विट्टालः इति आदेशो भवति। हेमचंद्र

(३) साध्वी शांति नागविली। मग माया मांगी श्रृंगारिली।

तियेकरवीं विटाळविलीं। साधुवृंदें॥ ज्ञा. २।२५१

३३ वेरूळ

वेरुळ लेण्यांविषयीं प्रसिद्ध आहे; त्याचें दुसरें नांव एलोर आहे व तें पूर्वकालीन नांव इला अगर एलापूर या नांवाशीं सुसंगत आहे. वैडूर्य याचें प्राकृत भाषेंत वेरुलि-. यम् असें रूप हेमचंद्र देतो. तेव्हां इला–एलापुर याचें दुसरें नांव वैडूर्यपुर–अगर वैडूर्य असल्यास त्यावरून हल्लीचे नांवाची संगति लागते. हेमचंद्राचें सूत्र पुढें दिल्या प्रमाणें आहे:–वैडूर्यस्य वेरुलिअम् । अध्या. ८ पा. २ सू. १३३. वैडूर्य शब्दस्य वेरु-लिअ इत्यादेशो वा भवति । वेरुलिअम् ) वैडुज्जं ॥ ( वैडूज्जं–वडूज सातारा जिल्ह्यांत गांव आहे ).

३४ शिंगाडा = उपवासाला खाण्याचा पिठुळ पदार्थ

शृंगाटो जलकंटकः । हारावली.

शृंगाट = शिंगाड = शिंगाडा.

३५ साउली-सावली.

शाखा याचें प्राकृतरूप साहुली होतें असें हेमचंद्र सांगतो. वररुचीचें सामा सूत्र 'दाढादयो बहुलम् ।' असें आहे. पुष्कळ शब्दांचीं अनियमित रूपें ह्या सूत्राध दिलेलीं आहेत. उ० राष्ट्र–रट्ठ, महाराष्ट्री–मरठी. शाखा = साहुली–साउली– सावल

३६ सादुकला = भडकला, पेटला

संधुक्षित=संधुक्खिअ=सादुकल ( ल प्रत्यय )

ना तरि वडवानल सादुकला । प्रलयवाते पोखला ।
सागर शोषुनि उधवला । अंबरासि ॥ ९० ॥ ज्ञा. अ. १

३७ साधणें = ठार मारणें

साधू–साध्नोति, साध्यति, प्रयोजक साधयति. साधयति याचा अर्थ ठार मार असा होतो व त्या अर्थानें तो ज्ञानेश्वरींत आला आहे:—

( १ ) जैसा कळोनिया पारधि । घातेचिये संधी ।
आणी मृगातें बुद्धी । साधावया ॥ ज्ञा. ३।२१६

( २ ) हे शस्त्रेंवीण साधिती । दोरेंवीण बांधिती ।
ज्ञानियासी तरी वधिती । पैज घेउनी ॥ ज्ञा. ३।२५८

( ३ ) हे मारीले वैरी थोडे । आणीकहि साधीन गाढे ।
मग नांदेन पवाडे । एकलाचि मी॥ ज्ञा. १६।३५२

३८ हळहळ

हलहलकम् = कामौत्सुक्यम्–देशी. हा शब्द गाथासप्तशतींत आला आहे व टिकेंत वर दिल्याप्रमाणें त्याचा अर्थ दिला आहे. त्यावरूनच हळहळ हा शब्द निघा-ल्याचें दिसतें; मात्र पूर्वीचा अर्थ बदलून हल्लीं मनस्ताप असा अर्थ रूढ आहे.

३९ हुडुत् ( तिरस्कार व्यंजक अव्यय )

हुडुत् हें संस्कृतांत नाम असून त्याचा अर्थ A Sound of threat असा होता.

मराठींत त्या नामाचें अव्यय बनलें आहे. कै० राजवाडे यांनीं या शब्दाची निराळी व्युत्पत्ति दिली आहे.

४० ठीं

स्थिति=ठिइ=ठी ( मराठी ) हा शब्द ज्ञानेश्वरींत बरेच वेळां येतो.

४१ पैठी ( आंत शिरकाव झालेली )

प्रविष्ट=पइट्ठ=पैठ

मग जालंधर सांडी । ककारांत फोडी । गगनाचिये पाडीं । पैठी होय ॥

ज्ञा. ६।३०२

४२ फुडें ( स्पष्ट, खरें )

स्फुट=फुड

परी मकरतुंडामागिलियेकडे । होतासि तोचि तूं एवढें ।

रूप जाहालासि हें फुडें । वोळखिलें मियां ॥ ज्ञा. अ. ११।२९३

खालीं दिलेले शब्द मराठे लोकांच्या बोलण्यांत येतात; ते शुद्ध महाराष्ट्री, प्राकृत वा अपभ्रंश भाषेंतील शब्द आहेत, तथापि त्यांना गांवढळ ही संज्ञा प्राप्त झाली आहे. नगरी गीतें, मराठ्यांचीं गाणीं, बायकांच्या कहाण्या यांत प्राकृत शब्द अविकृत स्वरूपांत आढळतात असें कै. राजवाडे कंठरवानें सांगत असत. त्याचें मर्म खालीं दिलेल्या उदाहरणांवरून प्रतीत होईल अशी आशा आहे.

१ ओपणें

अर्पणं=ओप्पणं=ओपणें.

२ आंवतण

आमंत्रण=प्रा० आमंत्तण=अप० आवँतण.

३ इळी ( विळी )

ईलिः (आंखूड तरवार) = इलि = इळी.

४ उल्लालणें ( गाडी )

उत्+नम् या धातूचा प्राकृतांत 'उल्लाल' असा आदेश होतो; उन्नमयति = उल्लालइ.

५ कटणें ( कष्टानें दिवस काढणें )

कष्टेष्टः । या सूत्राप्रमाणें कष्ट् याचा कट् आदेश होतो. कष्टयति=कटइ; तो दिवस कटतो.

६ किरिया = (१) अंत्यविधि, (२) शपथ.

क्रियां=किरिया. क्लिष्ट–श्लिष्ट–रत्न–क्रिया–शार्ङ्गेषु तत्स्वरवत् पूर्वस्य । वररुचि परि० ३ सूत्र ६०.

७ चइत = चैत्र महिना

चैत्र = चइत्त = चइत. दैत्यादिष्वइ । वररुचि. परि. १।३६

८ गांवठाण

ग्रामस्थान = गामट्ठाण = गावँट्ठाण=गांवठाण.

९ घडा

घट=घड. ( टो डः । वररुचि परि. २।२० )

१० तण ( गवत )

तृण=तण. ( ऋतोऽत् । वररुचि. परि. १।२७ )

११ पलिता

प्रदीप्त=पलित्त; यापासूनच पलिता हें नाम झालें आहे. ज्ञानेश्वरींत 'पळिपणें' हें क्रियापद येतें तेंहि याच शब्दापासून झालें आहे:—

(१) तिहीं विरक्तीची ज्वाळा घेतली । तंव विकारांचीं इंधनें पळिपलीं ।
तेथ आशाधूमें सांडिलीं । पांचहि कुंडें ॥ अ. ४।१२९

(२) कीं पवनाचेनि कोपें । पाणियेंचि जो पळिपे ।
तो प्रळयानळ दडपे । तृणकाष्ठें काई ॥ अ. ४।१८०

हिलाल पेटविण्यास पलिते लागतात.

१२ पान लागणें ( सर्प दंश होणें )

पन्नग=पण्णअ=पान ( सर्प ).

१३ पाटपिढ ( आसन, पाट )

पट्टपीठ=पाटपिढ. पट्ट=पाट; पीठ=पीढ=पिढ. ( ठो ढः । वररुचि परि. २।२४)

१४ बामण

ब्राह्मण=बम्हण=बामण.

१५ भादवा ( भाद्रपद )

भाद्रपद=भद्दवअ=भादवा.

१६ मसाण — मसण ( श्मशान )

श्मशान=मसाण=मसण ( श्मश्रु-श्मशानयोरादेः । वर. ३।६ ).

१७ माथणी-नी ( ताक करण्याचा डेरा )

मंथनी=मत्थणी=माथणी. मन्थनी गर्गरीसमे--अमर २।९६०.

१८ रांडपण ( वैधव्य )

रांडाव=विधवा. रंडा=विधवा. (रंडा मूषिकपर्ण्यां च विधवायां च योषिति। मेदिनी) रंडा—त्व=रंडप्पण ( अपभ्रंश )=रांडपण. अपभ्रंश भाषेंत भाववाचक नामाचा प्रत्यय 'प्पण' असा आहे व तोच मराठींत आला आहे.

प्राकृतसूत्र--तलत्वयोर्दात्तणौ—वररुचि ४।२२

त्वतलोः प्पणः। हेमचंद्र. मूढता, मूढत्व-मूढदा-मूढत्तण—मूढप्पण—मूढपणा. दल-पतित्व=दलवइप्पण=दळवैपण;—तया दळवैपणाचा पाट । भीष्मासि पैं ॥ ज्ञा. १।११५

१९ विख = इख

विष—विख—इख.

२० सनान

स्नान=सनान. हें रूप पैशाची भाषेंतील आहे.

( स्नस्य सनः । वररुचि परि. ११।७

२१ सांज ( संध्याकाळ )

संध्या=संज्झा=सांज

२२ सिरिमन्त ( श्रीमान् )

श्री=सिरि. ( वररुचि परि. ३।६२ )

श्रीमान्=सिरिमन्त. ( वररुचि परि. ४।२५ )

२३ सुमरण

स्मर् याचा आदेश सुमर्. स्मरण=सुमरण.

२४ वहिला, वाहला = विभक्त ( कुटुंबी )

व्यवहित + ल प्रत्यय = व अ हि अ + ल = वहिल–ला. वहिला शब्द वरील अर्थानें ज्ञानेश्वरींत येतो.

तरी झडझडोनि वहिला निघ । इये भक्तीचिये वाटे लाग ।
जिया पावसी अव्यंग । निजधाम माझें ॥ अ० ९।५१६

२५ वंगाळ, ओंगळ = अशिष्ट, घाणेरडा.

अमंगल = अवंगल = ओंगल = ओंगळ. (अव = ओ).
= अवंगल = वंगल = (अ लोप) = वंगाळ.

२६ आउख–औख.

आयुष्य = आउख = औख.

२७ नारेळ, नाऱ्येळ

नारिकेल = नारिएल = नारेळ, नाऱ्येळ.

२८ मुंडास (शिरोवेष्टण, पागोटें)

मूर्धन् + वासस् = मुंढा–मुंडावासस् = मुंडा + आस = मुंडास. (मूर्धन् याचें प्राकृतांत मुंढा असें रूप होतें)

२९ भटीण

भट्टिनी = भट्टिणी = भटीण ( भट्टिनी द्विजभार्यायां । मेदिनी)

३० एकला, येकला

(सं) एकल = एकटा. यापासूनच एकला हा शब्द मराठींत आला आहे.

३१ सोणार ( सोनार )

सुवर्णकार = सोणार. [गाथासप्तशती २।९१ यांत हा शब्द येतो.]

---

# शंका

( लेखकः-प्र. धों. कानिटकर )

## विठ्ठलकृत रुक्मिणीस्वयंवर

(१) कृष्ण द्वारवतीस राज्य करितां पाळी प्रजा कारणें।
दंड च्छत्र पताक चामर तया सारीप्रती मारणें।।
पुण्या बंधन, कीर्तिला दवडणें, पापासि संहारणें।
कोष्टा कोष्टक, चोर चोर म्हणिजे ना सर्वथा रक्षणें ।। स. १।४६

(२) भूबीजा जठरीं त्रिकंकण करीं शृंगारदामोदरीं।
आठांची नगरीं चतुर्दश गिरीं दोहीं दिशारांतरीं ।।
रंध्राचें पदरीं त्रिकोण उदरीं विंध्याचिया मंदिरीं।
तूं माते ! त्रिपुरीं वसोनि शिखरीं हस्ताब्ज ठेवीं शिरीं ।। स. ४।१३

(३) विधाता निघंटांत एकाक्षरीया। घृतक्षीर सासू म्हणे पी करीं या ।।
सुनेला पुसे, 'पूर्ण घालीसि बाई'। वदे रुक्मिणी, 'तृप्त मी आतबाई'
स. ७।६५

## नागेशाचें सीतास्वयंवर

एक गृहस्थ आपल्या पत्नीच्या अवगुणांचें वर्णन करीत आहेः—

(४) वाचाट ते चाट, महा आचाटी। ते बोरकांटी, तरटी, तिवाटी ।।
गाठी, गदूटी, जगथोंट मोठी। करीन मी आणिक याच साठीं।। श्लो० १३८

## श्रीधर—पांडवप्रताप

नळराजापाशीं हंस दमयंतीच्या विरहावस्थेचें वर्णन करीत आहेः—

(५) रतिवरशत्रुभूषणकुमारी। सखिया देती न अंगिकारी ।।
लोकप्राणेशवनजातसुंदरी। त्यागिली दूरी विरहज्वरें ।। अ. २५ ओ. ४३

याच्या पुढील ओवी 'बावन' या शब्दाखालीं दिली आहे.

वर दिलेल्या पांच श्लोकांत शंकास्थळें आहेत तीं:—

श्लोक (१):— "कोष्टा कोष्टक" व "ना सर्वथा रक्षणें" यांचा अर्थबोध होत नाहीं. यांत श्लिष्ट शब्दांनीं परिसंख्या अलंकार साधला आहे.

" (२):— सर्व श्लोकाचा अर्थ कळत नाहीं.

" (३):— पहिल्या चरणाचा अर्थ कळत नाहीं.

" (४):— दुसऱ्या व तिसऱ्या चरणांतील शब्दांची व्युत्पत्ति व अर्थ पाहिजे.

" (५):— पहिल्या व तिसऱ्या चरणांतील वर्णनानें कोणत्या वस्तु सांगितल्या आहेत तें कळत नाहीं.

## श्री. भ. गीता अ. १

(६):— एवमुक्त्वार्जुनः संख्ये रथोपस्थ उपाविशत् ।
विसृज्य सचरं चापं शोकसंविग्नमानसः ॥४७॥

## ज्ञानेश्वरी

मग अत्यंत उद्वेगला । न धरत गहिंवर आला ।
उडी घातली खाला । रथौनिया ॥

## यथार्थदीपिका

ऐसें बोलोनि अर्जुन । शरांसहित शरासन ।
टाकूनि शोकविव्हळ मन । रथीं उभा तो बैसला ॥ १-३८०

## शंका

गीताश्लोकांतील 'उपाविशत्' या पदाचा अर्थ वामन पंडितांनीं 'बैसला' असा दिला आहे; त्याच पदाचा ज्ञानेश्वरांनीं 'रथाखालीं उडी घातली' असा अर्थ केल्याचें दिसतें. दुसऱ्या अध्यायांत श्रीकृष्ण म्हणतातः—

क्षुद्रं हृदयदौर्बल्यं त्यक्त्वोत्तिष्ठ परंतप ॥३॥

यावरून वामन पंडितांचें भाषांतर यथार्थ दिसतें. भारतीयुद्धांत रथी उभे राहून बाण सोडीत असत; यामुळें 'उत्तिष्ठ' याचा धात्वर्थच घेणें उचित आहे. ज्ञानेश्वर अवास्तव अर्थ देतील हें संभवत नाहीं. तेव्हां अर्थ करण्यांत ज्ञानेश्वरांचें दुर्लक्ष्य झालें किंवा 'उडी घातली खाला । रथौनिया' या अर्ध ओवीचा दिसतो त्यापेक्षां निराळा अर्थ आहे याचा कोणी तज्ज्ञांनीं उलगडा करावा अशी विनंति आहे.

### ७ विक, वीक

या शब्दाची कै. राजवाडे यांचे मताप्रमाणें वर एक व्युत्पत्ति (२५) दिली आहे. परंतु त्यांनींच दुसरीहि एक व्युत्पत्ति दिली आहे, ती शंकास्पद आहे:—

भारत इ. सं. मंडळाच्या शके १८३३ च्या अहवालांत चोंभा कवीचें 'उषाहरण' प्रसिद्ध झालें आहे व त्यांतील शब्दांचे अर्थ कै. राजवाडे यांनींच दिले आहेत. सदर ग्रंथाचें पृष्ठ ३९ यांत मदन व षडानन यांचा संवाद आहे, त्यांत खालील ओवी आहे:—

तुझा जाणे पुरुषाकारु । तुवा वधीला तारकासुरु ।
येका जुंझाचेनी वीकें । घेउनी ठेलासी बडीवारु ॥३८॥

द्विक = विक = वीक ( दुपटी, आधिक्य).

द्विक ( नाम ) याचा अर्थ काक, कोक असा आपटे यांच्या कोशांत सांपडतो; द्विक = Two-fold, second, increased by two असे द्विक या विशेषणाचे अर्थ आहेत. वरील ओवींत वीक हें नाम आहे. षडाननानें सबंध आयुष्यांत तारकासुरा-

बरोबरच काय तें युद्ध केलें. दुसरे युद्धप्रसंग त्यास ठाऊक नव्हते. यामुळें 'एक युद्ध जिंकलेस त्याची किती ऐट मारतोस' असा मदनानें त्यास टोला दिला आहे. या ओवींतील बीक शब्दाचा अर्थ अभिख्या या शब्दापासून निघालेल्या बीक शब्दानें चांगला प्रतीत होतो व तोच अर्थ खालील ओवींतील शब्दास लागू पडतो.

आणि पाहतां नावेक । रंगीं सुरंगतेची आगळिक ।
गुणां सगुणपणाचें विक । बहुवस एथ ॥ ज्ञा. अ. १।३८

एकच प्राकृत किंवा ज्ञानेश्वरकालीन जुनाट मराठी शब्द अनेक संस्कृत श पासून साधतां येतोः—

| प्राकृत | संस्कृत |
| --- | --- |
| मअ | मृत, मृग, मद, मत, मय. |
| जुनाट मराठी | संस्कृत |
| पाहले-पाहिजे | प्रार्थ्, प्रार्ह्, प्रभात, पश्य् (प्रयोजक), प्रकाश |

याच न्यायानें कै. राजवाडे यांनीं अनेक प्रकारांनीं एकाच शब्दाची व्युत्पत्ति दाखविली आहे; तथापि कोणत्या ठिकाणीं कोणता मूळ शब्द मानावयाचा हें संदर्भावरून तारतम्यानेंच ठरविलें पाहिजे. ज्ञानेश्वरीचर्चामंडळानें ज्ञानेश्वरींतील बिक बीक हा शब्द, अभिख्या व द्विक यांपैकीं कोणत्या शब्दापासून साधला, आहे हे कायमचें ठरवावें व त्याकरितां 'यच्छ्रेय एतयोरेकं तन्मे ब्रूहि सुनिश्चितम्।' अशा अभ्यासकांच्या वतीनें मंडळास विनंति आहे.

८ हडपी = तांबूलकरंकवाहक

हडप = तांबूलकरंक या अर्थानें ज्ञानेश्वरींत येतो;

हडप मी वोळगेन । मीचि उगाळु घेईन ।
उळिग मी करीन । आंघोळीचे ॥ ज्ञा. अ. १३।४२०

चोंभा कवीच्या 'उषाहरणांत' हडपु ( हडप ) हा शब्द विडा करून देणारा-सेवक या अर्थानें आला आहे:—

मुखीं घातलिया फोडी । हडपु करुनु देता ये वीडी ॥
( भारत इ. सं. मंडळाचा अहवाल शके १८३३ पृ. ३० )

हडपु शब्दाचा अर्थ कै. राजवाडे देतात तो असाः—

हड्डिप ( हडपु )=क्षुद्रसेवक.

आपटे यांच्या संस्कृत कोशांत, हडि( ड्डि )कः, हड्डिः = A man of the lowest caste असा शब्द दिला आहे व तत्सदृश राजवाडे यांचा हि अर्थ आहे; परंतु आपटे यांचा अर्थ, हड्डं ( मराठी हाड ) = A bone या शब्दास धरून आहे. हड्डिक= हड्डिप असें मानणें यथार्थ दिसत नाहीं. आपटे यांच्या कोशांत हडप किंवा हडिप असा शब्द दिलेला नाहीं. हडप व हडपी या शब्दांची व्युत्पत्ति कोणी खुलासेवार द्यावी अशी विनंति आहे.

४८

९ उतती, उतत्या

उतती—त्या. हा शब्द फलवाचक आहे व तो मराठी काव्यांत आढळतो. परंतु हें फळ कोणतें त्याचा उलगडा होत नाहीं:—

(१) येला, कंकोल, पूगीफल, खदिर, शशी, जायपत्री, लवंगा ।
वादामे, आकरोटे, खिसमिस, उतत्या, आणवील्या सवंगा ॥
सामराज रु. हरण सर्ग ३।४८

(२) नारेल ऊस उतत्या बहु खर्वुजें हो ।
दालिंब शेव फणसांत मृदू गरे हो ॥
( भा. इ. सं. मं. इतिवृत्त शके १८३६ पृ. ३५ )

आपटे यांच्या संस्कृत कोशांत किंवा मोल्सवर्थ यांच्या मराठी कोशांत हा शब्द दिलेला नाहीं. कोणास अर्थ माहित असल्यास द्यावा अशी विनंति आहे. उतत्या = वृद्रवत्या असा अर्थ कोणी करतात तो योग्य दिसत नाहीं.

१० बोडण

महाराष्ट्र-साहित्य-पत्रिकेच्या पहिल्या वर्षाच्या पहिल्या अंकांत श्री. ना. गो. चापेकर यांनीं 'लिंबन्हाण व बोडण' या विषयावर लेख लिहिला असून बोडण विधीचें समग्र वर्णन दिलें आहे. हा कोकणस्थांत कुलाचार असून मुलाच्या कोणत्याहि मंगल-संस्कारांत बोडण भरण्याची चाल आहे; मुलीच्या मंगलसंस्कारांत बोडण लागत नाहीं. श्री. चापेकर यांनीं 'बोडण' शब्दाची व्युत्पत्ति बन्होदन किंवा वर्धन यापासून सूचविली आहे.

तसेंच म. सा. पत्रिका वर्ष १ अंक २ यांत श्री. ना. कृ. गद्रे यांनीं 'बोडण' शब्दाची उत्पत्ति 'बुद्–बोद्' या धातूपासून सुचविली आहे. परंतु दोन्ही लेखकांच्या उत्पत्त्या बरोबर दिसत नाहींत. कै. राजवाडे यांनीं 'संस्काररत्नमाला' या ग्रंथाचे आधारानें व्युत्पत्तिसह बोडण विधीची माहिती देऊन लेख लिहिला आहे व तो भा. इ. सं. मंडळाच्या प्रथम संमेलन वृत्तांत ( पृ. ३२।३३ ) छापला आहे. बोडण शब्दाची व्युत्पत्ति पुढील प्रमाणें आहे:—

मुट्–मोटति, मोटयति । त्यापासून नाम मोटनम् ।

( सं. ) मोटन=( प्रा. ) मोडण = ( अप. ) वोँडण=( म. ) बोँडण. कालान्तरानें अनुनासिक लुप्त झाला आहे.

[ वर्धन = बड्ढण = वढण=वढण. ]

बोडण ( मोटन ) विधीचे वर्णनापुरते श्लोक कै. राजवाडे यांच्या लेखांतील देतों; त्यांवरून श्री. ना. गो. चापेकर यांचें वर्णन बरोबर असल्याचें दिसेल.

तच्च मोटनमुक्तं मेरुतंत्रे । :—

अथ मोटनकं वक्ष्ये देवाविर्भावकारणम् ।
पाकक्रिया प्रकर्तव्या चतुर्भक्ष्यसमन्विता ॥ १ ॥

भार्यया साध्वेतरस्य पातिव्रत्यादियुक्तया ।
अप्रसूताः स्त्रियः पंच आहूय सुकुमारिकाः ॥ २ ॥

अलंकृताः पवित्रास्ता एकपंक्त्योपवेशयेत् ।
तत्रादौ विघ्नपस्थान-मंत्रे तु वटुकस्य च ॥ ३ ॥

चकारात्कुलदेवतायाः ।

ताः संपूज्य महापात्रे पवित्रे तत्र चार्पयेत् ।
क्रमाद् द्विगुणमानेन मध्वाज्ये च सिताद्धि ॥ ४ ॥

दुग्धं च निक्षिपेत्तत्र नैवेद्यं तत्र निक्षिपेत् ।
कुमारिकाया हस्तेन मन्थयेयुः स्त्रियश्च तत् ॥ ५ ॥

स्त्रीभिस्तस्मिन्मथ्यमाने देवावेशः प्रजायते ।
देवावेशे जायमाने सुगंधो वाति मारुतः ॥ ६ ॥

सर्वं मनोगतं वक्ति देवताशु प्रसीदति ।
सिध्यंति सर्वकार्याणि मोटनानां शतेन च ॥ ७ ॥

विघ्नांचें मोटन ऊर्फ बोडण ज्या आचारानें होतें त्या आचाराचें नांव बोडण ज्या आचारांत अन्नादि संभार मोडून चूर्ण करावयाचा असतो तो बोडण विधि होय संस्काररत्नमाला ग्रंथ गोपिनाथ दीक्षित ओक यांनीं शके १६८७ मध्यें लिहिला आहे व तो आनंदाश्रम ग्रंथावलींत छापून प्रसिद्ध झाला आहे; अशी माहिती सदर लेखांत कै. राजवाडे यांनीं दिली आहे.

वडण ( वढण ? )

साहित्यपत्रिका वर्ष १ अंक ३ यांत श्री. ना. कृ. गद्रे यांनीं 'वडण' संस्कार चें वर्णन दिलें आहे. त्यांच्यामतें बडण हा शब्द 'वटण' पासून मराठींत आला असावा; परंतु त्या व्युत्पत्तीसंबंधीं शंका आहे. माझ्या मतें व्युत्पत्ति खालीं दिल्याप्रमा असावी:—वृध्–वर्धते । यापासून नाम वर्धनम् । ( सं ) वर्धन=( प्रा. ) वड्ढण=(अप. वड्ढण=( मराठी ) वढण; त्यावरून पुढें बडण शब्द झाला असावा.

# इ-उ-कारान्त संस्कृतागत नामें मराठींत प्रथमेंत कशीं लिहावीं ?

( लेखक :- प्र. धों. कानिटकर )

१ वर दिलेल्या शीर्षकासंबंधीं श्री. मोडक यांनीं म. सा. पत्रिकेंत (वर्ष १ अंक ४) लेख लिहिला असून, त्यांनीं दिलेल्या "सप्तविध कारणांस्तव 'कवि'चें कवी, 'भानु'चें भानू अशीं दीर्घान्त रूपें मराठींत प्रशस्त ठरतात" असा निष्कर्ष काढला आहे. श्री. मोडक यांची विवेचनपद्धति पाश्चात्य तर्कशास्त्रांतील Inductive Process प्रमाणें असून निरनिराळे अन्त असलेल्या तिन्ही लिंगी नामांचीं प्रथमाविभक्तीचीं रूपें व मराठींतील कांहीं अव्ययें यांचें परीक्षण करून 'कवी व भानू अशीं प्रथमेचीं दीर्घान्त रूपें प्रशस्त ठरतात' असें सर्वसामान्य तत्त्व त्यांनीं सिद्ध केलें आहे. त्यांची विवेचनाची दिशा द्राविडी प्राणायामाची असून व्याकरणशास्त्रप्रणीत सरळ मार्गाची नाहीं; त्यामुळें एका बिंदूपासून दुसऱ्या बिंदूला जातांना त्या दोन बिंदूंस जोडणाऱ्या सरळ रेषेचा त्यांनीं अवलंब न करितां, दोन बिंदूंस जोडणाऱ्या अर्ध लंबवर्तुळाच्या मार्गानें ते गेल्यामुळें, त्या मार्गाचें आक्रमण करून विवक्षित स्थळीं येण्यास त्यांस दीर्घकाळ लागला असून काढलेला सिद्धांत शास्त्रसिद्ध असून सुद्धां तो शास्त्रशुद्ध मानावा असें सांगण्याची त्यांजवर पाळी आली आहे. याचें मुख्य कारण संस्कृतभाषा व प्रचलित मराठी भाषा यांच्या दरम्यान असलेल्या दोन महत्त्वाच्या पायऱ्यांची उपयुक्तता त्यांना दिसली नाहीं हेंच होय. त्या पायऱ्या म्हणजे प्राकृत व अपभ्रंश भाषा या होत.

२ श्री. मोडक यांनीं कै. राजवाडे यांचें ज्ञानेश्वरीचें व्याकरण पाहण्याची तसदी घेतली असती, तर त्यांना आपला सिद्धान्त स्थापित करण्यास इतके आयास घ्यावे लागले नसते. कै. राजवाडे यांचें व्याकरण नांवावरून ज्ञानेश्वरीपुरतेंच आहे असें सहजीं वाटतें; त्यामुळें वर्तमान मराठींतील व्याकरणाच्या रूपांचें विवरण करण्यास तें उपयोगी पडणार नाहीं अशी श्री. मोडकांची भावना असल्यास न कळे. संस्कृत, महाराष्ट्री व अपभ्रंश या तीन भाषांचीं व्याकरणें विचारांत घेऊन ज्ञानेश्वरीचें व्याकरण अत्यंत परिश्रमपूर्वक लिहिलें असून तें विद्वानांच्या डोळ्यांत भरत नाहीं हें मराठी भाषेचें दुर्दैव होय. या व्याकरणासंबंधानें कोणास महत्त्व वाटत नाहीं व कै. राजवाडे यांच्या परिश्रमाचें व विद्वत्तेचें चीज महाराष्ट्रानें केलें नाहीं असा आशयाचा ज्ञानकोशकारांचा अभिप्राय आहे.

"राजवाडे यांचे महत्त्वाचे व्याकरणग्रंथ म्हटले म्हणजे ज्ञानेश्वरीचें व्याकरण, सुबंतविचार...हे होत. परंतु भाषेतिहासाच्या दृष्टीनें त्यांच्या व्याकरणाचें परीक्षण करण्याची तसदी अजून कोणी घेतली नाहीं." —ज्ञानकोश विभाग ५ पृ. २१५-१६

(रा. ब. वैद्य यांचें परीक्षण ज्ञानकोशकारांच्या नजरेस आलें नाहीं असें दिसतें.) महाराष्ट्रांत वैय्याकरण नाहींत काय? कालिदास कवीचें शाकुंतल नाटक वाचून एक विद्वान हर्षातिरेकानें तें नाटक आदरानें मस्तकावर धारण करून नाचतो, हेमचंद्राच्या व्याकरणग्रंथाची हत्तीवरून मिरवणूक निघते व अमूल्य वाङ्मयरत्न म्हणून त्या व्याकरणास सिद्धराज चालुक्याचे कोशागारांत स्थान मिळतें, परंतु ज्ञानेश्वरीच्या व्याकरणास तसा मान मिळण्याचा राहोच, पण त्याकडे कोणी ढुंकूनसुद्धां पाहूं नये व ज्या महात्म्यानें तीन तपें अविरत वाङ्मयसेवा केली त्याची किंमत महाराष्ट्रास समजूं नये हें आश्चर्य आहे.

३ मराठी भाषा संस्कृत-प्राकृत-अपभ्रंश या त्रयीपासून उद्भूत झाली असून तींत तिन्ही भाषांतील आनुवंशिक संस्कार कायम आहेत. प्राकृत व अपभ्रंश या दोन भाषा वगळून जर कोणी मराठी भाषेचें व्याकरण करूं म्हणेल तर त्यास हें प्रमाणें उजेडांतसद्धां चांचपावेंच लागणार व Inductive Process चा अवलंब केल्या वांचून गत्यंतर राहणार नाहीं. प्राकृत भाषेंत हलन्त शब्द नसून फक्त अ-इ-उ-ऋ-कारांत पुंल्लिंगी शब्द आहेत. इ-उ-कारान्त पुंल्लिंगी शब्दांच्या प्रथमेचें एकवचन ई-कारान्त होतें:—

प्रथमा विभक्ति

| | एकवचन | अनेकवचन |
|---|---|---|
| मुनिः । | मुणी | मुणीओ, मुणिणा |
| अग्निः । | अग्गी | अग्गीओ, अग्गिए |
| कविः । | कवी | कवीओ, कविणो |
| वायुः । | वाऊ | वाऊओ, वाउणो |
| गुरुः । | गुरू | गुरूओ, गुरुणो |
| भानुः । | भाणू | भाणूओ, भाणुणो |

हींच रूपें मराठींत रूढ झालीं आहेत. प्राकृत भाषेंतील दीर्घ इ-उ-कारान्त प्रथमेचे रूपें मराठी भाषेंत प्रकृति समजून मराठींतील विभक्तिप्रत्यय त्यांस लागतात. प्राकृत-भाषेंतील प्रथमेचीं रूपें जशींच्या तशींच गुजराथी भाषेंतहि आहेतः—घोडो, हांडो, सासरो, साळो, इत्यादि.

४ श्री० मोडक यांनीं विवेचनाच्या दिशेसंबंधीं जें लिहिलें आहे, त्यांत पुंल्लिंगी व स्त्रीलिंगी नामें व अव्ययें यांचा एकत्र विचार केला आहे. वास्तविक नामविभक्ती-संबंधीं विवेचन करतांना अव्ययांचा दाखला घेणें इष्ट नाहीं; तसेंच पुंल्लिंगी शब्दांचा विचार करितांना स्त्रीलिंगी शब्दांच्या रूपावरून अनुमानें काढणें बरोबर होणार नाहीं. 'वस्तु'चा वस्त व 'रीति'चा रीत अशीं रूपें करण्याची मराठीची प्रवृत्ति आहे.

"वर्तमान मराठींत अंत्य स्वराचा लोप करण्याकडे प्रवृत्ती आहे. त्यामुळें, माला-माळ, बुद्धि-बुध, मातु-मात, असे अकारान्त स्त्रीलिंगी शब्द बनले आहेत. ही लोप-प्रवृत्ती ज्ञानेश्वर कालींच सुरू झाली होती." (ज्ञा० व्याकरण पृ० ४९)
धनिन् याचें प्राकृतांत प्रथमेचें एकवचन धणी होतें तेंच रूप मराठीनें प्रकृति म्हणून घेतलें आहे. दधि याचें प्राकृतांत प्रथमेचें एकवचन दहिं असें होतें; त्या रूपांतील अनुस्वाराचें रूपांतर अनुनासिकांत होऊन त्यापासून मराठींत दहीँ असा शब्द बनला आहे. दहिं व दहीँ हे दोन्ही शब्द त्रिमात्रकच आहेत. र् लोपाचा संस्कृत भाषेंतील नियम ( धूर्जटी रक्षति ) प्राकृत भाषेस लागू पडत नाहीं. प्राकृतांत 'सर्वत्र लवराम्' या सूत्राप्रमाणें र् चा लोप होतो तेव्हां त्या अक्षरांतील राहिलेलें व्यंजन द्वित्त होतें. जे शक्रः = सक्को; अर्कः = अक्को; तक्रम् = तक्कं. याच नियमाप्रमाणें सर्प—सप्प—[illegible] शब्द बनला आहे. कविः चें कवी व भानुः चें भानू अशीं प्रथमेच्या एकवच-[illegible] रूपें होण्यांत र् लोपाचा संस्कृत भाषेंतील नियम उपयोगी पडत नाहीं.
[illegible] ५ श्री० मोडक यांनीं अंत्य ई—काराविषयीं आनुषंगिक विचार केला आहे. [illegible] त्यांचें म्हणणें "चालण्यांत धनिन्चें तेलीशीं, तर समासगत पूर्वपद होतांना [illegible] साम्य आहे." वास्तविक दोन्ही बाबतींत धनिन् चें तेलीशीं साम्य आहे; परंतु [illegible] मोडक हे धनिन् हा संस्कृत व व तेली हा प्राकृत शब्द घेतात व एका बाबतींत [illegible] नाहीं म्हणतात. तेली याचा मूळ संस्कृत शब्द तैलिन् असून, प्राकृतांत प्रथमेचें [illegible]चन धनिन् चें धणी व तैलिन् चें तेली असें होतें; यामुळें धन्यानें, तेल्यानें हीं [illegible]ारखींच होतात. समासगत पूर्वपदासंबंधीं 'धनिवर' व 'तेलीतांबोळी' असे दोन [illegible]संयुक्त शब्द श्री. मोडक यांनीं घेतले आहेत. परंतु हे दोन्ही समासयुक्त शब्द [illegible] भाषेंतील नाहीं. 'धनिवर' हा शुद्ध संस्कृत नियमानें झालेला समास असून, [illegible]ळ तांबोळी' हा मराठी भाषेंतील शब्दांचा समास आहे; तेव्हां दोहोंत साम्य कसें [illegible]णार? 'धनिवर' याचे ऐवजीं "धनीचाकर" असा मराठी भाषेंतील समास घेतला [illegible] श्री. मोडक यांस "चालण्यांत व समासगत पूर्वपद होतांना" धनीचें तेलीशीं [illegible] साम्य आढळून येईल. श्री. मोडक यांची सप्तविध कारणें अशाच प्रकारचीं आहेत; [illegible] सर्वांवर टीका करण्याचा उद्देश नाहीं व त्याचें फारसें प्रयोजनहि नाहीं. कविः चें [illegible]वी व भानुः चे भानू हीं रूपें श्री. मोडक यांची पद्धत न स्वीकारतां प्राकृत भाषेच्या [illegible]यमानेंच सिद्ध होतात, येवढेंच दाखविण्याचा हेतु असल्यामुळें अधिक विस्ताराचें [illegible]रण नाहीं.

---

# स्त्रियांच्या म्हणी

[ मागील अंकावरून पुढें चालू ] माझ्या भगिनी श्रीमती बाळुताई खानवेलकर [illegible]च्या तोंडून ऐकलेल्या म्हणी.

(८९) आळवाची खाज आळवास ठाऊक

(९०) हिंग गेला पण वास राहिला



(९१) ह्या बोटाची वेदना ह्या बोटास येत नाहीं
(९२) हातावर साखर, मानेवर कातर
(९३) हात ओला तर मित्र भला
(९४) सटवीनें लिहिलें भाळीं, तें न चुके कदाकाळीं
(९५) वेळीं झालें काम, पुष्काळ वांचे दाम
(९६) वीख घेववतें, पण भीक घेववत नाहीं
(९७) वानराची मैत्री, अंगाच्या चिंध्या
(९८) वांझोटीला कातवोळ कशाला ?
(९९) लाख नसावा, पण साख असावा
(१००) टाका आगळें लिहावें, घासा आगळें जेवावें
(१०१) रेड्याचें भांडण, झाडाचें मरण
(१०२) येई वेळे, तो खाई केळें
(१०३) मूर्ख लोक भांडती, वकील घरें बांधती
(१०४) मांजर करी एकादशी, उंदीर मारून भरी कुशी
(१०५) मसणांत देखील कावळ्याचा उपद्रव
(१०६) मनांत मांडे, पदरांत धोंडे
(१०७) भोग फिटे, वैद्य भेटे
(१०८) बाळंतिणीच्या वेदना बाळंतिणीस ठाऊक
(१०९) पोटचें द्यावें, पण पाठचें देऊं नये
(११०) नासलें मिरें जोंधळ्यास हार जात नाहीं
(१११) आवळा पिकायचा नाहीं, समुद्र सुकायचा नाहीं
(११२) आधीं अननम्, मग तननम्
(११३) उफराटा न्याय, गालगुंडे खाय
(११४) उभ्यानें यावें, ओणव्यानें जावें
(११५) ऊन पाण्यानें घर जळत नाहीं
(११६) एका ठिणगीनें घर जळतें
(११७) एका तटीं जेवणें, आणि घांस मोजणें
(११८) गळ्यांत माळा, पोटांत काळा
(११९) घुत्कळतांपेक्षां उकळतीचे घरीं फार
(१२०) घांसून घ्यावें, पण हांसून घेऊं नये
(१२१) टिळे पट्टे नायकाचे, घरीं हाल बायकोचे

निळकंठ शंकर नवरे, सोलापूर.

---

# शब्दसंग्रह

## घोड्याचे शब्द

( लेखकः — चिंतामण गणेश कर्वे, सहसंपादक, महाराष्ट्रशब्दकोश )

आजकाल घोड्याचा उपयोग बसण्याच्या किंवा वाहन ओढण्याच्या कामीं श्रीमंत सुख-लोक फारच कमी करीत असल्यानें घोड्याच्या स्वरूपाची व चालीरीतीची ओळख सुशि-क्षितांसहि राहिलेली नाहीं. तेव्हां त्यासंबंधींची परिभाषा कशी माहीत असणार? 'घोड्याला टांच ...' याचा बरोबर अर्थ किती प्राथमिक शिक्षकांना समजतो? 'पंचकल्याणी घोडा अबलख' ...जे कशा प्रकारचा घोडा हें त्या घोड्याचीं लक्षणें समजल्याखेरीज कसें सांगतां येणार! ...वशास्त्र किंवा अश्वचिकित्साशास्त्र यावर बरेच संस्कृत ग्रंथ आहेत व त्यांतून अश्वपरि-...आढळते; तसेंच अग्निपुराणासारख्यांतून अश्वचिकित्सा आढळते. पण संस्कृत परिभाषा सर्वच रूढ नाहीं. जेवढी आहे तेवढीच जशी आढळली तशी पुढें दिली आहे. हिंदी शब्दांचाहि मोठा भरणा शुद्ध व अपभ्रष्ट स्वरूपांत या मराठी परिभाषेंत दिसून येईल. ...वंच हिंदी परिभाषा न देतां कांहीं निवडक व रूढ शब्द घेतले आहेत. याखेरीज बरेच शब्द असतील. तेव्हां यांतून राहिलेले शब्द कोणी दिल्यास घोड्यासंबंधीं सर्व मराठी शब्द ...कांच्या नजरेखालून जातील व महाराष्ट्रशब्दकोशकारांना कोशांत ते ग्रथित करण्यासहि ...ी पडतील.

...ड्यांच्या जाती (रंगावरून पडलेल्या)

...भोवरा = खिळ्या रंगाचा

...ना = बोरासारख्या रंगाचा

...कुमाइत = काळ्या रंगांत तेल्या रंगाची झांक असणारा

... कुमाइत = तांबड्या रंगांत तेल्या रंगाची झांक असणारा

...ांजनी = एकरंगी अंग पण त्यावर काळे, निळे, तांबडे किंवा पिवळे ठिपके असणारा. ( काळांजनी, रक्तांजनी इत्यादि आणखी कांहीं जाती आहेत )

...या = काळसर उदी रंगाचा

...भुरा = तांबूस व पांढऱ्या रंगाचा

...मुज्या = काळे पांढरे ठिपके असणारा

...कल्याणी = पाय पांढरे व तोंडावर पांढरा पट्टा असणारा

...मंगल = गारोळ्या डोळ्याचा

...ामकर्ण = सर्व अंग पांढरें, फक्त कानच काळे असा

गांगी = शेपटीखालीं व तोंडावर तांबडा, बाकी सर्व पांढरा असा

उदन्यी = उन्नासारखा लाल रंगाचा

काळा अबलख = पांढऱ्या अंगावर काळे ठिपके असणारा

तांबडा अबलख = पांढऱ्या अंगावर तांबडे ठिपके असणारा

...र शुभ लक्षणांवरून पडलेल्या जातीः—

खुंटगाड =

देवमण = मानेखालीं उभी गोम (गोमेसारख्या रेघा) व त्यांत भोंवरा असणारा

पंचमुखी = उरावर भोंवरा असून त्यांत पांच डोळे असणारा

पंचकल्याणी = पाय पांढरे व तोंडावर पांढरा पट्टा असा

पद्म =

रणशूर = रणांगणांत पराक्रम करणारा

श्यामकर्ण = सर्व अंग पांढरें, फक्त कान काळे असा

सेनगांठ = फऱ्याजवळ भोंवरा असणारा
गोम( §अधोमुखी ) = शेंपटीकडे तोंड असणारी केसाची वेणीसारखी किंवा गोमेच्या आकाराची खूण आहे असा
‡बारशिंग = कपाळावर तीन भोंवरे ( खालीं दोन व वर एक ) असणारा
‡गंगापाट = पोटावर गोमेसारखी आकृति असणारा
‡जयमंगल [कैरेडोळ्या] = मांजरासारखे डोळे असणारा
कंठाभरण = मानेखालीं भोंवरा असणारा
‡कुशावर्त = एकाच कुशीवर भोंवरा असणारा
सप्तदंती = सात दांत असणारा
‡याहालकांचन(किंवा लोचन) = मानेच्या दोन्ही बाजूंस आयाळ असणारा
बदकमुख = बदकासारखें लांब तोंड असणारा
पर्वती = चढणीवर जाण्यास चांगला
चिंतामणी = मानेवरचे केस खुरापर्यंत लांब असणारा
मेखलामुख = तंगडीवर पुढील बाजूस उजवीकडे वळलेला भोंवरा असणारा
अष्टमंगल = चार पाय, तोंड, पोट, आयाळ व शेंपूट पांढरें आहे असा
हयकंठी = गळ्यावर भोंवरा असणारा
†अंडावर्त = वृषणाचे जवळ कुशीस भोंवरा असणारा
†पोटावर्त = पोटावर एका बाजूस भोंवरा असणारा
†शिलावर्त = गुढग्याच्या मागें भोंवरा असणारा
†शिपिला = पोटाखालीं पुढील भागीं तंगापाशीं भोंवरा असणारा
†सानपाहूड = रिकीबीखालीं दोन्ही बाजूंस भोंवरा असणारा

३ अशुभ लक्षणांवरून जातीः-
अंसुढाळ ( अंसुपात ) = डोळ्यांतून पाणी गळत आहे असा
अंजनी = एकरंगी अंगावर काळे, निळे, तांबडे किंवा पिवळे ठिपके असणारा
आसनकुहा ( आसनखोड ) = पाठीवर बसण्याच्या जागीं रेघा ( गोमेसारखी ) असणारा
उघडगांड्या ( केरसुणी ) = नेहेमीं वर असणारा
एकांड्या = एकच अंडें असणारा ( अंडाचे दोन भाग वेगळे दिसत नाहीं )
कैरेडोळ्या = मांजरी डोळ्याचा
एवाडी = चार पायांपैकीं एकास पांचवें फुटला आहे असा
उतरंड = कपाळावर एकावर एक तीन उलटे भोंवरे असणारा
खुंटेउपाड = पुढल्या पायाच्या गुढग्यावर भोंवरा असणारा
गोम ( ऊर्ध्वमुखी ) = शेंपटीकडे तोंड असणारी गोमेची आकृति आहे असा
= [२] पोटाखालच्या शिरेवर आहे असा
अक्ष = कपाळावर एकावर एक असे भोंवरे असणारा
चिमटा, चिमूट [ चिमोट ] = कपाळावर जोडीनें दोन भोंवरे असणारा
चक्रावळ = अनेक भोंवरे असणारा
दलभंजन = मागील पुठ्ठ्यावर भोंवरा असणारा
कुसभोंवरा [ कुखावर्त, कुशावर्त ] = कुशीवर भोंवरा असणारा
कुसगोम = कुशीवर गोम असणारा
जांघडजाड =

§ ऊर्ध्वमुखी व अधोमुखी गोमेच्या अर्थाबद्दल एकवाक्यता आढळत नाहीं. अधोमुखीस ऊर्ध्वमुखी नांव वापरलेलें दिसतें.

‡ हीं नांवें अशुभलक्षणांतहि कोठें कोठें सांपडतात.

† हा दोष आहे पण किरकोळ असल्यानें फारसा मानीत नाहींत. यांना मध्यम शुभ लक्षणें म्हणतात.

ुच्छावर्त = शेंपटीपाशीं भोंवरा असणारा
रेकाबदाल = रिकबीच्या जागीं भोंवरा असणारा
तन = पोटाखालीं मण्यासारखी आकृति असणारा
ादमचसम =
ांडकुहा =
जांघभोंवरी ( खिलावर्त, जानुवर्त ) = मांडीवर भोंवरा असणारा
ृदावळ ( हृदावर्त ) = छातीवर कुरळे केंस असणारा
ाखावर्त = काखेंत भोंवरा असणारा
ोटीभोंवरी = शेंडीच्या खालीं भोंवरा असणारा
जभोंवरी ( खोडिल–खांद ) = खांद्यावर भोंवरा असणारा
= दोन कान असूनहि आणखी एका कानास एक देंठ फुटतो असा घोडा
=
तक = ज्याच्या कानांत न दिसण्यासारखे दोन भोंवरे असतात तो
= तोंडावर नाना रंगांचे ठिपके अस-

( हीनदंती ) = पांच दांत असणारा
= डोळ्याच्या भोंवईवर किंवा खालीं भोंवरा असणारा
ामा = खालच्या वरच्या व जबड्यांतले दांत लांब असणारा
नेत्र = तांबड्या डोळ्यांचा
जनी = सगळा एकरंग असून फक्त छातीवर काळा डाग असणारा
नी = सगळा एकरंग पण डाव्या कुशीवर तांबडा असा
गुढघ्यावर भोंवरा असणारा
न = १ नासिकावर्त पहा
कानाच्या मुळाशीं भोंवरा असणारा
ा = नाकांत पांढरा डाग असणारा
( दाढसाकळ ? ) = दाढेखालीं भोंवरा असणारा
डूक ) मुखी = बेडकासारखें तोंड असणारा

लघुदंती = आंखूड दांत असणारा
खिमावर्त = तंगडीवर भोंवरा असणारा
विषानैनी = सापासारखे तांबडे डोळे असणारा
पीतांजनी = सगळा एकरंग पण काखेपाशीं पिवळा असा
श्वेतांजनी = सगळा एक रंग पण फासोळीस पांढरा असा
काळटिक्या = काळे ठिपके असणारा
अहीमुखी ( सर्पजाति ) = सापाच्या जातीचा, ज्याचें तोंड सापासारखें आहे असा
कीरमुख ( रांवामुख ) = पोपटासारखें तोंड असणारा
चांदणी = कपाळावर पांढरा डाग असणारा
शीरगोमी = कपाळावर गोम (गोमेची आकृति) असणारा
हयभंग = पोटावर पांढरे डाग असणारा
अंगावर्त = खांद्यावर भोंवरा असाणरा; फन्यांवर दोन भोंवरे असणारा
पांढरपायी = मागचा एक पाय पांढरा असणारा
उरगळी ( आर्जल ) = डोळ्यावर, उरावर, व गळ्यावर मण्यासारखें चिन्ह असणारा
तुटपटा = तोंडावरील पांढरा पट्टा तीन जागीं तुटक असणारा
सालभुकपाडरी = कानावर पांढरा ठिपका असणारा
नासिकावर्त = नाकपुडीवर भोंवरा असणारा
काकमुखी = सगळा एकरंगी पण तोंड काळसर असा
खरमुखी = खालच्या ओठापेक्षां वरचा ओठ आंखूड असणारा
मध्यदंती = चार दांत असणारा
करालवदन = वरील दांत लांब व खालील आंखूड असणारा
कृष्णटाळुक = टाळूवर काळे ठिपके असणारा
डंखीक = चारादाणा खाऊन मस्तक डोलविणारा
कौस्तुभी = गळयाखालीं चामडें लोंबत आहे असा
व्याघ्रकांती = उन्हांत वाघासारखा दिसणारा

हरिनाग = एकरंगी पण पाठीस पांढरें असणारा
तलावर्त = घोड्यावर बसणाऱ्याचा पाय भोंव-ऱ्यास लागतो असा
कपिमुख = वानरासारखें तोंड असणारा
उजळटिक्या = फासोळीवर पांढरे ठिपके असणारा
गोम ( ऊर्ध्वमुखी ) = डोक्याकडे तोंड असणारी गोम ज्यावर आहे असा
एकरंगी = सगळा एकरंग पण गळ्यास पांढरा ठिपका असणारा
हरएकरंगी =

### ४ घोड्याच्या चाली—

दुडकी चाल = दुडदुड जाणें
चौड ,, = पुढील पाय बराच उचलून झपाट्यानें जाणें
कुत्तर चाल = कुत्र्याप्रमाणें जवळ जवळ पाय टाकीत जाणें
टाकण चाल = चटपट पाय उचलीत सार्थे जाणें
रहिवास चाल = बसणाराचें अंग हलूं न देतां जाणें
सात्रक चाल = चौपायीं हळूहळू धांवणें
तुरकी चाल = तुरुतुरु जलद जाणें
साधी चाल = नेहमींची ( जन्मसिद्ध ) चाल
भरधांव चाल = चौपायीं जलद धांवत जाणें

### ५ घोड्याचें सामान—

दवासने ( आघाडी ) = घोड्यास पुढें बांधण्याचा दोर
पायबंद ( पिछाडी ) = घोड्यास मागील पायांस बांधण्याचा दोर
उरबंद ( गोरबंद ) = घोड्याच्या गळ्यास बांधण्यासाठीं खोगिरास लावलेला पट्टा
लेंडी ( दुमची ) = खोगिरास मागल्या बाजूस लावलेला पट्टा ( हा शेंपटीखालून घेतात )
तंग = खोगीर आवळण्याचा पट्टा
रिकीबा ( रिकीग्या ) = तंगास पट्टे लावून त्यांत लोखंडी [ पाय ठेवण्यासाठीं ] कडीं घालतात तीं
मुंब्रज [मंब्रेज] = घोड्याच्या बगलेवर मा... यावें म्हणून बुटाच्या टाचेजवळ ... विलेली कांट्यांची लोखंडी चाकी ... अस...
जेरबंद = म्होरकीस बांधून तंगांतून ... घेतात तो पट्टा
म्होरकी = घोड्याच्या तोंडास वरच्या ... बसविलेली
कलगी = म्होरकीस दोन्ही बाजूंस ला... झुरमुळ्या
तुरा = म्होरकीच्या वरच्या बाजूस दोन्ही ...च्या मध्यभागीं रुप्याच्या टोपणं... मोरांचीं पिसें बसवितात तो
गेंद = लेंडीस रुप्याचे गोळे बसवितात
कोयऱ्याच्या माळा = रुप्याच्या क... आकाराच्या मण्यांच्या ३।४ पदरी
वाळे = हे पुढील पायांत घालतात
गाशा = खोगिरावरील रेशमी गादी
[ अर्थ न दिलेल्या नांवांचे अर्थ नक्की नाहींत ]

# प्राथमिक शाळांतील व्याकरण विषयाची कमिटीनें तयार केलेली योजना

## ( संपादकीय )

प्राथमिक शाळांत चालू असलेल्या व्याकरणपुस्तकांत भिन्न व परस्परविरोधी मतें प्रतिपादन केलीं असल्यामुळें जो घोटाळा उडतो तो नाहींसा करण्याकरितां शिक्षणखात्यानें एक कमिटी नेमिली होती. त्या कमिटीनें आपलें मत कळविलें असून तें 'प्राथमिक शिक्षण' ह्या मासिकाच्या वर्ष पहिलें अंक मध्यें प्रसिद्ध झालें आहे. या कमिटींत एकंदर ९ सभासद असून त्यांपैकीं बहुतेक विद्वान् आहेत असें म्हणण्यास हरकत नाहीं. तथापि ह्या कमिटींत तिसऱ्या वर्षाची ट्रेनिंग कॉलेजची परीक्षा पास झालेल्या [illegible] जुन्या हुशार अनुभवी शिक्षकाचा समावेश अवश्य करावयास पाहिजे होता असें आम्हांस वाटतें. शिक्षणखात्याला रे. फेअरबँक यांची आठवण व्हावी आणि दुसऱ्या कोणत्याहि वाङ्मय-[illegible] आठवण होऊं नये यांत कांहीं आश्चर्यावह नसलें तरी ही निरुत्साहकारक स्थिति आहे यांत [illegible] नाहीं.

[illegible] मतभेदाचे प्रश्न कमिटीनें हातावेगळे करून फक्त कोणत्या इयत्तांत कोठपर्यंत व्याकरण शिकवावें विषयीं सूचना केल्या आहेत. व्याकरणाचा विषय फार व्यापक आहे. करितां त्याचा सामग्रयानें [illegible]र्थे करणें शक्य नाहीं व आवश्यकहि नाहीं. फक्त आम्ही आपलें मत येथें निर्दिष्ट करितों त्याचा [illegible]त्याकडून विचार होईल अशी आशा आहे.

[illegible]मच्या मतें व्याकरण हा विषय शिकविण्याला आरंभ सहाव्या इयत्तेंतच व्हावा. व्याकरणास [illegible]सऱ्या इयत्तेपासून व्हावा ही कमिटीची सूचना अगदीं अनभ्यस्त माणसाकडून झाल्यासारखी [illegible]व्याकरण समजण्यापूर्वी मुलें भाषा बोलत असतात. वेगवेगळीं माणसें निरनिराळे वाक्यप्रयोग मुलें ऐकत असतात. अशा वेळीं निरनिराळ्या वाक्यांमधील अथवा शब्दांमधील सूक्ष्मभेद शब्दप्रयोगांचा खरा अर्थ मुलांच्या ध्यानांत न आल्यामुळें त्यांच्याकडून अपप्रयोग होण्याचा असतो. करितां व्याकरण शिकण्याच्या पूर्वी अत्यंत आवश्यक गोष्ट करावयास पाहिजे असेल तर कीं मुलांच्या कानावर जीं वाक्यें पडतात त्यांचा त्यांना बिनचूक व सूक्ष्म भेदांसह अर्थ कळावा. [illegible]मजल्याशिवाय व्याकरण समजेल ही चुकीची कल्पना आहे. शाळाखात्याचा व कमिटीचाहि असा [illegible]लेला दिसतो की मुलांना अर्थ समजण्याचें व्याकरण हें एक साधन आहे. 'तो घरीं आहे' आणि [illegible]रांत आहे'; 'तो गाय बांधतो' आणि 'तो गाईला बांधतो'; 'गांवचा पाटील' आणि 'गांवाचें कुंसूं' भेद मोठ्या माणसांनाहि समजत नाहीं. हा भेद शाळेमधेंच मुलांना समजावून देण्याचा प्रयत्न पाहिजे. खरें पाहिलें असतां शाळेमध्यें शिक्षकानें मुलाला बोलायला लावून त्याच्याचकडून अर्थ घ्यावा. 'रामाचें पुस्तक आण' ह्या वाक्याचें पृथक्करण चवथ्या इयत्तेंत मुलांकडून सहज करून घेतां 'रामाचें' म्हटल्यानें काय अर्थ बोध होतो हें मुलांना विचारलें असतां तीं खरा अर्थ सहज सांगू[illegible]. याप्रमाणें सर्व विभक्तींचे प्रत्यय लागलेल्या शब्दांचे अर्थ मुलांकडून व्याकरण शिकविण्या-[illegible]आधीं काढून घेणें हें शिक्षकाचें आद्य कर्तव्य आहे. यानंतर मूळ शब्द 'राम' असतां 'रामाचें' म्हणाव-[illegible] म्हणजे मूळ शब्दाचें रूपांतर कसें होतें अथवा मूळ शब्द दीर्घत्व कसा पावतो ही गोष्ट मुलां-

कडूनच काढून घेतली असता पुढें सामान्य रूपाचे नियम समजण्यास मुलाला यत्किंचितहि क.
जाणार नाहीं. 'रामा आंबा खातो' आणि 'रामा गाईला बांधतो' यांमध्यें दुसऱ्या उदाहरणांत 'ला' प्र
कां लागतो आणि त्यामुळें अर्थभेद कसा उत्पन्न होतो हें चतुर शिक्षकाला मुलाकडून काढून घेतां आ
पाहिजे. 'आंबा खातो' यांत खाण्याची संपूर्ण क्रिया आंब्यावर घडतें तशी 'गाईला बांधतो' यांत बां
ण्याची संपूर्ण क्रिया गाईवर घडत नाहीं ही गोष्ट शिक्षकानें न सांगता मुलें सांगू शकलीं तर व्याकरण
जो पुढें वाऊ वाटतो तो वाटणार नाहीं.

क्रियेला ज्याप्रमाणें कधीं कधीं कर्म नसतें त्याप्रमाणें कर्ताहि नसतो म्हणजे 'अकर्तृक' क्रिया
असतें ही गोष्ट मुलांच्या मनावर ठसविण्याचा प्रयत्न कोणी शिक्षकानें केल्याचें माहीत आहे काय
क्रिया करणारा तो कर्ता असें म्हणून 'मी निजतों' आणि 'मी गेलों' या दोन वाक्यांतील 'मी' ह
समानार्थक आहे असा जो मुलांचा ग्रह शाळेंत केला जातो तो अत्यंत चुकीचा होय. दुसऱ्या उदा
णांत निजण्याची क्रिया माझ्यावर आपोआप माझी इच्छा नसली तरी घडते परंतु पहिल्या उदाह
जाण्याची क्रिया माझ्या कर्तेत्वबुद्धीवरच अवलंबून असते हा फरक मुलांना समजावयास नको
'आणि', 'व', 'पण' वगैरे अव्ययें आहेत हें मुलांना शिकविण्यापूर्वी त्या शब्दांचा इतर शब्दां
विस्तार होत नाहीं एवढीच गोष्ट शिक्षकानें मुलांच्या लक्ष्यांत आणून द्यावी. अनेक वाक्यें मुल
उच्चारून घेऊन त्यांतील प्रत्येक शब्दाची त्यांच्याकडून फोड करून घेणें हेंच काम शिक्षकानें प्र
केलें पाहिजे.

व्याकरण कसें असावें व कसें शिकवावें हें सांगण्याचें हें स्थळ नाहीं. आम्हांला सध्या
सांगावेंसें वाटतें कीं वृत्तें, छंद, अलंकार, काव्यांतील जुनीं रूपें, इतके विषय सातव्या इयत्तेकरित
बाकीचे व्याकरणाचे सर्व प्रकार सहाव्या इयत्तेंत शिकवावे. आणि त्याच्यापूर्वी खालच्या तीन
'व्याकरण' शब्द तोंडावाटें न काढतां, व्याकरणाचे नियम म्हणून न शिकवितां, मुलांना व्याकरण
माहिती होईल अशा तऱ्हेचें शिक्षण देण्यांत यावें. तिसऱ्या इयत्तेपासून व्याकरण शिकविण्यास
करावयास सांगणें म्हणजे अध्यापनकर्माविषयीं अज्ञान प्रकट करणें होय.

---

# अभिप्राय

(१) गोंयकारांची गोंयाभायली वसणूक पैलें खंड.—मोल १॥ रुपाया. बरपी म्हणै व्वा. र. वर्दे वालावलीकार—कोंकणी भाषेंत लिहिलेलें हें पहिलेंच पुस्तक आहे. ही आज पर्यंत व्वोलण्याचीच भाषा असे. मुद्रित लिपीचा संस्कार हिच्यावर प्रथमच घडला. कोंकणी भाषेंत लिहिलेल्या पोथ्या उपलब्ध आहेत कीं नाहींत याची माहिती रा. वर्दे यांनीं प्रस्तावनेंत दिली नाहीं. तथापि या भाषेंत पत्रव्यवहार तरी होत असावा. आजपर्यंत कोंकणी भाषेंत ग्रंथ लिहिण्याचें कोणास सुचलें नाहीं. सध्यां सर्व समाजांत जागृति व स्वकीयोत्कर्षभावना दृग्गोचर होत आहे त्याचेंच प्रस्तुत ग्रंथ हें फल होय. या पुस्तकानें मराठी कोंकणी भाषांचा संबंध ठरविणें सुलभ जाईल. सदरहु पुस्तकांत गोंव्यांतील गोंवेकरांच्या वसाहतीचा इतिहास आहे. अनेक साधनांचा उपयोग या कामीं रा. वर्दे यांनीं परिश्रमपूर्वक केला आहे. कांहीं ठिकाणीं अनुमानें जरी वादविषयक वाटलीं तरी सर्व हकीकत साधार दिली आहे यांत शंका नाहीं. आम्हांला भाषेचें पूर्ण ज्ञान नसल्यामुळें धिटाईनें मतभेद मांडता येत नाहीं. पत्रिकेच्या गेल्या अंकांत आम्ही कोंकणी भाषेचा नमुना दिलाच आहे. तो वाचल्यावर ज्यांना या भाषेविषयीं अधिक जाणण्याची इच्छा झाली असेल त्यांनीं रा. वर्दे यांचें पुस्तक अवश्य वाचावें. एकाद्या भाषेंत प्रथमच ग्रंथ लिहावयाचा तर त्याकरतां प्राचीन इतिहासासारखा महत्त्वाचा विषय घेणें बरें नव्हे असें आम्हांस वाटतें. असो. "कोंकणींत पुस्तक छापचें हें एक साहस आसे." पण हें साहस जर रा. वर्दे यांच्या पचनीं पडलें असेल तर दुसऱ्या खंडाची भेट लवकरच होईल असें मानण्यास हरकत नाहीं. पुस्तकाची छपाई व बांधणी उत्तम आणि विवेचन काळजीपूर्वक.

(२) सुवर्णपंचक — किंमत १ रुपाया. प्रो. श्रीकृष्ण निळकंठ चापेकर यांच्या कवितांचा हा संग्रह रा. राजाराम प्रल्हाद कानिटकर यांनीं प्रसिद्ध केला आहे. सध्यां कवींचा काल आहे. आपल्या कवितापुस्तकांचें बाह्यांग तर मनोहर करण्यांत कवींची चढाओढ चालली आहे असें वाटतें. अंतरंगहि तितकेंच मनोहर करण्याचा हव्यास कवी धरीत असतीलच. प्रो. चापेकर यांच्या कविता चांगल्या आहेत. त्यांच्या वक्तृत्वाचा अनुभव ज्यांना आहे त्यांना त्यांच्या भाषणांत दिसून येणारी रसिकता या त्यांच्या काव्यांत आढळणार नाहीं. म्हणून चापेकरांच्या या कविता श्रुतिमनोहर व प्रसादपूर्ण बनल्या आहेत. कित्येक ठिकाणीं कल्पनासौंदर्यहि आढळून येतें. ईशवंदन, गुलाब, दूतिका आणि इतर या कविता प्रतिभाव्यंजक आहेत. इंग्रजी कवितांचें भाषांतर चांगलें साधलें आहे. रा. टेंमुर्णीकरांची फुलें ही ५१ वी कविता संग्रहित करून विषमता कां साधली आहे समजत नाहीं. पण परोक्षप्रिय लेखकांवाचून इतरांना तें कळण्यासारखें नसेल. रा. दादासाहेब खापर्डे यांनीं या पुस्तकाला प्रस्तावना दिली आहे. त्यांत त्यांच्या विद्वत्तेबरोबर वकिलीकौशल्यहि व्यक्त होतें. प्रो. चापेकर यांनीं इतर प्रसंग कमी केल्यास त्यांच्याहातून "शुचि" काव्य निर्माण होईल असें आम्हांस वाटतें.

(३) मधुसंभार — कवी विरागी, किंमत १ रुपया. भ्रमर निरनिराळ्या वृक्षांवरील पुष्पांतून मध घेऊन एकत्र करतात. अर्थात् ही मध भ्रमरांची नसते. परंतु येथें सर्व मध विरागींचीच आहे. मधुसंभार विरागींचाच ना का प्रकाशकांचा? पुस्तकावरून विरागींचा मधुसंभार प्रकाशकांनीं प्रसिद्ध केला असें दिसतें. असो. कवींचे साधारणतः तीन वर्ग पडतात. (१) नुसते पद्यात्मक रचना करणारे कवी. (२) सुंदर पण असामान्य नव्हे अशा कल्पना प्रसादयुक्त वाणीनें कथन करणारे कवी. आणि (३) हृदयाला हालवून सोडणाऱ्या, मनाला थक्क करून सोडणाऱ्या अपूर्व कल्पनांच्या उच्च भराऱ्या मारणारे कवी. विरागी कवी म्हणजे तिसऱ्या वर्गांतला आहे. पहिल्या वर्गांतील कवी तर छंदोबद्ध गद्य लेखकच म्हणावा. दुसऱ्या वर्गांतील कवींचा भरणा फार असतो. आमच्या मतें "विरागी" यांनीं दुसरें क्षेत्र ओलांडून आतां

ते तिसऱ्या प्रासादाच्या द्वाराशीं येऊन थडकले आहेत. या प्रासादांत शिरून तेथें ते सिंहासनस्थ होवो असें आम्ही इच्छितों. गूढ काव्य एकदम कधींच समजत नाहीं. पण एकदां कां अर्थ समजला म्हणजे काव्याची खरी बहार प्रत्ययास येते. मधुसंभारांतील कविता उच्च दर्ज्याच्या आहेत. विरागी यांचा महाराष्ट्र कवींत बराच वर नंबर लागेल असें आम्हांस वाटतें.

**(४) मराठी भाषेचे व्याकरणकार व व्याकरण प्रबंधकार ( ले० मोरेश्वर सखाराम मोने–** 'अध्यापिका-शाला-हिंगणें ) सर्वसाधारणपणें शेकडा ९९ लोकांना व्याकरण विषयाचें महत्त्व वाटत नाहीं. आणि आपली मातृभाषा शिकण्याला व्याकरण कशाला पाहिजे असाच सर्वजण आक्षेप घेतात. विद्यार्थ्यांना तर व्याकरण म्हटलें कीं कपाळाला आठी पडलीच. आणि कित्येक सुशिक्षितांची तर ऱ्हस्व, दीर्घ व अनुस्वार म्हणजेच व्याकरण अशी समजूत असते. अशी स्थिति असतां व्याकरणकार कोण कोण होऊन गेले त्यांची माहिति मिळवून संग्रह करण्याचा उत्साह कोणाला वाटणार? पण व्याकरण हा भाषेचा पायाच होय. त्याशिवाय भाषेचा उत्कर्ष होणें शक्य नाहीं. भाषेचा योग्य अभ्यास करण्यास व तिची सर्वांगीण वाढ होण्यास व्याकरणाचा अभ्यास ही एक अत्यंत महत्त्वाची बाब होय. आपल्या विद्यार्थ्यांना व्याकरण विषयाचें महत्त्व समजूं नये ही खरोखरच खेदाची गोष्ट होय. याचा कांहींसा दोष व्याकरण शिकविण्याच्या पद्धतीकडेहि आहे. शिकविणारा चांगला असे तर व्याकरणासारखा रुक्ष विषयहि मनोरंजक करून दाखवील. या दृष्टीनें योग्य पुस्तकांची वाण फ असते. ( त्यासाठीं रा. मोने यांनीं 'व्याकरण' हें अप्रिय नांव न देतां 'आपलें बोलणें' म्हणून २ पुस्तकें लिहिलीं आहेत. ) व्याकरणकारांविषयीं सर्व माहिती एकत्रित करण्याचा प्रस्तुतचा संध्या खरच अभिनंदनीय आहे. आद्य मराठी व्याकरणकार कोण याचा निर्णय देणें जरी कठीण तेकरित पंडित भीष्माचार्य, फादर स्टीफन्सन, डॉ. ग्रिअरसन, गंगाधरशास्त्री फडके, बापूशास्त्री शुद्ध तीन परिश्रम स्तुतीस पात्र आहेत. त्यानंतर दादोबा पांडुरंग, थोरले शास्त्रीबुवा, के. आगरकर, वि ाकरण रथीमहारथींनीं आपलें साहाय्य ह्या भाषावृद्धीच्या अत्यंत महत्त्वाच्या भागाला केलें आहे. व्रेण्यास रणांत वादग्रस्त गोष्टी बऱ्याच असून 'नैको मुनिर्यस्य वचः प्रमाणम्' अशीच अभ्यासकार्चा ।स्थां यांत शंका नाहीं. वादविवाद व चर्चा नेहमीच चालू राहते व निकाल कांहींच होत नाहीं. अ अनुच्चारित अनुस्वारांचा प्रश्न हें त्याचें ताजें उदाहरण आहे ह्या दृष्टीनें सर्व महाराष्ट्रीय विद्वा एकत्र जमून निर्णय करावयास पाहिजे. आजपर्यंत ज्यांनीं ह्या मायभाषेच्या गाड्याला हातभार ला त्या सर्वांची माहिती एकत्र करून रा. मोने ह्यांनीं फार महत्त्वाची कामगिरी केली आहे. यांतील व चरित्रें कोणास कदाचित् नको वाटतील पण माहिती काळजीनें गोळा करून पुस्तक फार परिश्रमपू लिहिलें आहे. पूर्वीच्या व्याकरणकारांचीं चरित्रें प्रकाशित झालीं व आजपर्यंतच्या सर्व कामगिरी आढावा एके ठिकाणीं घेतां आला ह्या दोन्ही दृष्टींनीं पुस्तक वाचनीय आहे. आतां यापुढील अभ्यासक आपली मांडणी पद्धतशीर करितां येईल व होऊन गेलेली चर्चा पुन्हा होणार नाहीं. मराठी भाषेच प्रत्येक अभ्यासकानें हें पुस्तक संग्रह करण्यास योग्य आहे अशी आमची शिफारस आहे. रा. ब. साने यांन मृत्यूपूर्वी लिहिलेला शेवटचा लेख म्हणजेच ह्या पुस्तकाची प्रस्तावना लिहून लेखकाचा गौरव केला आहे.

**ना. गो. चापेकर**

**धार संस्थानचा इतिहास—** मराठी साम्राज्यांत पवारांनीं– विशेषतः धारच्या पवारांनीं काय कामगिरी केली याचें टिपण रा. का. कृ. लेले व रा. शि. का. ओक यांनीं या पुस्तकांत केलें आहे धारच्या इतिहासाची त्यांनी केवढी [illegible] आहे व [illegible] मंथन करून प्राचीन कालविभागाची [illegible] पुनर्विर्णे किती प्रयासाचें काम आहे [illegible] लेले यांनीं प्रस्तावनेंत सांगितली आहे ती यथा[illegible] आहे; त्याचप्रमाणें पेशवाईच्या पूर्वी 'पवार' हें नांव धारण करणाऱ्या पुरुषांनीं कर्तबगारी दाखविल्या

त: पुस्तकांत संग्रहीत करण्यांत आले आहेत, पण त्या सत्रांचा संबंध धारच्या पवार घरा-
ण्यास कितपत आधार आहे हा प्रश्न वादग्रस्त दिसतो. खं. २० मध्यें धारच्या पवारांचा
त्याचा विचार या ग्रंथांत केलेला नाहीं; त्याचप्रमाणें निंबाळकरांचें उपनांव पवार आहे
त्यांचा व धारकरांचा संबंध लावतां येतो किंवा काय हाहि प्रश्न विचारांत घेणें आवश्यक
दैवत, गोत्र व कुलाचार यांची माहिती मिळविल्यास या मुद्यांवर प्रकाश पडण्याचा संभव
पि इ. स. १७२३ पासून माळव्यावर मराठ्यांच्या स्वाऱ्या सुरू झाल्या तेव्हांपासून पेशवाई-
र: घराण्यांतील पुरुषांनीं गाजविलेल्या पराक्रमाची यादी तयार करणें हा या पुस्तकाचा मुख्य
हे व त्याची परिश्रमपूर्वक मांडणी करण्याची खटपट या ग्रंथांत झाली असून उल्लेख इतके
ढिंत याचें कारण संस्थानाधिपतींना आपल्या पूर्वजांच्या इतिहासाची असावी तितकी आस्था
स्पष्ट आहे. इतर इतिहासकारांनीं, व संशोधकांनीं आपाततः केलेले पवारांचे उल्लेख व धार
ा संग्रहांतील दप्तर आणि वडोदें, मंडलोई, धरमपुरी येथील एकादा दुसरा कागद एवढ्या
वार इतिहास लिहिण्याचा प्रसंग आल्यावर रा. लेले व ओक यांनीं कितीहि मेहेनत केली तरी
ची सजावट मनोहर व्हावी कशी? पवार घराण्याचा खरा इतिहास तयार होण्यास महाराष्ट्रांत
ठिकाणीं प्रवास करून अनेक विद्वानांची मेहनत खर्ची पडेल अशी योजना संस्थानाधिपतींनीं
ाहिजे व इतिहासलेखकांनीं देखील पवार घराण्यांतील पुरुष म्हटले कीं त्यांचें अवास्तव गौरव
वा मोह आवरून यथार्थ वर्णन ज्यानें होईल असेच शब्द वापरण्याची खबरदारी घेतली
उदाहरणार्थ, प्रस्तुत ग्रंथांत पृ. ११ वर इ. स. १७२६ मध्यें उदाजीराव व छत्रपती शाहू-
यांमध्यें 'तहनामा' झाला असें म्हटलें आहे, पण उदाजीराव हे छत्रपतींचे नोकर होते त्याअर्थी
नामा' हा शब्द पवारांचा गौरव ध्वनित करण्याचाठीं योजण्याचा मोह ग्रंथकारांना झाला असें
भाग पडतें. तात्पर्य, संस्थानिकांना आपापल्या संस्थानांचा इतिहास लिहिला जावा असें वाटूं
ही अभिनंदनीय गोष्ट आहे. पण हें काम केवळ इच्छामात्रेंकरून सिद्ध होणारें नसून त्याचें
लक्षांत आणणें व त्यास साजेसा खर्च करणें याचीहि जबाबदारी त्यांच्यावर येऊन पडते व इति-
लेहिणारांनीं देखील 'भरपूर सामुग्री मिळाल्यावांचून इतिहास लिहितां येणार नाहीं' हें स्पष्टपणें
तींच्या निदर्शनास आणणें व आश्रयदात्याच्या पूर्वजांची कामगिरी वर्णन करतांना निर्भीडपणाची
स्वीकारणें अवश्य आहे हा इषारा प्रस्तुत ग्रंथाच्या समालोचनप्रसंगीं देऊन ठेवणें आम्हांस भाग

द. वि. आपटे

## मासिकें वगैरे

**आर्यविज्ञान**, (सांगें–गोंवा) वर्ष २ रें अंक ३ यांतील 'निरयन पंचांगा'वरील लेख वाचनीय

**लोकशिक्षण**, जानेवारी व फेब्रुवारीचे दोन्हीं अंक नेहमीप्रमाणेंच भारदस्त व मननीय लेखांनीं
ले आहेत.

**भा. इ. सं. मंडळाचें त्रैमासिक**, वर्ष ९ वें अंक २ व ३ वेळेवर अंक निघूं लागले ही
मंडळाच्या चिटणीसांस भूषणावह आहे.

**सहविचार** वर्ष ७ अंक ३ व ४.

**द्रौपदी**, ले० सौ. सरस्वतीबाई गाडगीळ ( आर्य–स्त्री–प्रबोधमाला, सांगली ) लेखिकेच्या
चरित्राप्रमाणेंच हेंहि मुलामुलींस वाचण्यास देण्यास योग्य आहे.

**लोकमित्र**, डिसेंबर १९२८.

**समाजसुधारक**, जानेवारी १९२९ पासून नवीन सुरू झालें.

परिषद्वार्ता

# महाराष्ट्र-साहित्य-संमेलन

साहित्य-संमेलन बेळगांव येथें पुढल्या महिन्यांत भरेल. या संमेलनाला महाराष्ट्रांतील सर्व प्रमुख मंडळी हजर राहतील अशी आम्हांस आशा आहे. बेळगांवच्या मंडळीचा उत्साह व निश्चय अढळ आहे. या संमेलनाला कर्नाटक-साहित्य-परिषदेचा विरोध आहे ही खेदाची गोष्ट आहे. एका साहित्य-परिषदेनें दुसऱ्या साहित्य-परिषदेकडून भाषोत्तेजनाच्या कामीं करण्यांत येणाऱ्या प्रयत्नांना विरोध करणें हा शिष्टाचाराचा भंग आहे असें आम्हांस वाटतें. कर्नाटक-साहित्य-परिषदेनें खालील ठराव करून आमच्याकडे पाठविला आहे. "कर्नाटक साहित्य परिषदेच्या कार्यकारी मंडळाचें असें ठाम मत आहे कीं त्यां... तीव्र विरोध असतांहि कांहीं स्थानिक गृहस्थांनीं या वर्षीं बेळगावांस म. सा. संमेलन भरविण्... आमंत्रण दिलें, तसेंच या विरोधाची माहिती असूनहि म. सा. परिषदेनें वरील गोष्टीस आपली संम... दिली त्याअर्थी म. सा. संमेलन बेळगांवास भरूं नये कारण त्यामुळें महाराष्ट्र व कर्नाटक यांत आजपर्य... नांदत असलेला स्नेहसंबंध व प्रेमभाव यांस बाधा येऊन दोघांचेंहि नुकसान होईल अशीं स्पष्ट चिन्हें दिसत आहेत."

या ठरावाला उत्तर देण्याचें वस्तुतः कारण नाहीं. कर्नाटकांतील विद्वानांनीं निर्विका... आपल्याशींच विचार केला तर त्यांनाच वरील म्हणण्यांतील फोलपणा दिसून येईल. बेळगांव जि... जे एक तृतीयांश महाराष्ट्रीय आहेत त्यांनीं आपल्या घरीं मराठी बोलूं नये व वाचूं नये असें कर्नाटकां... लोकांचें म्हणणें असल्याचें आमच्या ऐकिवांत नाहीं. मग मातृभाषेविषयीं संमेलन भरवून आदर व... दाखविण्यांस प्रतिबंध कां असावा ? साहित्यवृद्धि हाच संमेलन भरविण्याचा उद्देश असतो. प्रांत... करणें हा नाहीं. मद्रास इलाख्यांत किंवा संयुक्त प्रांतांत म. सा. संमेलनें भरवतां येणार नाहींत क... समजा उद्या तंजावरला अथवा काशीस म. सा. संमेलन भरलें तर हीं दोन शहरें महाराष्ट्रांत स... करावीं असा संमेलन भरविणारांचा कावा आहे असें म्हणतां येणें शक्य आहे काय ? मग आ... कानडी बंधूंनीं आपलें मन उगाच कलुषित करून कां घ्यावें ? अतिस्नेहः पापशंकी. आम्ही असें आ... सन देतों कीं बेळगांवीं संमेलन भरविण्यांत कानडी मराठी बंधूंत वसत असलेल्या स्नेहावर पाणी ... ण्याची महाराष्ट्रीयांची तादृश इच्छा नाहीं.

कर्नाटक व महाराष्ट्र यांत बंधुप्रेम आतांपर्यंत आहे हें आमच्या कानडी बंधूंचें म्हणणें प्रत्येक महाराष्ट्रियाला आनंदच वाटेल. या बंधुप्रेमावर विरजण पडेल असें कोणतेंहि कृत्य बेळगांव संमेलनांत केलें जाणार नाहीं अशी आम्ही खातरजमा देतों. कर्नाटकांत वैष्णव व शैव गुण्यागोविंदानें राहूं शकतात मग मराठी व कानडी कां राहूं शकणार नाहींत ? कर्नाटक-संमेलन मुंबईस भरलें त्याला अडथळा कोण करूं शकेल ? तात्पर्य, कानडी बंधूनीं आपल्या मनातल्या सर्व कुशंका सो... म. सा. संमेलनास उत्साहानें साहाय्य करावें आणि असें केल्यानें उभयतांतील स्नेहसंबंध दृढतर हो... असें आम्हांस वाटतें.

तद् उपरिष्टाद् व्याख्यास्यामः

ह्या ऋचेचा अर्थ पुढें (निरु० ४।२३) देऊं.

' अदितिर्द्यौरदितिरन्तरिक्षं० व्याख्यास्यामः ' हें प्रक्षिप्त असावें. अदितिः सर्वं
ा शब्दांनीं ही ऋचा सहज ध्यानांत येते. तिचा येथें निर्देश करण्याची कांहीं एक
रूरी नाहीं. उत्तरांत अदितिः सर्वं एवढयानेंच कार्यभाग साधला आहे.

अथापि अविस्पष्टार्थाः भवन्ति

शिवाय मंत्रांचा अर्थ स्पष्ट नसतो.

अम्यक् यादृश्मिन् जारयायि काणुका

ह्या शब्दांचा कांहीं एक अर्थ होत नाहीं.

## खंड १६ वा

अर्थवन्तः शब्दसामान्यात्

तुम्हीं म्हणतां मंत्र अनर्थक आहेत म्हणून. आम्हीं म्हणतों मंत्रांना अर्थ आहे.
ण एरव्हींच्या संस्कृतांत जे शब्द आपण वापरतों तेच शब्द ऋचांत आहेत. तेव्हां
शब्दांना एरव्हींच्या संस्कृतांत अर्थ असतो ते शब्द मंत्रांत आले असतांना अर्थ-
कसे होतील ?

यथो एतद्

तुम्ही म्हणतां कीं

नियतवाचोयुक्तयः नियतानुपूर्व्याः भवन्ति इति

(खंड १५ वा पहा)

लौकिकेषु अपि एतद्

लौकिक प्रयोगांत सुद्धां अमकेच शब्द व अमकाच क्रम आपणास आढळतो. जसें

इन्द्राग्नी पितापुत्रौ इति

अग्नीन्द्रौ पुत्रपितरौ असे प्रयोग अशुद्ध होत. घ्यन्तात् अजाद्यदन्तं विप्रतिषेधेन
जी दीक्षित पाणिनिसूत्र २।२।३३ संबंधानें म्हणतात. म्हणजे इन्द्राग्नी
योग पाहिजे; अग्नीन्द्रौ हा प्रयोग बरोबर नाहीं. 'अभ्यर्हितं च' ह्या वार्तिकानें
हा प्रयोग अशुद्ध ठरतो. पण ह्यांना अशुद्ध ठरविणारीं सूत्रें पाणिनीचीं
वरून असें अनुमान निघेल कीं अग्नीन्द्रौ व पुत्रपितरौ हे प्रयोग यास्ककालीं
ले होते. ते पाणिनीला अशुद्ध वाटले नाहींत. पण पुढें ते अशुद्ध असेच
किंवा पाणिनीच्या लक्षांत हे अपप्रयोग आले नसावेत.

एतद् ब्राह्मणेन रूपसंपन्नाः विधीयन्ते इ

१५ वा पहा)

नुवादः स भवति

ांत जें सांगितलें असतें तें मंत्रांत जें सांगितलें असतें त्याचा केवळ

अनुवाद होय. ब्राम्हण ग्रंथ आपल्या पदरचें कांहीं सांगत नाहींत. मंत्रांत सांगितलेल्याची ब्राम्हण पुनरुक्ति करतें. गुर्जरपाठांत उदितानुवाकुः असा पाठ आहे. दुर्गवृत्तींतही मन्त्रस्यार्थं 'ब्राम्हणम् अनुवक्ति विस्तरेण' असे शब्द आहेत. तेव्हां त्यानें स्वीकारलेल्या पाठांतही अनुवाकुः असाच शब्द असावा. वृत्तींत कोणी कुः च्या ठिकाणीं दुः अक्षर घातलें असावें. नाहींतर दुर्गानें अनुवदति असा शब्द घातला असता.

'एतद्वै यज्ञस्य समृद्धं यद्रूपसमृद्धं यत्कर्म क्रियमाणं ऋग् अभिवदति'

हें वाक्य ऐतरेयब्राह्मणांत १२ वेळां आलें आहे.

कर्मणः यत् अङ्गं रूपसमृद्धं भवति एतत् एव यज्ञस्य अङ्गेषु समृद्धं संपूर्णम् । न तस्मिन् किंचित् अपि वैकल्यम् अस्ति । का इयं रूपसमृद्धिः इति चेत् । पठ्यमाना इयम् ऋग् अनुष्ठीयमानं कर्म अभि वदति साकल्येन ब्रवीति इति यत् अस्ति एषा एव रूपसमृद्धिः (सायणभाष्य—ऐत० ब्रा १।४)= यज्ञांतील जें अंग रूपसमृद्ध असतें त्यालाच संपूर्ण समजावें. कारण त्यांत कांहींएक न्यून नसतें. केल्या जाणाऱ्या कर्माचें जींत पूर्ण वर्णन आहे अशी ऋचा कर्म चालू असतांना जेव्हां पठन केली जाते तेव्हां तें कर्म रूपसमृद्ध होतें.

रूप म्हणजे कर्माचें वैशिष्ट्य. अग्नि मंथन केल्यावर त्याला आहवनीय कुंडांत टाकावयाचें असतें व त्यावेळीं योग्य मंत्र म्हणावयाचा असतो. आहवनीयांत टाकावयाच्या अग्नीला प्रह्रियमाण म्हणतात. हें त्या क्रियेचें रूप. प्र देवं देववीतये भरता वसुवित्तमम् ( ऋ० सं० ६।१६।४१) ह्या ऋचेंत प्रभरत हा शब्द आहे. तेव्हां प्रह्रियमाण ह्या गुणाला अनुरूप अशी ही ऋचा आहे; म्हणून ही ऋचा अभिरूप (अभिरूपा) होते. यत् यज्ञे अभिरूपं तत् समृद्धं म्हणजे अशा अभिरूप ऋचांनीं युक्त जें यज्ञांग तेंच समृद्ध म्हणजे संपूर्ण.

क्रियमाणं कर्म या ऋक् अभिवदति सा अभिरूपा. कर्माला योग्य अशा ऋचा ऐतरेयब्राह्मणांत पुष्कळ दिल्या आहेत.

आक्षेपक म्हणतो कीं ऋचा अभिरूप नसतांना ब्राह्मणें त्यांस ओढाताण करून रूपसंपन्न म्हणजे अभिरूप बनवितात. त्याला यास्क खोडून टाकतो. ऋचा जात्याच अभिरूप असतात. त्या तशा कराव्या लागत नाहींत. त्यांत जें उदित म्हणजे सांगितलें असतें तेंच ब्राह्मणें पुनः सांगतात. ऋचेंतल्या शब्दांचीच ब्राह्मणें पुनरुक्ति करतात.

एतद्वै यज्ञस्य० भिवदति हें वाक्य उदितानुवादः ह्यानंतर लिहावयास पाहिजे व तसें तें मूळचें असेलच. सध्यांच्या निरुक्तांत तें भलत्या ठिकाणीं पडलें आहे. त्यानें सर्व आक्षेपांचें निरसन होत नाहीं. तें एकाच आक्षेपाला उत्तर आहे.

आक्षेपकानें रूपसंपन्नः हें विशेषण मुद्दाम घातलें आहे. रूपसंपन्न म्हणजे रूपयुक्त म्हणजे बाहेरून त्यांत रूप म्हणजे अमका एक गुण त्यांत ढकललेला असतो. तो मूळचा त्यांत नसतो. रूपसमृद्ध ह्यानें मूलतःच रूपानें परिपूर्ण असा अर्थ होतो.

रूपसंपन्नाः = लिङ्गसंपन्नाः प्रकटलिङ्गाः अपि सन्तः, व विधीयन्ते = रूपसंपन्नत्वम् अविवक्षितं कृत्वा कर्मसु विधीयन्ते असा दुर्गाचार्य अर्थ करतो. म्हणजे जरी मंत्रांत देवता वगैरे स्पष्ट असतात तरी तिकडे लक्ष न देतां अमक्या कर्मांत त्यांचा विनियोग करावा असें ब्राह्मणें सांगतात; जर मंत्र सार्थ असते तर ब्राह्मणांनीं त्यांचा विनियोग सांगितला नसता; ब्राह्मण विनियोग सांगतात एवढ्यावरूनच मंत्र निरर्थक असें सिद्ध होतें. पण असा अर्थ करणें बरोबर नाहीं. रूपसंपन्न नाहींत असेंच आक्षेपक म्हणणार. रूपसंपन्नत्वाची कबूली आक्षेपक कधींही देणार नाहीं.

समृद्धं हा शब्द सायणाचार्यांनीं अङ्गं अध्याहृत ह्याचें विशेषण केलें आहे. परंतु तो शब्द समृद्धि ह्याऐवजीं घातला असावा. तसें असल्यास अर्थ थोडा निराळा होईल. तो असाः—

एतत् वै यज्ञस्य समृद्धं = एषा वै यज्ञस्य समृद्धिः । का सा । यत् रूपसमृद्धं = या रूपसमृद्धिः । का सा रूपसमृद्धिः । यत् यज्ञकर्म क्रियमाणं सत् ऋक् अभिवदति । यदा यज्ञकर्मणि अभिरूपाः ऋचः प्रयुज्यन्ते तदा तस्य कर्मणः समृद्धिः पूर्णता भवति = जेव्हां यज्ञकर्म चालूं असतांना त्यांत अभिरूप ऋचा म्हटल्या जातात तेव्हां ती रूपसमृद्धि म्हणजे त्या यज्ञाची समृद्धि होते म्हणजे तो यज्ञ पूर्ण होतो.

हल्लींच्या सर्व प्रतींत ऋक् ह्यानंतर यजुर्वा असे शब्द घातलेले आढळतात. हे शब्द ऐतरेयब्राह्मणांत कोठेंही घातले नाहींत. गोपथब्राह्मणांत ते आढळतात. पण त्यांची मुळीं जरूरी नाहीं. ऐतरेयब्राह्मणांत अभिरूपा ऋक् असें येतें; अभिरूपं यजुः असें कोठेंही आढळत नाहीं. शिवाय यास्कानें ऋचेचेंच उदाहरण दिलें आहे. दुर्गवृत्तींतही ' यजुर्वा ' हे शब्द घुसडले आहेत.

**क्रीळन्तौ पुत्रैर्नप्तृभिः इति**
**इहैव स्तं मा वि यौष्टं विश्वमायुर्व्यश्नुतम् ।**

क्रीळन्तौ पुत्रैर्नप्तृभिः ( ऋ० सं० १० । ८६ । ४२ ) = हे नवरानवरीनों, ह्या घरांतच पुत्रपौत्रांसह खेळत म्हणजे आनंदांत रहा; वेगळे राहूं नका ( तुमची ताटातूट न होवो). ह्या रीतीनें पूर्ण आयुष्य भोगा.

विवाहकर्म चाललें असतांना ही ऋचा म्हणतात. ती अगदीं अभिरूप आहे. विवाहाचें जें रूप, जें वैशिष्ट्य - एकत्र राहणें, पोराबाळांमध्यें आनंदांत राहणें, कधींही ताटातूट न होणें, शंभर वर्षें जगणें—त्याला ह्या ऋचेनें पाठिंबा मिळतो.

**यथो एतत् अनुपपन्नार्थाः भवन्ति इति**

(खंड १५ वा पहा )

**आम्नायवचनात् अहिंसा प्रतीयेत**

'त्रात्यै' व 'अहिंसायै' असे शब्द काठकसंहितेंत आहेत; त्यावरूनच हिंसा होत नाहीं अशी श्रद्धा ठेविलीच पाहिजे व तशी मनाची खात्री झालीच पाहिजे.

**यथो एतत् विप्रतिषिद्धार्थाः भवन्ति इति**

(खंड १५ वा पहा)

**लौकिकेषु अपि एतत्**

लोकांच्या बोलण्यांतही असा विरोध दिसून येतो.

**यथा असपत्नोऽयं ब्राह्मणः**

जसें, ह्या ब्राह्मणाला कोणी शत्रु नाहीं.

**अनमित्रः राजा इति**

ह्या राजाला शत्रु नाहीं.

राजा आणि शत्रु नाहीं अशी गोष्ट व्हावयाचीच नाहीं. थोडेतरी शत्रु असणारच. ब्राह्मण सौम्य तथापि त्यांचासुद्धां हेवादावा एखाद दुसरा करणारच. ही केवळ अतिशयोक्ति होय. ह्या दोहोंपैकीं अनमित्रो राजा हें उदाहरण उत्तरादाखल ज्यास्त लागू पडेल. दुर्ग अनमित्रो राजा ह्याचें विवरण करीत नाहीं. ह्यावरून तें वाक्य त्याच्या प्रतींत नव्हतें कीं काय ? त्याचप्रमाणें रुद्राच्या दोन उदाहरणांचाही तो उल्लेख करीत नाहीं; अशत्रुरिन्द्र जज्ञिषे व शतं सेना अजयत्साकमिन्द्रः एवढ्याचाच करतो.

**यथा एतत् जानन्तं संप्रेष्यतीति**

(खंड १५ वा पहा)

**जानन्तम् अभिवादयते**

आपल्याला कोण नमस्कार करीत आहे हें गुरूला दिसतें; तथापि नमस्कार करणारा मी अमकाअमका आपल्याला नमस्कार करीत आहें असें म्हणतो. तेव्हां ही एक पद्धत पडून गेली आहे असें समजावयाचें. ह्या पद्धतीला अनुलक्षूनच याज्ञवल्क्य म्हणतोः-ततोऽभिवादयेद्वृद्धानसावहमिति ब्रुवन् (याज्ञ० स्मृति २।२६)= मी अमका असें म्हणून लहानानें वृद्धांना साष्टांग नमस्कार घालावा.

**जानते मधुपर्कं प्राह**

जेव्हां आपल्या घरीं गुरु, राजा, जावई वगैरे येतात तेव्हां त्यांस मधुपर्क-दही व मध ह्यांचें मिश्रण-द्यावयाचा असतो. त्यावेळीं मधुपर्कः मधुपर्कः मधुपर्कः असें तीनदां म्हणावयाचें असतें तसें सांगण्याची चाल पडली आहे. (आश्वलायनगृह्यसूत्र अध्याय १ खंड २४).

**यथो एतत् अदितिः सर्वमिति**

(खंड १५ वा पहा)

**लौकिकेषु अपि एतत्**

(अर्थ वर दिला आहे)

**यथा सर्वरसाः अनुप्राप्ताः पानीयम् इति**

जसें खारट, तुरट वगैरे सर्व रस पाण्यांत आहेत. पाण्यांत जो पदार्थ मिसळला असेल त्याची चव पाण्याला येते. त्याप्रमाणें अदितीला बाप, लेक वगैरे म्हणण्याचें कांहीं कारण असावें. अदितीमध्यें पिता, माता वगैरेंचे गुण असतील म्हणून आलंकारिक

भाषेंत ती सर्व कांहीं आहे असें म्हटलें आहे.

**यथो एतत् अविस्पष्टार्थाः भवन्ति इति**

(खंड १५ वा पहा.)

**न एष स्थाणोः अपराधः यद् एनम् अन्धः न पश्यति**

आंधळ्याला खांब दिसत नाहीं हा कांहीं खांबाचा दोष नाहीं.

**पुरुषापराधः सः भवति**

तो त्या मनुष्याचा दोष होय.

एवढा मोठा खांब डोळस माणसाला सहज दिसणारा; तुझें डोकें त्याच्यावरतीं आपटतें हा तुझा दोष; डोळे उघडून चाल; डोळे नसतील तर तुझें नशीब. वेदाचा अर्थ खांबासारखा स्पष्ट आहे. तुला कळत नाहीं ह्याचें कारण तुझें अज्ञान.

**यथा जानपदीषु विद्यातः पुरुषविशेषः भवति**

जसें एखाद्या देशांत राहणाऱ्या लोकांत (जानपदीषु=जनपदे वर्तमानासु प्रजासु) विद्येमुळें मनुष्यामनुष्यांत विशेष म्हणजे भेद दिसून येतो. विद्येवरून मनुष्यांना कमी ज्यास्त मान मिळतो. पुरुषाणां विशेषः पुरुषविशेषः.

**पारोवर्यवित्सु तु खलु वेदितृषु भूयोविद्यः प्रशस्यो भवति**

पर म्हणजे श्रेष्ठ, अवर म्हणजे कमी प्रतीचें. श्रेष्ठ, कमी श्रेष्ठ असे विद्येचे नानाप्रकार असतील. कित्येकांना कमी प्रतीच्या विद्या येत असतील. कित्येकांना एकच विद्या येत असेल, कांहींना अनेक येत असतील. पारोवर्यवित्सु म्हणजे नानाप्रकारच्या विद्या जाणणाऱ्यांमध्यें. वेदितृषु म्हणजे विद्वानांत. अशा विद्वानांत सुद्धां ज्याला पुष्कळ प्रकारच्या विद्या येतात (भूयोविद्यः) त्याची प्रशंसा होते.

ह्यावरून वेदाचा अर्थ कळणें, सगळा न कळणें, थोडा कळणें, मुळींच न कळणें हें सर्व प्रकार ज्ञानाच्या प्रमाणावर अवलंबून असतात. तेव्हां वेदाला अर्थच नाहीं हें म्हणणें वेडेपणाचें होय. अशा प्रकारें आक्षेपांचें खंडन केलेलें पाहून दुर्गाचार्याला आवेश येतो व खंडाचा शेवट तो श्लोकानें करतो. आक्षेपकानें काढलेल्या आक्षेपांचा धुव्वा उडवून टाकला व स्वपक्षाचें मंडन केलें. मंत्र सार्थ आहेत हें सिद्ध केलें त्यामुळें निरुक्तशास्त्रही सार्थ ठरतें, असा त्या श्लोकाचा अर्थ आहे.

ह्या वढाईला एकच उत्तर; तें हें कीं मंत्रांचा अर्थ करणें हा या शास्त्राचा हेतु नसून अर्थावरून शब्दांची व्युत्पत्ति देणें हा होय. आक्षेपकानें काढलेले आक्षेप पोचट आहेत.

(१) मंत्र छन्दोबद्ध असल्याकारणानें अमकेच शब्द घालणें व अमक्याच क्रमानें ते मांडणें हें अपरिहार्य होतें. छंद बदला किंवा गद्यांत लिहा; लागलेच शब्द व क्रम दोन्हीही बदलावे लागतात. एकाच अर्थाच्या ऋचा ऋग्वेदांत पुष्कळ आढळतात. त्यांत भिन्न शब्द व भिन्न क्रम दृष्टीस पडतो.

(२) ब्राह्मणें हीं यज्ञासाठीं लिहिलीं गेलीं. यज्ञांत कोणच्या ऋचा कोणी व केव्हां

म्हणावयाच्या हें त्या ग्रंथांत सांगितलें असतें. आपला स्वतःचा यज्ञांत विनियोग करून घेणें हें ऋचांचें काम नाहीं. योग्य ठिकाणीं योग्य ऋचा म्हणाव्या लागतात ह्यावरून ऋचा अर्थरहित ठरत नाहींत. वेदाचा बराचसा भाग काव्यस्फूर्तीनें रचला गेला आहे. कांहीं मुद्दाम यज्ञार्थ रचला गेला आहे. ह्या दुसऱ्या वर्गांतील बऱ्याच ऋचा कशातरी रचल्या आहेत. नवव्या मंडलांतील बऱ्याच ऋचा अशा धर्तीच्या आहेत.

(३) विसंगति (४) व परस्परविरोध ह्यावरून ऋचांना अर्थ नाहीं असें कसें म्हणतां येईल ? फार झालें तर वेडगळपणाचा आक्षेप आणितां येईल. कवि निरनिराळ्या मनोवृत्तींत काव्य रचतो; त्यांचें प्रतिबिंब त्याच्या कृतींत न पडेल तर नवल. इंद्राला शत्रु नाहींत असें एकवेळ वाटतें तर दुसऱ्या एका प्रसंगीं तो लक्षावधि शत्रूंना दे माय धरणी ठाय असें करून टाकतो असें कवि म्हणतो. दोन्हीही गुणवर्णनेंच होत. काव्य म्हणजे तर्क नव्हे.

हिंसेचें समर्थन करावें लागणें हें मन संस्कृत होत आहे ह्याचें एक लक्षणच होय. देवांना खूप केलेली हिंसा ती हिंसा नव्हेच. देवतृप्त्यर्थ मनुष्य आपलें रक्त ओतावयाला तयार होतो. हा सर्व श्रद्धेचा खेळ होय. एक आंग्ल ग्रंथकार म्हणतो कीं बर्फ काळें असतें असें जर बायबलांत म्हटलें असेल तर तें मला मान्य केलेंच पाहिजे.

(४) व्यवहारांत अमकें करावें तमकें करावें अशा चाली उत्पन्न होतात. न्यायचेऱ्यांत न्यायाधीश प्रवेश करतांच चोपदार ललकारा होतो; त्याचें कांहीं एक प्रयोजन नसतें. परंतु पद्धत ठरलेली असते; ती मोडवत नाहीं. यज्ञांत जे प्रैष म्हणजे आज्ञा दिल्या असतात त्या आरंभीं आरंभीं स्मरणासाठीं व चूक होऊं नये म्हणून दिल्या असाव्यात. पुढें तसें करण्याचा प्रचार पडून गेला.

(५) अदिति ही एके काळीं प्रचंड देवता होती. सर्व कांहीं अदिति असें म्हणण्यास काय हरकत आहे ? अदिति आमचा पिता माता वगैरे म्हणण्यानें त्या देवतेचें महत्त्व दर्शविलें जातें. विठोबाला तुकाराममहाराज विठाई म्हणतात.

(६) वेदकाळीं सुद्धां पुष्कळ शब्दांचा मूळचा अर्थ नाहींसा झाला होता. अनेहस्, इषिर असे शब्द केवळ सामान्यविशेषणें होऊन बसले होते. पाणिनीय संस्कृत व ऋग्वेद संस्कृत ह्यांत जमीनअस्मानाचें अंतर आहे. व्याकरण निराळें, शब्द निराळे, वाक्यरचना निराळी, ह्यामुळें अर्थ करणें कठीण जातें. पुष्कळशा शब्दांचा अर्थच कळत नाहीं. किती शहाणा असला तरी हातच टेकावे लागतात. यास्क, सायण वगैरेंनीं दिलेल्या अर्थांनीं समाधान होत नाहीं. अर्थ करण्याला पाश्चात्य पद्धतीच पत्करली पाहिजे. शब्दांचा तात्पुरता अर्थ करण्यापासून कांहींएक लाभ नाहीं. सायणभाष्यांत अर्थांच्या हजारों चुका दाखवितां येतील. यास्क म्हणतो ऋचांचा अर्थ उघड उघड आहे. पण हें विधान साफ खोटें आहे.

आक्षेपकाच्या आक्षेपांनीं वेदाला अर्थ नाहीं असें मुळींच ठरत नाहीं.

हे व ह्याहून थोडे अधिक आक्षेप ह्यांचें निरसन मीमांसादर्शन अध्याय पहिला भाग दुसरा ह्यांत ३१ ते ५३ सूत्रें व त्यावरील शाबरभाष्य ह्यांत केलें आहे. सूत्रकारापुढें निरुक्तांतील हें प्रकरण खास होतें संशय नाहीं.

## खंड १७ वा.

**अथापि इदम् अन्तरेण पदविभागः न विद्यते.**

आणखी ह्या (निरुक्तशास्त्राच्या साहाय्याशिवाय) संहितेचीं पदें पाडतां येत नाहींत.

पण सबंध निरुक्तांत फक्त दोन ठिकाणीं म्हणजे 'मेहना' (निरु० ४।४) व 'वाय:' (निरु० ६।२८) पदांचा विचार केला आहे. तो सुद्धां निर्णयात्मक नसून दोन निरनिराळीं मतें दिलीं आहेत. पदें पाडणें हें निरुक्ताचें काम नाहीं.

**अवसाय पद्वते रुद्र मृळ (ऋ० सं. १०।१६९।१)**

हे रुद्रा, पाय आहेत ज्याला आशा आमच्या खाद्यावर (अवसाय) दया कर (मृळ).

रुद्र हा क्रूर देव आहे. तो जनावरांचा संहार करतो; म्हणून त्यास विनवणी.

**पद्वत् अवसं गावः पथ्यदनम्**

पायवालें भक्ष्य म्हणजे गाई; मार्गांत (प्रवासांत) तें मनुष्याचें भक्ष्य होय मनुष्यास गाईपासून दूध मिळतें. वाटेनें त्याच्यावर तो उपजीविका करतो (पथि अदनं).

**अवतेः गत्यर्थस्य**

'अवसं' हा अव् जाणें ह्यापासून झाला आहे.

**असः नामकरणः**

अव् ह्याला नामकरणारा असः प्रत्यय लावल्यानें अव्+असं = अवसं शब्द बनतो.

अवसाय ही अवसं ह्याची चतुर्थी

**तस्मात् न अवगृण्हन्ति**

म्हणून पदकार अव आणि साय ह्यांच्यामध्यें अवग्रहाचिन्ह करीत नाहींत.

**अवसायाश्वान् इति**

**निष्ट यो इन्द्र निषदे अकारि तमा निषीद ।**

**विमुच्या वयोऽवसायाश्वान् दोषावस्तोर्वहीयसः प्रपित्वे (ऋ० सं० १।१०४।१)**

हे इंद्रा, तुला बसण्यासाठीं (निषदे) बैठक (योनिः) तयार केली आहे. रात्रंदिवस (दोषावस्तोः) तुला रथांतून नेणाऱ्या (वहीयसः) ह्या घोड्यांना (वय:= अश्वान्) सोडून (विमुच्य=अवसाय) मेजवानीच्या वेळीं (प्रपित्वे) ह्या बैठकीवर बस (तम् आ निषीद).

**स्यतिः उपसृष्टः विमोचने**

'सो' धातूला 'अव' हा उपसर्ग लावल्यानें सोडणें (विमोचने) हा अर्थ होतो.

तस्मात् अवगृण्हन्ति

अव हा उपसर्ग असल्यामुळें अव आणि साय ह्यांच्यामध्यें अवग्रहचिन्ह करतात. उपसर्ग व धातु ह्यांचा समास होतो म्हणजे तीं दोन पदें आहेत, अशी समजूत आहे.

**दूतो निर्ऋत्या इदमाजगाम इति**

देवाः कपोत इषितो यदिच्छन् दूतो निर्ऋत्या इदमा जगाम ।

तस्मा अर्चाम कृणवाम निष्कृतिं ( १०।१६५।१ )

हे देवांनो निर्ऋतीचा पाठविलेला ( इषितः ) हा दूत—खबूतर—ज्या पापाचा सूड उगविण्याच्या इच्छेनें ( यत् इच्छन् ) ह्या आमच्या घरीं आला आहे त्या पापाचें प्रायश्चित्त ( निष्कृतिं ) आम्ही करतों ( कृतवाम ) व खबूतराची पूजा करतों (अर्चाम).

खबूतर घरांत येणें म्हणजे अपशकुन अशी समजूत होती.

पञ्चम्यर्थप्रेक्षा वा

निर्ऋत्याः हें पद पञ्चम्यंत आहे असें अर्थावरून दिसतें किंवा

षष्ठ्यर्थप्रेक्षा वा

षष्ठयंत आहे.

निर्ऋतीकडून आलेला किंवा निर्ऋतीचा दूत असे दोन्ही अर्थ लागूं पडतात म्हणून

आःकारान्तं ( पदं )

निर्ऋत्याः ह्या पदाच्या अंतीं आः आहे हें स्पष्ट.

**परो निर्ऋत्या आ चक्ष्व इति**

अपेहि मनसस्पतेऽप क्राम परश्चर ।

परो निर्ऋत्या आचक्ष्व बहुधा जीवतो मनः ( १०।१६४।१ )

मनावर अंमल चालविणाऱ्या हे स्वप्ना ( मनसस्पते ) चालता हो ( अपेहि= अपक्राम ); लांब जा लांब ( परः चर परः ). निर्ऋतीला ( निर्ऋत्यै ) जाऊन सांग. जिवंत माणसाचें मन नाना प्रकारच्या कल्पना करतें.

सूक्तकर्त्याला जागेपणीं आपलें मरण जवळ आलें असें एका मनोवृत्तींत वाटतें. ह्या जाग्रत्स्वप्नाला तो धुडकावून लावतो व मी जगणार; निर्ऋति मला उगाच भेवडावीत आहे; मी तिला जुमानीत नाहीं असें तो म्हणतो.

निर्ऋति हें नरकाचें व नरकस्वामिनीचें नांव आहे.

चतुर्थ्यर्थप्रेक्षा

येथें चतुर्थीचा अर्थ स्पष्ट दिसतो म्हणून

ऐकारान्तं ( पदं )

निर्ऋत्यै असें ऐकार अंतीं असणारें पद.

परः संनिकर्षः संहिता

पदांचा अतिशय एकमेकाकडे ओढा (संनिकर्षः), पदांची खेचाखेची म्हणजे संहिता.

ह्या खेचाखेचींतून पदें बाहेर काढणें, पदें वेगळीं करणें हें फार विकट काम आहे; तें निरुक्ताच्या साहाय्यावांचून कसें करतां येईल ?

**पदप्रकृतिः संहिता**

(१) पदानां प्रकृतिः संहिता अथवा (२) पदानि प्रकृतिः यस्याः सा असा दोन्ही रीतीनें विग्रह होईल. (१) पहिल्या प्रथम मनुष्य पदें जोडूनच बोलतो, पदागणिक थांबून बोलत नाहीं. व्याकरणासाठीं पदें वेगळी करावीं लागतात. अथवा

(२) पदांची संहिता बनते. पुष्कळ वेळां संधि केल्याशिवाय लोक बोलतात. विसर्गाचा लोप, किंवा बदल, अनुस्वाराचा परसवर्ण, स्वरसंधि, व्यञ्जनसंधि हे मागाहून येतात.

हें दुसरें म्हणणेंच सयुक्तिक दिसतें.

**पदप्रकृतीनि सर्वचरणानां पार्षदानि**

चरण म्हणजे शाखा, जसें ऋक्‌शाखा, यजुःशाखा.

प्रत्येक शाखेचें, परिषद् भरवून, ठरविलेलें जें व्याकरण तें प्रातिशाख्य. ह्या प्रातिशाख्यांचा आरंभ पदांपासूनच होतो. तीं व्याकरणें संहिता एकदम हातीं घेत नाहींत.

असें जर आहे तर संहितेचीं पदें पाडलींच पाहिजेत. तीं निरुक्ताशिवाय तुम्ही कशीं पाडणार ?

शाकल्यानें पदें पाडिलीं; त्याला निरुक्त येत होतें कशावरून ? शिवाय एकदां पदें पाडल्यावर निरुक्ताची काय जरूर ?

**अथापि याज्ञे दैवतेन बहवः प्रदेशाः भवन्ति**

शिवाय यज्ञकर्मांत (याज्ञे) देवतांना उद्देशून (दैवतेन) विधि (प्रदेशाः) असतात.

मंत्रांतील देवता ओळखणें हें निरुक्ताचें काम. भलत्या देवतेला उद्देशून केलेलें कर्म फुकट जाईल; इतकेंच नव्हे तर पाप घडेल. म्हणून

**तत् एतेन उपेक्षितव्यम्**

(एतेन) ह्या शास्त्राच्या साहाय्यानें (तत्) हा विषय (देवताज्ञान) समजून घ्यावा.

**ते चेत् ब्रूयुः**

आक्षेपक जर म्हणतील

**लिङ्गज्ञाः अत्र स्मः इति**

ह्या बाबतींत (अत्र) लिंगावरून—मंत्रांत काय म्हटलें आहे, कोणचे शब्द मंत्रांत आहेत ह्यावरून—आम्ही देवता ओळखूं,

**इन्द्रं न त्वा शवसा देवता वायुं पृणन्ति इति**

**त्वां हि मन्द्रतममर्कशोकैर्ववृमहे महि नः श्रोष्यग्ने ।**

इन्द्रं न त्वा शवसा देवता वायुं पृणन्ति राधसा नृतमाः (ऋ० सं० ६।४।६) = हे महि अग्ने अर्कशोकैः मन्द्रतमं त्वां ववृमहे । नः श्रोषि । नृतमाः देवताः त्वां राधसा पृणन्ति । न यथा ताः इन्द्रं वायुं च शवसा पृणन्ति

हे महान् अग्ने ज्वालांमुळें (अर्कै=शोकैः) अति आह्लाद देणारा (मन्द्रतमं) जो तूं त्या तुला आम्ही (देवांना आहुति पोंचविण्याला) पसंत करितों. म्हणून आमचें ऐक (श्रोषि=शृणु). जसे बलवान् श्रेष्ठ देव इंद्राला व वायूला बलानें (शवसा) खच्चून भरून टाकतात (पृणन्ति) तसे ते तुला धनानें खच्चून भरून टाकतात.

तुझ्याजवळ अपार धन आहे; म्हणून आम्हांला धन दे असा सारांश.

**वायुलिङ्गं च इन्द्रलिङ्गं च आग्नेये मन्त्रे**

हें सूक्त व ही ऋचा अग्नीला उद्देशून रचिली आहे (आग्नेये मन्त्रे). पण तींत वायु व इंद्र दोन्हीही आढळतात. तेव्हां विधि करावयाचा झाल्यास कोणाला उद्देशून करावा? ह्याचें उत्तर 'आग्नेये' ह्या शब्दांतच आहे. येथें भानगड मुळींच नाहीं. असल्यास ती वायूपुरतीच आहे. इन्द्रं न असा प्रयोग आहे; वायुं न असा नाहीं. अग्नीला वायुं असें कांहीं ठिकाणीं म्हटलें आहे. वायुं हें मुळचें वायुं नसून आयुं असावें. आयु नांवाची आर्यजात होती; तिचा देवही आयु किंवा अग्नि. तेव्हां आयुं त्वां पृणन्ति असा अन्वय होतो. कांहींही असो, याज्ञिकाला व लिंगज्ञाला घोंटाळ्यांत घालणारें हें उदाहरण नव्हे.

**अग्निरिव मन्यो त्विषितः सहस्व (ऋ० सं० १०।८४।२) इति**

हे मन्युदेवा, अग्नीप्रमाणें प्रज्वलित असा तूं शत्रूंचा पराभव कर (सहस्व).

**तथा अग्निः मान्यवे मन्त्रे**

त्याचप्रमाणें मन्युदेवाला उद्देशून रचिलेल्या ऋचेंत अग्नि आला आहे. येथें तर मुळींच भानगड नाहीं. निरुक्तकारांना आपलें म्हणणें मुळीं सिद्ध करितां आलें नाहीं. 'तथा' शब्द अग्निरिव ह्याच्या आधीं घालावयास पाहिजे होता.

कदाचित् यास्कास असें म्हणावयाचें असेल कीं नुसतीं इंद्र व वायु हीं नांवें ऐकून व हें सूक्त आग्नेय आहे हें समजल्यावर ऋचेचा अर्थ न कळल्यामुळें इंद्र, वायु व अग्नि ह्यांपैकीं कोणाला उद्देशून विधि करावयाचा हें याज्ञिकाला किंवा आक्षेपकाला समजणार नाहीं. कारण 'न' चा अर्थ 'इव' आहे हें त्यास कसें कळणार? परंतु लिंगावरून देवता ओळखीन असें जो म्हणतो त्याला 'न' चा अर्थ कळत नाहीं असें कसें म्हणतां येईल? नैरुक्तांखेरीज वेदाचा अर्थ कोणाला कळत नाहीं असें यास्काचें म्हणणें असेल. अर्थज्ञानाशिवाय केवळ लिंगज्ञान फुकट. तेव्हां लिंगज्ञांनीं आमचें साहाय्य घेतलेंच पाहिजे.

'ते चेत् ब्रूयुः' ह्या वाक्याला 'तान् वयं ब्रूमः अस्याम् ऋचि का देवता' असें पुरवणीवाक्य पाहिजे आहे.

**त्विषितः ज्वलितः**

त्विषित म्हणजे ज्वालायुक्त.

**त्विषि इति अपि अस्य भवति**

कोणी म्हणेल की त्विषि (ज्वाला) ही अग्नीला असते; तेव्हां त्विषितः हें विशेषण इंद्राला कसें लागूं पडेल. ह्याला उत्तर, इंद्रालाही त्विषि असते. 'अधा चन श्रद्दधते

त्विषीमत इन्द्राय वज्रम्' (ऋ. सं. १।५५।५) = आणि म्हणूनच त्विषीमान् इंद्राच्या हवालीं देव वज्र करतात. 'इन्द्राय मनस्विने त्विषीमते एकादशकपालं निर्वपेत्' (काठक-संहिता १०।८) = मनस्वी व त्विषीमान् असा जो इंद्र त्याला अकरा खापऱ्यावर भाजलेला पुरोडाश द्यावा.

इंद्र व मन्यु एकच; तेव्हां मन्यूला त्विषितः म्हणण्यास कांहीं हरकत नाहीं.

**दीप्तिनाम**

त्विषि म्हणजे दीप्ति

'त्विषिरिति अपि अस्य दीप्तिनाम भवति' असा सध्यांच्या प्रतींत घोंटाळा झाला आहे व तो दुर्गप्रतींतही होता. मूळ पाठ असा असावा :—त्विषिः इति अपि अस्य भवति । त्विषिः दीप्तिनाम.

**अथापि ज्ञानप्रशंसा भवति अज्ञाननिन्दा च**

शिवाय ज्ञानाची स्तुति व अज्ञानाची निंदा केली आहे. ज्ञान निरुक्तशास्त्रानें मिळतें; तेव्हां त्या शास्त्राचा अभ्यास अपरिहार्य आहे.

## खंड १८ वा.

**स्थाणुरयं भारहारः किलाभूदधीत्य वेदं न विजानाति योऽर्थम् ।**

जो वेद पठण करून त्याचा अर्थ जाणत नाहीं तो केवळ ओझें धारण करणारा वृक्ष होय. झाडाला पानें, फुलें, फळें असतात; पण त्यांचा त्याला कांहीं उपयोग नाहीं.

**योऽर्थज्ञ इत्सकलं भद्रमश्नुते**

जो अर्थ जाणतो तोच (इत्) सर्व कल्याण भोगतो

**नाकमेति ज्ञानविधूतपाप्मा**

त्याचीं सर्व पापें ज्ञानानें झडलीं जाऊन तो स्वर्गाला जातो.

**यद् गृहीतमविज्ञातं**

जें कंठगत केलें जातें (गृहीतं) पण जाणलें जात नाहीं

**निगदेनैव शब्द्यते**

जसे शब्द असतील तसेंच जें बडबडलें जातें

**अनग्नाविव शुष्कैधो न तज्ज्वलति कर्हिचित्**

ज्याप्रमाणें जेथें विस्तव नाहीं तेथें लाकूड किंवा सर्पण जसें कदापि पेट घेत नाहीं त्याप्रमाणेंच नुसतें पठण केलेलें कधींही पेट घेत नाहीं म्हणजे अशा बडबडीचा वास्तविक उपयोग होत नाहीं.

पठणाचें पर्यवसान अर्थज्ञानांत झालें तरच त्याचा उपयोग. असें असूनही आमचे भिक्षुक पाठ करण्यांतच धन्यता मानतात व श्रोते त्यांना वेदोनारायण म्हणतात. दोघेही बैलच. निरुक्तांत कितीतरी अशुद्धें आहेत, प्रक्षिप्त भाग हवा तितका आहे, परिशिष्ट— अध्याय १४—ह्यांतील दोन खंड अति अशुद्ध व त्यामुळें इतके दुर्बोध

आहेत; तरी दशग्रंथी ब्राम्हणाला हा अशुद्ध ग्रंथ तोंडपाठ असतो. अज्ञ माणूस, त्याला शुद्ध-अशुद्ध सारखेंच. तो केवळ भारवाहक.

**स्थाणुः तिष्ठतेः**

स्थाणु शब्द स्था उभें राहणें ह्यापासून झाला आहे. झाड सारखें उभें असतें. स्था+नुः = स्थाणुः.

**अर्थः अर्तेः**

अर्थ शब्द ऋ जाणें ह्या धातूपासून झाला आहे. अर्थ (धन). त्याकडे सर्वजण धडपड करीत जातात.

**अरणस्थो वा**

अथवा अर्थः = अर+थः = अरण+स्थः. अर्थ धन हें धनी मेल्यावर दुसऱ्याजवळ (अरणे) राहतें (स्थः). मिळविणाराजवळ धन राहत नाहीं. तें पोरांबाळांना, कधीं कधीं अनोळखी अशा दूरच्या नातलगांकडे सुद्धां जातें.

## खंड १९ वा.

**उत त्वः पश्यन्न ददर्श वाचम्**

**अपि एकः पश्यन् न पश्यति वाचम्**

एकजण (त्वः = एकः) वाचेला पाहतो तरी त्याला ती दिसत नाहीं.

**उत त्वः शृण्वन्न शृणोत्येनाम्**

**अपि च शृण्वन् न शृणोति एनाम्**

एकजण ऐकूनही ती (खरोखर) ऐकत नाहीं.

**इति अविद्वांसम् आह अर्धम्**

अशा रीतीनें ऋचेचा अर्ध अविद्वान् म्हणजे ज्याला वेदाचा अर्थ समजत नाहीं त्याविषयीं बोलतो.

**उतो त्वस्मै तन्वं विसस्रे**

**अपि एकस्मै तन्वं विसस्रे इति**

आणखी (उतो = उत + उ = अपि) वाचा एकजणापुढें (त्वस्मै = एकस्मै) आपलें शरीर ढिलें (म्हणजे प्रकट) करिते (विसस्रे)

**स्वम् आत्मानं विवृणुते ज्ञानम्**

म्हणजे वाचा आपल्या स्वतःला म्हणजे ज्ञानाला उघड करिते. दुर्गाच्या पाठांत विसस्रे ह्याबद्दल विस्रंसयति असा शब्द असावा व 'ज्ञानं' शब्द नसावा.

'स्वम् आत्मानं विवृणुते ज्ञानं' हें मूळभाष्यांत नसावेंसें वाटतें.

**प्रकाशनम् अर्थस्य आह अनया वाचा**

ह्या तिसऱ्या पादांत (अनया वाचा) वाचा अर्थ प्रकाशित करते असें मंत्रद्रष्टा म्हणतो.

प्रकाशनम् अर्थस्य ह्याबद्दल ' अर्थप्रकाशनं ' असें दुर्गाच्या प्रतींत असावें.

**उपमा उत्तमया वाचा**

शेवटल्या पादांत ( उत्तमया वाचा ) उपमा आहे.

' प्रकाशनं...उत्तमया वाचा ' हें मूळभाष्यांत नसावें. पादेन ह्याच्या ऐवजीं 'वाचा ' शब्द घालण्याचें कांहीं कारण नव्हतें. वाचेविषयीं बोलणें चाललें असतांना पादेन ह्या अर्थीं वाचा शब्द यास्क कसा वापरील ? दुर्गप्रतींत हें सगळें आहे. ह्यावरून त्याच्या आधीं केव्हांतरी हें घुसडलें गेलें असावें.

**जायेव पत्य उशती सुवासाः**

**जायेव पत्ये कामयमाना सुवासाः ऋतुकालेषु**

जशी ऋतु ज्या ज्या वेळीं प्राप्त होते त्या त्या वेळीं स्त्री चांगला पोषाख करून पतिसमागमाची इच्छा करणारी त्याच्यापुढें आपलें सर्व शरीर ढिलें म्हणजे प्रकट करते त्याप्रमाणें. यानंतर महाराष्ट्रपाठांत ' सुवासाः कल्याणवासाः कामयमाना ऋतुकालेषु' असे ज्यास्त शब्द आहेत ते व्यर्थ आहेत.

**यथा स एनां पश्यति स शृणोति**

जसा पति हिला पाहतो व तिचें बोलणें ऐकतो

**इति अर्थप्रशंसा**

ह्याप्रमाणें अर्थ जाणणाराची प्रशंसा केली आहे.

' यथा० शृणोति ' हें वाक्य अपूरें आहे. तें पुरें करण्याकरितां ' तथा अर्थज्ञ एनां पश्यति शृणोति च ' असे शब्द पाहिजे आहेत. दुर्गाच्या प्रतींत ' यथा शृणोति ' हे शब्द होते कीं नव्हते हा प्रश्न आहे. तो आपल्या वृत्तींत ' यथा स पुरुषः तां यथावत् पश्यति न इतरो यो घनपटप्रावृतसर्वगात्राम् । एवं स एव एतां वाचं यथावत् पश्यति यः पदशः अवच्छिद्य एतां विगृह्य वा अर्थमस्याः पश्यति समस्तव्यस्तम्' असें म्हणतो. तेव्हां त्याच्या प्रतींत ' यथा स तां पश्यति एवम् अर्थज्ञः वाचं पश्यति इति अर्थज्ञप्रशंसा' असे शब्द असतील. सुवासाः= निर्णिक्तवासाः. नीरजस्का म्हणजे घाणेरडें झालेलें वस्त्र स्वच्छ धुऊन तें नेसणारी असा दुर्ग अर्थ करतो. पण ऋचेंत सुवासाः ह्याचा अर्थ तसा नसून सुंदर वस्त्रें ल्यायलेली असा आहे. पतिसमागम इच्छिणारी स्त्री सुंदर वस्त्रें परिधान करून त्याच्याजवळ जाते व मग वस्त्रें झुगारून देऊन नग्न शरीर त्याला दाखविते; त्याप्रमाणें वाचा बाह्यस्वरूप बाजूला ठेऊन अर्थेच्छूला अंतरंग दाखविते. सुंदर वस्त्रें जशीं मोहक तसे शब्द मोहक परंतु पति जसा वस्त्रालंकारानें तृप्त होत नाहीं तसा अर्थेच्छु नुसत्या शब्दांनीं तृप्त होत नाहीं.

व्याकरणमहाभाष्यांत ह्या ऋचेचा अर्थ खालीलप्रमाणें दिला आहे:—

अपि खलु एकः पश्यन् अपि न पश्यति वाचम् । अपि खलु एकः शृण्वन् अपि न शृणोति एनाम् । अविद्वांसम् आह अर्धम् । उतो त्वस्मै तन्वं विसस्रे । तनुं विवृणुते । जायेव पत्य उशती सुवासाः । तद्यथा जाया पत्ये कामयमाना सुवासाः

स्वम् आत्मानं विवृणुते एवं वाक् वाग्विदे स्वात्मानं विवृणुते (महाभा० १।१।१ ). हें विवरण यास्कभाष्यासारखें आहे. असे दहापांच उतारे यास्कभाष्यांतून महाभाष्यांत घेतलेले आढळतात. महाभाष्यपाठ व हल्लींचा यास्कभाष्यपाठ ह्यांमध्यें पुष्कळ फरक आहे. तो फरक म्हणजे अर्थाविष्करणासाठीं ज्यास्त ज्यास्त घातलेले शब्द पूर्वींच्या प्रतींत नाहींत असे महाराष्ट्रप्रतींत आढळतात. त्याप्रमाणेंच दुर्गानें घेतलेल्या पाठांतही ज्यास्त शब्द घुसडले गेले असावेत ह्यांत नवल नाहीं.

**तस्य उत्तरा भूयसे निर्वचनाय**

पुढील (उत्तरा) ऋचा ह्याच गोष्टीचा (तस्य) ज्यास्त (भूयसे) खुलासा करण्याकारितां ( निर्वचनाय ) देतों.

निर्वचन ह्याचा विशिष्ट अर्थ म्हणजे शब्दांची व्युत्पत्ति. परंतु त्याअर्थीं हा शब्द येथें वापरला नाहीं. कारण ह्या खंडांत व पुढील ऋचेचा अर्थ देतांना शब्दांची व्युत्पत्ति केली नाहीं.

## खंड २० वा.

**उत त्वं सख्ये स्थिरपीतमाहुः**

**अपि एकं वाक्सख्ये स्थिरपीतम् आहुः रममाणं विपीतार्थम्**

ह्याचा अन्वयः——अपि वाक्सख्ये रममाणम् एकं स्थिरपीतं विपीतार्थम् आहुः

वाचेशीं केलेल्या मैत्रींत जो रमतो त्याला विद्वान् लोक स्थिरपीत म्हणजे विपीतार्थ म्हणतात. विपीतार्थ म्हणजे ज्यानें वाचेचा ( वेदाचा ) अर्थ पूर्णपणें ( वि ) पिऊन टाकला आहे असा. स्थिरपीत कोणाला म्हणतात ? उत्तरः—जो वाचेशीं केलेल्या सख्यांत रमतो, रात्रंदिवस गढून जातो त्याला.

किंवा

**देवसख्ये**

सख्ये ह्याचा अर्थ वाक्सख्ये असा न करितां देवसख्ये असा करावा. देवांशीं केलेल्या मैत्रींत जो रमतो वगैरे. वेदांत रमणें म्हणजे देवांच्या संगतींत रमणें.

**रमणीये स्थाने इति वा**

देवसख्ये म्हणजे रमणीय अशा ठिकाणीं.

देव स्वर्गांत राहतात; तेव्हां त्यांच्याशीं सख्य स्वर्गांतच शक्य आहे. स्वर्ग हेंच रमणीय स्थान.

दुर्गाचार्यानें ' अपि एकं ' वगैरेचा अर्थ निराळाच केला आहे. त्याच्या प्रतींत ' रममाणं ' शब्द नव्हता. तो 'आहुः' ह्याचा कर्ता 'वाक्' शब्द करतो. पण आहुः हें अनेकवचनी असून वाक् एकवचनी आहे. सख्ये म्हणजे देवसख्ये म्हणजे देवसायुज्ये किंवा देवसख्ये म्हणजे देवलोके.

स्थिरपीतं म्हणजे स्थिरं विपीतार्थं. देवसायुज्ये देवलोके वा तं स्थिरम् आहुः=तो

देवांसमान होतो किंवा देवलोकीं स्थिर (कायमचा ) राहतो असें म्हणतात. तशा स्थितीं-तून किंवा देवलोकांतून त्यांचा अधःपात होत नाहीं. असा कोण मनुष्य? ज्यानें वेदाचा अर्थ पूर्णपणें प्राशन केला आहे तो. असें कोण म्हणतो? वाक्. अशा रीतीनें दुर्ग अने-कवचनाचें एकवचन करतो. त्याचा प्रतींत 'रममाणं'च्या ऐवजीं 'स्थिरं' शब्द असावा. त्याचा पाठ='अपि एकं वाक् देवसख्ये स्थिरं विपीतार्थम् आहुः रमणीये स्थाने इति वा' असा असेल. यास्कानें 'रमणीयं' शब्द अध्याहृत घेतला आहे.

**नैनं हिन्वन्त्यपि वाजिनेषु**

**विज्ञातार्थं यं न आप्नुवन्ति वाग्ज्ञेयेषु बलवत्सु अपि**

एनं=विज्ञातार्थं यम्. हिन्वन्ति=आप्नुवन्ति. वाजिनेषु=वाग्ज्ञेयेषु बलवत्सु. वाजिन= वाक्+ज्ञेय. वाग्ज्ञेयेषु=वाचेनेंच जाणावयाचे जे अर्थ त्यांत. बलवत्सु=गूढ अर्थ करण्यांत. वेदाचे गूढ अर्थ प्रकट करण्यांत वेदाचा अर्थ पूर्णपणें ज्याला अवगत झाला आहे अशा ज्या विद्वानाच्या पाठोपाठ इतर लोक जात नाहींत म्हणजे जाऊं शकत नाहींत.

वाचा एव ज्ञेयेषु वाग्ज्ञेयेषु. वेदांतील कांहीं ऋचांचा अर्थ इतका कठीण असतो कीं तो वाग्देवीच जाणूं शकते. असे कठीण अर्थ एखादाच जाणतो. त्याची इतर लोक बरोबरी करूं शकत नाहींत.

दुर्गाचार्याच्या प्रतींत कोणचा पाठ होता हें सांगतां येत नाहीं. तो म्हणतोः— एनं वागर्थज्ञं न हिन्वन्ति नानुगन्तुं शक्नुवन्ति। केषु। वाजिनेषु वाग्ज्ञेयेषु अर्थेषु बलवत्सु अपि दुर्ज्ञेयेषु.

**अधेन्वा चरति माययैषः**

**अधेन्वा हि एष चरति मायया वाक्प्रतिरूपया**

अविद्वान् मनुष्य ( एषः ) धेनु नाहीं अशा वाचेचें सोंग घेतलेल्या मायेला बरोबर घेऊन संचार करतो.

दुर्गाच्या प्रतींत 'वाक्प्रतिरूपया' शब्द नव्हता. 'अधेन्वा ह्येष चरति माययैष चरति' असा त्याचा पाठ होता.

**नास्मै कामान् दुग्धे वाक् दोह्यान् देवमनुष्यस्थानेषु**

देवलोकीं व मनुष्यलोकीं म्हणजे इहलोकीं ज्या कामना पूर्ण व्हावयाच्या किंवा मिळावयाच्या ( दोह्यान् ) असतात त्या कामना, वाचा ह्या मनुष्याला देत नाहीं.

वाचेला अधेनु कां म्हटलें? त्याच्यापाशीं असणारी वाक् त्याच्या कामना, त्याला पाहिजे आहेत त्या गोष्टी, देत नाहीं.

तो कोण?

**वाचं शुश्रुवाँ अफलामपुष्पाम्**

**यः वाचं श्रुतवान् भवति अफलाम् अपुष्पाम् इति**

जिला फुलें येत नाहींत, फळें येत नाहींत अशी वाचा जो ऐकतो म्हणजे नुसतें

पाठांतर करतो तो.

**अफला अस्मै अपुष्पा वाक् भवति इति वा**

ह्या मनुष्याला वाचेपासून फलपुष्प मुळीं मिळत नाहीं किंवा

**किंचित्पुष्पफला इति वा**

त्या वाचेपासून त्याला थोडेसें फलपुष्प मिळतें.

येथें 'अ' ह्याचा अर्थ 'किंचित्' असा घ्यावयाचा. कारण नुसत्या पाठांतरापासूनही थोडा जरी असला तरी फायदा आहे. अगदींच फायदा नाहीं असें नाहीं.

ह्यावरून यास्ककालीं वेदपठनाला लोक थोडीशी किंमत देऊं लागले होते असें दिसतें.

**अर्थं वाचः पुष्पफलम् आह**

अर्थाला मंत्रद्रष्टा वाचेचीं फुलें व फळें म्हणतो.

पुष्पफलं हा समाहारद्वन्द्व आहे.

किंवा

**याज्ञदैवते पुष्पफले**

यज्ञकर्म किंवा यज्ञज्ञान हें वाचेचें फूल होय व देवताज्ञान हें फल होय.

यज्ञ कसे करावेत हें वेदापासून कळतें. हवि देवतांना उद्देशून देतात म्हणून यज्ञांपासून देवताज्ञान होतें. फूल प्रथम, मागून फळ, तसें यज्ञज्ञान व यज्ञकर्म प्रथम; देवताज्ञान मागाहून. सर्व यज्ञांचें पर्यवसान त्या त्या देवतेशीं होणाऱ्या तादात्म्यांत.

जेव्हां अभ्युदय म्हणजे ऐश्वर्य प्राप्त करून घेण्याची इच्छा असते तेव्हां यज्ञ करून देवतातादात्म्य मिळतें. देवतेशीं तदात्मता ही अभ्युदयाची शेवटली पायरी होय.

पण ज्यावेळीं निःश्रेयस् म्हणजे मोक्ष मिळावयाचा असतो तेव्हां

**देवताध्यात्मे वा**

दैवताध्यात्मे असा पाठ पाहिजे. दुर्गाच्या प्रतींत तोच पाठ असावा. अनेकदेवताज्ञान हें फूल; त्यानंतर ऐकात्म्याचें ज्ञान होतें म्हणून तें फळ.

वाक् इना ईश्वरा येषां ते वाजिनाः। अर्थाः वाचः आयत्ताः । वाग्ज्ञेयेषु अर्थेषु नापि हिन्वन्ति । अपिः अन्वर्थे । केचिदपि नानुगच्छन्ति । यद्वा । सारभूतेषु निरूपणीयेषु अर्थेषु एनं न हिन्वन्ति न बहिःकुर्वन्ति । एनं पुरस्कृत्यैव सर्वे वेदार्थं विचारयन्ति । अधेन्वा धेनुत्वविवर्जितया वाक्प्रतिरूपया मायया चरति (सायणः).

सायणाचें सगळें भाष्य येथें दिलें नाहीं. 'किंचित्पुष्पफला वा' असा अर्थ सायण करीत नाहीं. 'वाक्प्रतिरूपया' हा शब्द ह्या भाष्यांत आला आहे.

वाक्+इन=वाजिन ही व्युत्पत्ति विशिष्ट अर्थ उत्पन्न करण्याकरितां केली आहे तिला आधार कशाचाही नाहीं. दुसरा अर्थ 'दह्यावर येणारा तवंग' ह्या अर्वाचीन अर्थावरून काढला आहे. 'वाजिन' शब्द अमरांत मुळींच नाहीं. 'देवताध्यात्मे वा'

हा अर्थ सायणानें दिला नाहीं.

ऋचेच्या प्रथमार्धाचा यास्कानें केलेला अर्थ चुकीचा आहे. सबंध ऋचेंत अविद्वानाचेंच वर्णन आहे. त्वं, एनं व एषः हे शब्द एका व्यक्तीलाच उद्देशून घातले आहेत. 'स्थिरपीतं' चा अर्थ उपरोधिक आहे. स्थिरं पीतं येन=जो वेद नुसता पितो, नुसता मनांत साठवितो, त्याला चलन देत नाहीं म्हणजे त्याचा अर्थ करीत नाहीं, त्याजसंबंधानें विद्वानांच्या सभेंत वाद करीत नाहीं असा मनुष्य.

उत त्वं सख्ये स्थिरपीतम् आहुः = विद्वानांच्या सभेंत (सख्ये) असणाऱ्या कोणा एकाला (त्वं) लोक अवजड, मंदमति सभासद म्हणतात. स्थिरपीतं हें विधेय आहे. 'सख्ये विदुषां समाजे वर्तमानं त्वम् एकं स्थिरपीतं मन्दम् आहुः' असा अन्वयार्थ आहे.

आणि म्हणूनच

**नैनं हिन्वन्ति अपि वाजिनेषु**

अपि ह्यानें निकट संबंध दर्शविला जातो. वाजिन म्हणजे लूट हा पहिला अर्थ; दुसरा अर्थ धन; तिसरा धनाकरितां लढाई. वाज, वाजिन, व वाजिनी ह्या सर्वांचा अर्थ धन. अपिवाजिन म्हणजे जोराची लढाई; एथें जोराचा वादविवाद. ह्या मंदमतीला लढाईंत पाठवीत नाहींत. नुसता पोपटपंची करणारा हा माणूस वादविवादांत पडून काय करणार ?

**अधेन्वा० अपुष्पाम्**

जिला फळें येत नाहींत किंवा नुसतीं फुलेंही येत नाहींत अशी वाचा म्हणजे असा वेद ज्यानें ऐकला आहे म्हणजे पठन केला आहे तो धेनु नसून धेनूचें रूप घेणाऱ्या मायेला बरोबर घेऊन हिंडतो. त्याची वाचा केवळ वंध्या होय.

असा ह्या ऋचेचा अर्थ आहे व तोच बरोबर आहे हें त्याच सूक्तांतल्या १० व्या ऋचेवरून सिद्ध होईल. ती ऋचा अशीः—

**सर्वे नन्दन्ति यशसागतेन सभासाहेन सख्या सखायः ।**

**किल्बिषस्पृत्पितुषणिर्ह्येषामरं हितो भवति वाजिनाय ( १०।७१।१० )**

= सर्वे सखायः आगतेन यशसा सभासाहेन सख्या नन्दन्ति । असौ किल्बिषं दुरितानि स्पर्तिं नाशयति दूरीकरोति पितुं सोमं धनं वा सनोति ददाति । तेन सः एषां सखीनां वाजिनाय अरं अलं भवति = विद्वानांच्या सभेचा पराभव करणारा ( सभासाहेन ), यश संपादन करणारा ( यशसा ) असा मित्र आलेला पाहून सर्व त्याचे मित्र आनंद पावतात. संकटें दूर करणारा ( किल्बिषस्पृत् ) व धन देणारा ( पितुषणिः ) असा तो त्या मित्रांना लढाई करण्यास ( वाजिनाय ) पुरा आहे ( अरं ) असा वाटतो.

हा असा नाहीं म्हणून ह्याला ( एनं ) लढाईस ( अपिवाजिनेषु ) पाठवीत नाहींत ( न हिन्वन्ति ). कारण ते त्याला आपल्यांतील हा स्थिरपीत म्हणजे जडबुद्धि आहे असें म्हणतात ( त्वं सख्ये स्थिरपीतमाहुः ).

खंड १८, १९ व २०च्याचा कांहीं भाग ह्यांत अर्थाला इतकें महत्त्व दिल्या-वर व अनर्थज्ञाची निंदा केल्यावर 'किंचित्पुष्पफला वा' असें यास्क कदापि म्हणणार नाहीं. त्याप्रमाणेंच 'अर्थं वाचः पुष्पफलमाह' असें म्हटल्यावर 'याज्ञदैवते० दैवताध्यात्मे' अशी पुस्ती जोडण्याचेंही कांहीं कारण दिसत नाहीं. तेव्हां हीं वाक्यें प्रक्षिप्त होत.

**साक्षात्कृतधर्माण ऋषयो बभूवुः**

ऋषींनीं धर्म प्रत्यक्ष पाहिला होता. धर्म म्हणजे वेद हा ऋषींना दिसला म्हणून त्यास मंत्रद्रष्टे म्हणतात. वेद कोणीही रचिला नाहीं, तो अपौरुषेय आहे अशी आर्यांची श्रद्धा आहे.

**ते अवरेभ्यः असाक्षात्कृतधर्मभ्यः उपदेशेन मन्त्रान् संप्रादुः**

त्यांनीं ज्यांना वेदाचा साक्षात्कार झाला नाहीं अशा मागाहून जन्मलेल्या ( अवरेभ्यः ) लोकांना तोंडीं मंत्राचा उपदेश केला.

ऋषि द्रष्टे व हे मागाहून जन्मलेले लोक श्रोते; म्हणून वेदाला श्रुति म्हणतात.

अवर म्हणजे कमी प्रतीचे किंवा बुद्धीचे लोक असाही अर्थ होईल.

**उपदेशाय ग्लायन्तः अवरे बिल्मग्रहणाय इमं ग्रन्थं समाम्नासिषुः.**

उपदेशिलेला धर्म कसा टिकेल किंवा कळेल अशी तळमळ ह्या लोकांना लाग-ल्यामुळें ( ग्लायन्तः ) वेदाचें स्पष्ट किंवा सार्थ ( बिल्म ) ग्रहण व्हावें म्हणून त्यांनीं हा ( निघंटु ) ग्रंथ रचिला.

**वेदं च वेदाङ्गानि च**

व वेद व वेदांगें हींही एकत्र केलीं.

सम् + आ + म्ना = एकत्र आणणें.

वेदाचीं सूक्तें किंबहुना ऋचा लोकांमध्यें विस्खळित अशा पसरल्या होत्या. त्या ह्या लोकांनीं म्हणजे श्रोत्यांनीं एकत्र केल्या. सूक्तांचीं मंडलें त्यांनीं पाडलीं. श्रोत्यांनीं सर्व मंत्र ऐकले व त्यांची विल्हेवारी केली. मंत्र ऋषींना मंडलरूपानें दिसले किंवा विस्खळित अशा स्थितींत दिसले ? ते त्यांना सुव्यवस्थित असेच दिसले असावेत व सुव्यवस्थित असेच त्यांनीं लोकांना दिले असावेत. तेव्हां अवरांना वेदाची व्यवस्था लावण्याची जरूरी कां भासली ?

समाम्नासिषुः ही क्रिया वेदाला कदाचित् लागूं पडेल. पण वेदांगांना म्हणजे शिक्षा, कल्प, व्याकरण, निरुक्त, छंद व ज्योतिष ह्यांना एकत्र करणें म्हणजे काय ? तीं खास मनुष्यांनीं रचिलीं. शिवाय वेद आधीं एकत्र केला कीं निघंटु आधीं एकत्र केला असा प्रश्न विचारणेंच बरोबर नाहीं. वेद आधीं, मागाहून निघंटु असें कोणीहि म्हणेल. समाम्ना = रचणें असा अर्थ असेल तर सामाम्नासिषुः ही क्रिया वेदाला लागूं पडत नाहीं.

यास्काला वेदांगें माहीत होतीं कीं नाहीं हा प्रश्न आहे. तो त्यांचा इतरत्र कोठेंही उल्लेख करीत नाहीं.

पुढील मजकूर निघंटूसंबंधींच आहे. ह्या सर्व कारणांवरून 'वेदं च वेदाङ्गानि च' हे शब्द प्रक्षिप्त असावेत.

**बिल्मं भिल्मम्**

बिल्मं=भिल्मम्. बिल्म शब्द हा खरोखर भिल्म असा आहे. म्हणजे तो भिल् म्हणजे भिद् धातूपासून झाला आहे. बिल्म म्हणजे फोडणें, वेगवेगळें करणें, वेगवेगळें करून स्पष्ट करणें. किंवा

**भासनम् इति वा**

बिल्मं = भासनम्. बिल्म शब्द भास् धातूपासून झाला असावा. वेदाचा अर्थ मनांत प्रकाशणें.

'बिल्म' शब्द अमरकोशांत नाहीं. तो ऋग्वेदांत एकदां आला आहे २।३५।१२ ). तेथें त्याचा अर्थ ऋक् किंवा अन्न असा आहे असें वाटतें.

निघंटु-ग्रंथांचे भाग व प्रत्येक भागांत येणारे विषय पुढें सांगितले आहेत.

**एतावन्तः समानकर्माणो धातवः**

एकार्थी इतके धातु

**धातुः दधातेः**

धातु शब्द 'धा' ठेवणें ह्यापासून झाला आहे.

'धातुः दधातेः' हें दुर्गवृत्तींत नाहीं. तेव्हां दुर्गानंतर केव्हां तरी तें घुसडलें गेलें असावें.

**एतावन्ति अस्य सत्त्वस्य नामधेयानि**

ह्या पदार्थाचीं इतकीं नांवें,

समानार्थ धातु व समानार्थ नामें ज्या भागांत सांगितले आहेत असा पहिला भाग.

धातूपासून नामें म्हणून धातुगण आधीं निर्दिष्ट केला असावा. वास्तविक निघंटूला प्रारंभ नामगणांनींच केला आहे. एतावन्तः व एतावन्ति ह्यांनीं त्या त्या गणांतील शब्दांची संख्या दर्शविली जाते; जसें गतिवाचक धातु १२२ आहेत, कांतिवाचक १८ आहेत, पृथिवीवाचक नामें २१, हिरण्यवाचक १५ वगैरे.

**एतावताम् अर्थानाम् इदम् अभिधानम्**

ह्या शब्दाचे इतके अर्थ आहेत.

अकूपार शब्दासारखे अनेकार्थी शब्द ज्यांत सांगितले आहेत तो भाग दुसरा.

अमक्या शब्दाचे अमके अर्थ असें ह्या भागांत म्हटलें नाहीं. कांहीं शब्दांचे निरनिराळे अर्थ दिले आहेत एवढेंच. दुसऱ्या भागाचें हें वर्णन अपूर्ण आहे; कारण ह्या भागांत ज्या शब्दांची व्युत्पत्ति देतां येत नाहीं अशा शब्दांचा पुष्कळच भरणा आहे.

त्या मानानें अनेकार्थी शब्दांचा संग्रह फारच थोडा आहे.

**नैघण्टुकम् इदं देवतानाम् प्राधान्येन इदम् इति**

देवतेचें हें नांव नैघंटुक आहे व हें प्रधान आहे असा ज्यांत विचार केला आहे तो भाग तिसरा.

हेंही वर्णन अपूरें आहे किंवा ह्या भागाला तें लागूंच पडत नाहीं असें म्हणावयास हरकत नाहीं. ह्या भागांत पृथिवीवर असणाऱ्या अग्निवगैरे देवता, अंतरिक्षांत असणाऱ्या वायु वगैरे देवता व द्युलोकीं असणाऱ्या अश्विनवगैरे देवता ह्यांचे स्वभाव, प्रभाव वगैरेंचें वर्णन आलें आहे. गौण व प्रधान हा विचार इतका अल्प आहे कीं तो नाहींच असें म्हटलें पाहिजे. ह्या तीन भागांचीं नांवें द्यावयास पाहिजे होतीं तीं एथें दिलीं नाहींत.

**तत् यत् अन्यदेवते मन्त्रे निपतति नैघण्टुकं तत्**

मंत्र एका देवतेला उद्देशून असून दुसरी देवता जर त्यांत ( कांहीं कारणानें ) दुसऱ्या देवतेचें नांव आलें असेल तर तें नैघंटुक म्हणजे गौण होतें. जसें:—

**अश्वं न त्वा वारवन्तम्**

**अश्वम् इव त्वां वालवन्तम्**

अश्वं न त्वा वारवन्तं वन्दध्या अग्निं नमोभिः ( ऋ० सं० १।२७।१ )

हे अग्नि घोड्याप्रमाणें केस आहेत ज्याला ( वारवन्तं ) अशा तुला आम्ही नमस्कारांनीं वंदन करतों.

अग्नीच्यावर जाणारा धूर हा घोड्याच्या मानेवरील केसाप्रमाणें किंवा शेपटांतील केसाप्रमाणें दिसतो. अश्व हा उपमेयाकरितां एथें आणिला आहे. अश्वाला देव मानिला आहे ( निघण्टु ५।३।१ ). ऋचा अग्निपर असल्यामुळें अश्व हा एथें गौण आहे.

**वालाः दंशवारणार्थाः भवन्ति**

वार = वाल. वार हे डांस ( दंश ) हाकलण्याकरितां असतात. तेव्हां वाल अथवा वार शब्द वार् वारणें, हकालणें ह्या धातूपासून निघाला आहे.

दंश दश् डसणें ह्या धातूपासून.

**मृगो न भीमः कुचरो गिरिष्ठाः**

**मृगः इव भीमः कुचरः गिरिष्ठाः**

मृगो न भीमः कुचरो गिरिष्ठाः परावत आजगन्थ परस्याः ( १०।१८०।२ )

हे इंद्रा पर्वतावर असणाऱ्या ( गिरिष्ठाः ) व भक्ष्याकरितां हवें तेथें हिंडणाऱ्या ( कुचरः ) सिंहाप्रमाणें ( मृगो न ) भयंकर असा तूं अतीशय उंच ( परस्याः ) असा जो स्वर्गाचा भाग ( परावतः ) तेथून ये ( आजगन्थ = आगच्छ ). व येऊन शत्रूंना हांकलून दे, ठार करा असा दुसऱ्या अर्धाचा अर्थ आहे.

मृग शब्द दैवतप्रकरणांत कोठेंही आला नाहीं. तेव्हां हें उदाहरण एथें लागूं

पडत नाहीं. मृग गौण आहे. पण देवता नाहीं.

**मृगः मार्ष्टेः गतिकर्मणः**

मृग् जाणें ह्यापासून मृग-शब्द.

**भीमः विभ्यति अस्मात्**

ज्याला भितात तो भीम. म्हणजे भीम-शब्दांत भी धातु आहे.

**भीष्मः अपि एतस्मात् एव**

भीष्म शब्दही ह्याच धातूपासून.

**कुचरः इति चरति कर्म कुत्सितम्**

जो कु म्हणजे कुत्सित म्हणजे वाईट, तिरस्करणीय असें कर्म करतो तो कुचर. कु = कुत्सितम्. चर = चरति यः.

**अथ चेत् देवताभिधानं क अयं न चरति इति**

पण कुचर हें जर देवतेचें नाम म्हणजे विशेषण असेल तर मग ह्या इंद्र कोठें ( कु = क ) संचार करीत नाहीं अशी व्युत्पत्ति करावयाची.

**गिरिष्ठाः गिरिस्थायी**

गिरीवर राहणारा तो गिरिष्ठाः.

**गिरिः पर्वतः**

गिरि म्हणजे पर्वत; कारण

**समुद्गीर्णः भवति**

पर्वताला गिरि म्हणण्याचें कारण पर्वत पृथ्वीच्या पोटांतून बाहेर मोठा संघटित गोळा असा ओकला जातो. सम् = एकत्र. उत् = बाहेर. गीर्णः = ओकलेला. म्हणजे गिरि–शब्द गॄ ओकणें किंवा गिळणें ह्या धातूपासून झाला आहे.

**पर्ववान् पर्वतः**

पर्वतः = पर्व + तः. तः = वान्. पर्वयुक्त तो पर्वत.

**पर्व पुनः पृणातेः**

पण पर्व कशापासून ? पृ पुरविणें, भरून काढणें ह्यापासून. रिकाम्या जागा किंवा पोकळ्या भरून काढतात ते पर्व किंवा सांधे.

**प्रीणातेर्वा**

किंवा पर्व शब्द प्री तृप्त करणें ह्यापासून.

**अर्धमासपर्व**

जसें पंधरवड्याला येणारें पर्व म्हणजे दर्श व पूर्णमास. ह्या प्रत्येक पक्षाच्या पंधराव्या दिवसाला पर्व म्हणतात; कारण

**देवान् अस्मिन् प्रीणन्ति**

पंधराव्या दिवशीं देवांना हवि देऊन तृप्त करतात. दर्श व पूर्णमास ह्या इष्टि होत.

**तत्प्रकृति इतरत् संधिसामान्यात्**

तत् अर्धमासपर्व प्रकृतिः यस्य

पर्व सांधा ह्या लौकिक शब्दाचें मूळ अर्धमासपर्व. पंधराव्या दिवसाला किंवा दोन पंधरवडयांना जोडणाऱ्या दिवसाला पर्व-शब्द प्रथम लाविला गेला. व नंतर इतर सांध्यांना. कालपर्व व गिरिपर्व ह्यांमध्यें सामान्य सांधा हें.

सामान्य = सारखेपणा. दोनही सांधेच.

हें सगळें उलटें होय. सांधा हा पहिला अर्थ. बोटांचीं पेरें, उसाचीं पेरें हा शब्दप्रयोग प्रथम. नंतर पर्वतांचे सांधे व नंतर कालाकालामधील सांधे. पण धार्मिक लोकांना नेहमीं उलटी उपपत्ति आवडते. पहिल्याप्रथम दैविक प्रयोग, मागून मानुष. ह्या व्युत्पत्तींत कांहीं घोटाळा झाला आहे 'प्रीणातेर्वा देवान् अस्मिन् प्रीणन्ति' एवढें मागाहून घुसडलें असावें. पर्व–शब्द पृ धातूपासून, जसें अर्धमासपर्वः. ह्यावरूनच इतर सर्व पर्व. दोहोंतलें सामान्य सांधा. हा सरळ अर्थ होय. दुसऱ्या पर्वाचा प्रीणातेः ह्याच्याशीं कांहीं संबंध नाहीं. जर आहे तोच पाठ मूळचा असेल तर मग अर्थ असा. अर्धमासपर्व ह्यांतील पर्व–शब्द पृ किंवा प्री धातूपासून झाला आहे. प्री धातूपासून कां? तर ह्या पर्वांत देवांना हवि देऊन तृप्त करतात. पण अर्धमासपर्वांतील पर्वशब्द पृधातूपासून निघाला असेल. कारण हें पर्व दोन कालांमधील सांधा होय. यास्क असे घोटाळे अनेकदां करतो.

मेघस्थायी

गिरिष्ठाः हें इंद्राचें अभिधान म्हणजे विशेषण घेतल्यास त्याचा अर्थ गिरिस्थायी म्हणजे मेघस्थायी असा होईल.

मेघोऽपि गिरिः एतस्मादेव

मेघाला गिरि कां म्हटलें? तर मेघही पृथिवीलोकापासून वाफेच्या रूपानें अंतरिक्षांत समुद्गीर्ण म्हणजे संघटित असा वर ओकला जातो.

कुचरः व गिरिष्ठाः हे शब्द देवतापर आहेत अशी कल्पना निघण्याचें कारण ते शब्द मृगो न भीमः ही उपमा संपल्यावर घातले आहेत; तेव्हां त्यांचा संबंध मृगः ह्याच्याशीं नसून 'त्वं' ह्याच्याशीं आहे. वेदांत प्रत्येक शब्दाचें स्थान सहेतुक असतें अशा समजुतीनें हा दुसरा अर्थ केला आहे. पण ही समजूत अगदीं खोटी आहे. ऋचांतील शब्द छंदाकरितां हवे तेथें घातलेले आढळतात.

किंवा भीमः कुचरः गिरिष्ठाः हीं तीनही मृग व इंद्र यांचे समान धर्म असतील असें समजून कुचर व गिरिष्ठा ह्यांचें देवतापर अर्थ दिले असतील. वास्तविक हे दोन शब्द मृग ह्यांचींच विशेषणें होत. कारण

प्र तद्विष्णुः स्तवते वीर्येण मृगो न भीमः कुचरो गिरिष्ठाः (१।१५४।२) येथें गिरिष्ठाः हें विष्णुपर कसें लावितां येईल? यास्क जी ऋचा पुढें असेल तिचाच अर्थ करीत बसतो. त्यानें ही उद्धृत केलेली ऋचा जर लक्षांत घेतली असती तर कुचर व

गिरिष्ठा हीं विशेषणें देवतापर लाविलीं नसतीं.

कुचर ह्यांतील 'कु'चा क असा अर्थ यास्कानें केला आहे. त्याला आधार काय? हा शब्द धन्वचर ह्यासारखा आहे. धन्वचर = मरुप्रदेशांत हिंडणारा; तसा कुचर = 'कु' प्रदेशांत हिंडणारा. 'कु' चा काय अर्थ? पर्वत असा अर्थ असेल काय?

**तत् यानि नामानि प्राधान्यस्तुतीनां देवतानां तत् दैवतम् इति आचक्षेते**

प्राधान्येंकरून ज्या देवतांची स्तुति केली जाते त्यांचीं जीं नांवें त्यांना दैवत असें म्हणतात.

**तत् उपरिष्टात् व्याख्यास्यामः**

हें देवताचें लक्षण सातव्या अध्यायाच्या पहिल्या खंडाच्या आरंभीं दिलें आहे. तेथें त्याचें विवरण करूं असें यास्क म्हणतो. पण विवरण कोठेंही केलेलें मला आढळलें नाहीं. विवरण दुर्गानें केलें आहे.

**नैघण्टुकानि नैगमानि इह इह**

नैघंटुक व नैगम शब्दांचा विचार येथें केला जाईल.

येथें म्हणजे दुसऱ्या ते सहाव्या अध्यायांत.

इह शब्दाची पुनरुक्ति अध्याय संपला हें दाखविण्याकरितां केली आहे.

वर जो नैघण्टुक शब्द आला आहे त्याचा अर्थ 'गौण' असा आहे. येथें तो शब्द निराळ्या अर्थीं वापरला आहे, पण तो अर्थ कोठेंही दिला नाहीं.

ह्या खंडांत आक्षेप घेण्याजोग्या पुष्कळ गोष्टी आहेत. निघंटूच्या तीन भागांचीं नांवें द्यावयास पाहिजे होतीं तीं दिलीं नाहींत. ह्या तीन भागांपैकीं पहिला नैघंटुक, दुसरा नैगम व तिसरा दैवत असें सांगणें जरूर होतें. नैघंटुकाचें लक्षण चौथ्या अध्यायाच्या आरंभीं दिलें आहे तें असें.– एकार्थम् अनेकशब्दम् ( निरुक्त ४।१ ). इति उक्तं असें ह्या लक्षणाच्या शेवटीं म्हटलें आहे. पण २० व्या खंडांत 'एतावन्तः समानकर्माणो धातवः एतावन्ति अस्य सत्त्वस्य नामधेयानि'. असें लक्षण दिलें आहे. नैघंटुक नांव तेथेंही नाहीं एथेंही नाहीं.

'अथ यानि अनेकार्थानि एकशब्दानि तानि अतः अनुक्रमिष्यामः अनवगतसंस्कारांश्च निगमान् । तत् ऐकपदिकम् इति आचक्षेते' असें तेथें म्हणजे चौथ्या अध्यायाच्या आरंभीं म्हटलें आहे. पण एथें 'एतावताम् अर्थानाम् इदम् अभिधानम्' एवढेंच म्हटलें आहे. हेंच जर लक्षण असेल तर ह्या शब्दांना नैगमसंज्ञा कशी लागूं पडेल? तेव्हां 'नैगमानि इह' हें ह्मणणें बरोबर नाहीं. ऐकपदिक हीच संज्ञा योग्य आहे. पण ती २० व्या खंडांत नाहीं. अनवगतसंस्काराः निगमाः' हे शब्द दुसऱ्या भागाच्या लक्षणांत अवश्य आहेत. दैवताचें लक्षण 'नैघण्टुकम् इदं देवतानाम् प्राधान्येन इदं' अगदीं चुकीचें आहे. खरें लक्षण खंडाच्या शेवटीं दिलें आहे. 'मृगो न भीमः' हें उदाहरण कां दिलें हें समजत नाहीं. अश्व देवतानामांत आला आहे, मृग नाहीं.

असा हा सर्व घोंटाळा आहे. तो कशानें झाला ह्याचा विचार केल्यास दोन निघंटु व दोन निरुक्तें ह्यांची कोणी तरी एकवाक्यता करण्याचा प्रयत्न केला त्यामुळें. एका निघंटूंत दुसऱ्या भागांत 'एतावताम् अर्थानाम् इदम् अभिधानम्' म्हणजे अनेकार्थी शब्दांचाच केवळ समावेश केला होता. दुसऱ्या निघंटूंत अनेकार्थी शब्द येऊन अनवगतसंस्कार निगम हेही दिले होते. पहिल्या निघंटूंत दैवतप्रकरणांत फक्त प्रधान देवतांचीं व अप्रधान देवतांचीं नांवें दिलीं असावींत. दुसऱ्यांत हा विषय गाळला आहे व तीन लोकीं असणाऱ्या सर्व देवांचे स्वभाव, कृति वगैरे दिल्या आहेत. ही एकवाक्यता यास्कानें केली नसून दुसऱ्या कोणीतरी केली असावी. साक्षात्कृतधर्माणः पासून इह इह पर्यंतचा भाग यास्काचा नसावा असें मला वाटतें. पहिला अध्याय सुद्धां यास्काचा नसावा अशी माझी समजूत झाली आहे. ह्यांत आलेल्या गोष्टींचा पुढील अध्यायांत कोठेंही उपयोग केल्याचें आठवत नाहीं. चार प्रकारचीं पदजातें व त्यांचीं लक्षणें, स्फोटवाद, सहा प्रकारचे भाव, ह्यांचा निरुक्ताशीं काय संबंध तो कळत नाहीं. उपसर्गाचे जे अर्थ दिले आहेत ते ऋग्वेदाला धरून मुळींच नाहींत. बहुतेक निपातांची तीच गोष्ट. हें निपात-प्रकरण यास्ककालीन संस्कृताला धरून लिहिलें आहे. सर्व नामें आख्यातज कीं नाहीं हा वाद निरुक्ताला धरून आहे. अथापीदमन्तरेण मन्त्राणामर्थप्रत्ययो न विद्यते' (खंड १५) एथपासून खंड १७ ह्यांत निरुक्तशास्त्राची आवश्यकता सिद्ध करण्याकरितां लिहिला आहे. पण निरुक्त हा शब्द मागील खंडांत कोठेंही आला नाहीं. हा भाग जर यास्कानें लिहिला असता तर निरुक्त हें नांव त्यानें पूर्व खंडांत कोठें तरी घातलें असतें. सबंध पहिला अध्याय कोणीतरी यास्काच्या निरुक्ताला डकविला असा माझा ग्रह झाला आहे. खंड १९ तील बरीचशी भाषा व्याकरण-महाभाष्यांत आली आहे हें खरें. पहिल्या अध्यायाची रचनाही यास्कपद्धतीवर आहे. तेव्हां पहिल्या अध्यायांतील कोणचाच भाग यास्कानें लिहिला नाहीं असें माझ्यानें म्हणवत नाहीं. दुसऱ्या अध्यायाच्या आरंभीं 'अथ निर्वचनं' हे शब्द आहेत. त्यांनींच खरोखर निरुक्ताचा प्रारंभ व्हावयास पाहिजे. 'समाम्नायः समाम्नातः' एथें आरंभीं अथ शब्द नाहीं शिवाय हा सामाम्नाय यास्कानें कांहीं समाम्नात केला नाहीं. पण ते शब्द वाचतांना तशी समजूत होते. मी शब्द वर्गवारीनें एकत्र केले आहेत; त्यांची आतां मी व्युत्पत्ति देतों (स व्याख्यातव्यः) असा ध्वनि त्या शब्दांतून निघतो. पण समाम्नाय यास्कानें रचिला नाहीं असें खात्रीनें म्हणतां येतें. पहिला अध्याय गाळल्यास कांहींही तोटा होणार नाहीं असें मला वाटतें. पुरुषशब्दाची निरुक्त १।१३ ह्या खंडांत एकच व्युत्पत्ति दिली आहे; पण २।२ ह्या खंडांत तीन दिल्या आहेत. १।१३ त शाकटायनानें दिलेली सत्य शब्दाची व्युत्पत्ति ३।१३ त दिलेल्या व्युत्पत्तीहून अगदीं निराळी आहे. अध्याय १ खंड १२त नामें आख्यातज असें म्हटलें आहे; पण ५।२८ त अच्छ हा निपात अभि किंवा आप्तुं ह्यांच्यापासून निघाला आहे असें म्हटलें

आहे. तेव्हां यास्काच्या मतें आख्यातें खेरीज करून बाकी सर्व शब्द आख्यातज होत. ५।२८ त 'परीं सीमिति व्याख्यातं' असें म्हटलें आहे. परि हा उपसर्ग व ई आणि सीं हे निपात पहिल्या अध्यायांत आले आहेत. त्यावरून पहिला अध्याय यास्काचाच असें कोणी म्हणेल. पण 'अच्छाभेराप्तुमिति शाकपूणिः परीं सीमिति व्याख्यातं' (५।२८) ह्याचा मागच्यापुढच्याशीं कांहीं संबंध नाहीं. अनवगतसंस्कार किंवा अनेकार्थ शब्द ह्यांत ते येतच नाहींत. ते खास प्रक्षिप्त असावेत.

व्युत्पत्तीचे नियम दुसऱ्या अध्यायांत दिले आहेत. पहिल्या अध्यायांत ज्या व्युत्पत्ति दिल्या आहेत त्या ह्या नियमांना धरून आहेत. पण व्युत्पत्ति आधीं, नियम मागून असा क्रम बरोबर नाहीं. ह्यावरूनहि पहिला अध्याय यास्काचा नसावा असें वाटतें. पूर्वींचीं निरुक्तें पाहून त्यांतून हा भाग कोणीतरी यास्काच्या निरुक्तास जोडला असावा. असें नसतें तर २० व्या खंडांत विसंगतपणा झालाच नसता. यास्काच्या ग्रंथांत प्रक्षिप्तें जेथें तेथें आढळतात. तेव्हां पहिला अध्याय, निदान त्यांतील बराचसा भाग प्रक्षिप्त नसेल कशावरून ? परीशिष्टें (अध्याय १३ व १४) हीं जशीं जोडलीं गेलीं तसाच पहिला अध्याय जोडला गेला असावा.

---

## अध्याय दुसरा

## खंड १ ला.

**अथ निर्वचनम् ।**

आतां निर्वचन म्हणजे व्युत्पत्ति कशी करावी हें सांगतों.

**टीप :–** संस्कृत ग्रंथांना 'अथ' यानें प्रारंभ करतात. 'समाम्नायः समाम्नातः येथें 'अथ' शब्दानें प्रारंभ झाला नाहीं. तेव्हां पहिला अध्याय यास्कानें रचिला याविषयीं शंका उत्पन्न होते. त्याचीं दुसरीं कारणें विसाव्या खंडाच्या शेवटीं दिलींच आहेत. 'अथ निर्वचनम्' ह्यानेंच यास्कानें निरुक्ताला प्रारंभ केला असावा.

**तत् येषु पदेषु स्वरसंस्कारौ समर्थौ प्रादेशिकेन गुणेन अन्वितौ स्याताम्**

[ अ. १ खंड १२ पहा. ]

**टीप :—** बाराव्या खंडांत 'यत्र' तर येथें 'येषु पदेषु' असा पाठ आहे. असा बदल करण्याचें काय कारण तें समजत नाहीं. पहिला अध्याय दुसऱ्या कोणीं रचिला असावा हेंच कारण दिसतें.

**तथा तानि निर्ब्रूयात्**

अशा शब्दांची त्याप्रमाणेंच व्युत्पत्ति करावी.

गति, मति, कर्ता, कारक वगैरे शब्दांची व्युत्पत्ति सरळ आहे. कारण त्यांचे

स्वर, संस्कार व अर्थ यांचा तदर्थवाचक जे धातु त्यांच्यापासून होणारीं जीं नामरूपें त्यांच्याशीं मेळ आहे.

**अथ अनन्विते अर्थे**

परंतु शब्दामध्यें दिसणारा जो धातु त्याच्या अर्थाचा जर शब्दाच्या रूढ अर्थाशीं मेळ नसेल

उदाहरणार्थ, 'अक्षि' शब्द घेऊं. ह्या शब्दांत 'अश्' धातु दिसतो. त्याचा अर्थ 'व्यापणें' असा आहे. पण 'अक्षि' ह्याचा पाहणारें इंद्रिय असा रूढ अर्थ आहे. तेव्हां ह्या दोन अर्थांमध्यें मेळ नाहीं.

**अप्रादेशिके विकारे**

तदर्थवाचक धातूपासून जेव्हां शब्द उत्पन्न करितां येत नाहीं. उदाहरणार्थ, 'आक्षि' शब्दच घेऊं. 'चक्ष' पाहणें हा तदर्थवाचक धातु आहे. पण त्या धातूपासून 'अक्षि' शब्द बनवितां येत नाहीं. अशी ज्या वेळेला स्थिति असेल

**अर्थनित्यः परीक्षेत**

तेव्हां अर्थावर अवलंबून राहून म्हणजे फक्त अर्थाकडे लक्ष देऊन हा शब्द कोणत्या धातूपासून निघाला असेल असें परीक्षण करावें. म्हणजे तर्कानें धातु शोधून काढावा.

**केनचित् वृत्तिसामान्येन**

'वृत्ति' म्हणजे धातुरूप. असें कोणतें तरी धातुरूप घेऊन त्यामध्यें व ज्याची व्युत्पत्ति करावयाची आहे त्यामध्यें थोडेंहि साम्य असलें म्हणजे झालें.

उदाहरणार्थ 'अद्रि' शब्द घेऊं. ह्याचा अर्थ 'वज्र' किंवा 'पर्वत' आहे 'अद्रि' शब्दांत 'अद्' धातु दिसतो. पण 'अद्' खाणें ह्याचा वज्र किंवा पर्वत ह्याच्याशीं कांहीं संबंध दिसत नाहीं. तेव्हां वज्रानें कोणती क्रिया घडते ती लक्षांत घेतली पाहिजे. ती क्रिया म्हणजे आघात करून फोडणें. फोडणें या अर्थाचा 'दृ' धातु आहे. ह्याचें एक रूप 'दृणाति' असें होतें. त्याला मागें 'आ' उपसर्ग लावल्यानें 'आदृणाति' असें 'अद्रि' शब्दाच्या जवळजवळचें रूप बनतें. 'आदृणाति' ह्यामधील 'णाति' गाळून बाकी 'आदृ' राहतें. ह्या 'आदृ' पासून 'अद्रि' शब्द बनला असावा असें म्हणण्यास हरकत नाहीं. 'आदृणाति' ह्या क्रियारूपाचें साम्य 'अद्रि' शब्दाशीं आहे.

दुसरा 'अन्धस्' शब्द घेऊं. ह्याचा अर्थ सोम. सोम हा इष्ट असल्यामुळें त्याचें सर्व लोक ध्यान करीत बसतात. तेव्हां त्याच्यामध्यें 'ध्यै' धातु असावा असें वाटतें. 'अन्धस्' ह्याच्यामध्यें 'अ', 'न्' 'ध्' 'अ' आणि 'स्' अशीं अक्षरें आहेत. 'स्' हा नाम बनविणारा प्रत्यय असल्यामुळें तो बाजूला ठेऊं. बाकी राहिलेल्या अक्षरांची 'अ' 'ध्' 'न्' 'अ' अशी फिरवाफिरव करून त्यांत कांहीं बदल करूं. ते असेः— अ = आ. ध् = ध्या. न् + अ = नीय. म्हणजे 'आध्यानीय' असें आ + ध्यै ह्या धातूचें रूप बनतें. तेव्हां 'आध्यानीय' ह्या धातुरूपाचें 'अन्धस्' ह्याच्याशीं थोडेंबहुत साम्य

अनुक्रमणिका

आहे. अन्धस् ह्या शब्दामध्यें 'अन्' धातु दिसतो. त्याचा अर्थ श्वासोच्छ्वास करणें. त्याचा सोम ह्या अर्थाशीं कांहीं संबंध नाहीं.

'अन्ध' (आंधळा) ह्याच्यामध्येंहि 'अन्' धातु दिसत असून त्याचा 'अन्ध' शब्दाच्या अर्थाशीं कांहीं संबंध नाहीं. तेथेंहि अशीच फिरवाफिरव व बदल केला पाहिजे. म्हणजे 'ध्यै' याचें 'ध्यानम्' रूप ध्यावयाचें व त्याला मागें निषेधार्थी 'अ' अक्षर जोडावयाचें. असें केल्यानें 'अध्यानम्' व 'अन्ध' ह्यांतील साम्य स्पष्ट होतें. ध्यान म्हणजे दर्शन, दृष्टि. ज्याला ध्यान नाहीं, दृष्टि नाहीं तो अन्ध होय.

**अविद्यमाने सामान्ये**

इतकेंहि साम्य जेथें नसेल

**अपि अक्षरवर्णसामान्यात् निर्ब्रूयात्**

तेथें एखाद्या अक्षराचें, एखाद्या वर्णाचें साम्य लक्षांत घेऊन शब्दाची व्युत्पत्ति करावी.

अग्नि ह्या शब्दाचे अ, ग् आणि नि असे तुकडे करावयाचे. 'अ' हें कशापासून निष्पन्न झालें आहे? ह्याला उत्तरः— 'इ' धातूपासून. पण ह्या धातूच्या कोणत्या रूपांत 'अ' आहे? उत्तरः— 'इ' ह्याचें कारित रूप करावें. तें 'आययति' असें होतें. ह्यांत 'आ' मध्यें 'अ' आहे व 'य' मध्येंहि 'अ' आहे. म्हणून शब्दाचें धातुरूपांशीं इतकें साम्य पुरेल.

'अक्षर' शब्द येथेंच आला आहे. संबंध खंडांत 'वर्ण' शब्दाचीच वारंवार पुनरुक्ति झाली आहे. त्यावरून 'अक्षर' शब्द मागाहून कोणी घातला असावा असें दिसतें. सायणाचार्य 'अक्षर' यानें 'स्वर' व 'वर्ण' यानें व्यंजन समजतात. ते म्हणतात, "अग्नि शब्द हा मूळचा 'अक्नोपन' होता असें स्थौलाष्ठीवीचें मत आहे. कारण 'अक्नोपन' आणि 'अग्नि' ह्या दोहोंतहि 'अ' आहे. तेवढें साम्य पुरें आहे. शाकपूणि म्हणतो कीं 'दग्ध' आणि 'अग्नि' ह्या दोहोंत 'ग्' आहे. हें वर्ण-साम्य होय. परंतु यास्कानें वर्णाचींच उदाहरणें दिलीं आहेत. अक्षराचीं दिलीं नाहींत. यास्क 'अपि' हा निपात वाक्यारंभीं घालतो हें मागें सांगितलेंच आहे.

(अ. १ खं. ४)

**न तु एव न निर्ब्रूयात्**

परंतु कधींहि व्युत्पत्ति देतां येत नाहीं असें म्हणूं नये.

व्युत्पत्ति केलीच पाहिजे ह्या विधानाला दोन नकारांनीं जोर येतो.

**न संस्कारम् आद्रियेत**

शब्दाच्या रूपाकडे म्हणजे तो शब्द काय आहे, त्यामध्यें कोणतीं अक्षरें आहेत, तो कसा बनलेला दिसतो, वगैरेकडे मुळीं लक्ष देऊं नये.

अमुक एक शब्द अमक्या धातूपासून झाला आहे असें पुष्कळ वेळां दिसतें.

परंतु त्या धातूचा अर्थ व शब्दाचा रूढ अर्थ ह्या दोहोंत मेळ नसेल तर संस्कार म्हणजे शब्दरूप लक्षांत घेण्याचें कारण नाहीं.

**विशयवत्यो हि वृत्तयो भवन्ति**

कारण धातूंपासून निघालेल्या नामरूपांविषयीं पुष्कळदां मनांत घोटाळा उत्पन्न होतो. कारण धातूपासून नामरूप बनवीत असतांना विलक्षण बदल घडून येतो.

**यथार्थं विभक्तीः संनमयेत्**

अर्थासाठीं ( यथार्थम् ) नामाच्या विभक्तींत बदल करावा.

उदाहरणार्थः—'स मा धीरः पाकमत्राविवेश' येथें 'पाकम्' शब्द द्वितीयैकवचनी आहे. तो प्रथमैकवचनी केला पाहिजे. म्हणजे 'पाकम्' हें 'पाकः' असें समजलें पाहिजे. कारण पाक शब्दाचा अर्थ 'विपक्वप्रज्ञ' असा आहे. ज्याच्यामध्यें आदित्य किंवा आत्मा शिरतो तो 'विपक्वप्रज्ञ' नसून अज्ञानदशेंत म्हणजे अपक्वप्रज्ञ आहे. तेव्हां 'पाकम्' ह्याची विभक्ति बदलून म्हणजे पाकः असें करून तें आदित्यः आणि आत्मा याचें विशेषण केलें पाहिजे. कारण हे दोघेहि 'विपक्वप्रज्ञ' आहेत. (अ. ३ खं. १२ पहा).

**टीपः**—हें वाक्य मधेंच एकदम आलें आहे. 'विशयवत्यो हि वृत्तयो भवन्ति' ह्याचा त्याच्याशीं कांहीं संबंध नाहीं. धातूंपासून झालेलीं नामरूपें फार घोटाळ्याचीं असतात. त्याचीं उदाहरणें 'प्रत्तम्' 'अवत्तम्' वगैरे होत. 'अर्थाकरितां विभक्ति बदलाव्यात' ह्याचा व्युत्पत्तीशीं कांहीं संबंध नाहीं.

**प्रत्तम् अवत्तम् इति धात्वादी एव शिष्येते**

प्रत्तम् हें रूप प्र + दा + तम् ह्यापासून व 'अवत्तम्' हें अव + दो + तम् ह्यापासून झालें आहे. ह्या दोहोंत 'दा' मधील 'आ' व 'दो' मधील 'ओ' ह्यांचा लोप होऊन फक्त 'द्' शिल्लक राहतो. हे धातु ह्या दोन शब्दांत दिसतहि नाहींत. ज्याला व्याकरण माहीत नाहीं तो 'दा' आणि 'दो' धातूंपासून हे शब्द झाले आहेत असें ऐकल्याबरोबर आश्चर्य करील.

**अथापि अस्तेः निवृत्तिस्थानेषु आदिलोपो भवति**

निवृत्ति म्हणजे गुण व वृद्धि यांचा अभाव निवृत्तेः स्थानानि निवृत्तिस्थानानि. जे प्रत्यय पुढें आले असतांना धातूला गुण किंवा वृद्धि होत नाहीं ते प्रत्यय निवृत्तिस्थान होत. 'अस्' धातूच्या पुढें असे प्रत्यय जेव्हां येतात तेव्हां आरंभीचा जो 'अ' त्याचा लोप होतो व फक्त 'स्' राहतो.

**स्तः सन्ति इति**

स् + तः = स्तः, स् + अन्ति = सन्ति. पाणिनीच्या भाषेत 'तः' आणि 'अन्ति' हे 'कित्' प्रत्यय होत.

**अथापि अन्तलोपो भवति**

आणखी असे प्रत्यय पुढें आले असतांना धातूंतील अंत्याक्षराचा लोप होतो.

**गत्वा गतम् इति**

'गम्' + त्वा = गत्वा. गम् + तम् = गतम्. त्वा व तम् हे कित् प्रत्यय होत.

अथापि उपधालोपो भवति

आणखी उपांत्याचा लोप होतो.

जग्मतुः जग्मुः इति

ह्या रूपांत उपांत्य जो 'अ' त्याचा लोप झाला आहे.

येथपर्यंत निवृत्तिस्थानाचीं उदाहरणें झालीं.

अथापि उपधालोपो भवति

शिवाय कोठें कोठें उपांत्य अक्षरांत बदल होतो.

राजा दण्डी इति

राजन् यांतील उपांत्य अ दीर्घ होतो. 'दण्डिन्' यांतील 'इ' दीर्घ होते. नंतर अंत्य जो 'न्' त्याचा लोप होऊन राजा, दण्डी अशीं रूपें बनतात.

अथापि वर्णलोपो भवति

शिवाय कधीं कधीं धातूंतील वर्णाचा लोप क॰॰ लागतो.

तत्त्वा यामि (ऋ. सं. १।२४।१)

तत् त्वा यामि = तत् त्वा याचामि.

शुनःशेप वरुणाला म्हणतो, "हे वरुणा! त्या गोष्टीची (तत्) तुजजवळ (त्वा) मी याचना करितों (यामि). येथें याचामि यांतील 'चा' वर्ण जाऊन 'यामि' उरलें आहे.

ही यास्काची चूक आहे. कारण 'या' व 'ई' ह्या धातूंचा याचना करणें असा अर्थ ऋग्वेदांत होतो. त्याचीं हवीं तितकीं उदाहरणें देतां येतील.

अथापि द्विवर्णलोपः

शिवाय कधीं कधीं दोन वर्णांचा लोप होतो.

तृचः इति

तिस्रः ऋचः तृचः. तिस्रः यांतील इस्रः हे दोन वर्ण जाऊन 'त्' राहतो. त् + ऋचः = तृचः असें रूप बनतें.

दुर्ग म्हणतोः — त्रि + ऋचः ह्यांतील ऋ आणि र् यांचा लोप होतो. ऋकारामध्येंच रफार आहे असें समजावयाचें. म्हणजे ऋचा यांतील 'ऋ'चा लोप झाल्यानें त्यांत जो गुप्त रफार आहे त्याचाही लोप होतो. पण 'इ'चें काय होतें हें दुर्ग सांगत नाहीं. ऋचः यांतील ऋ गेल्यास त्रि + चः एवढेंच राहील व मग र् याचें संप्रसारण करावें लागेल. संप्रसारण केल्यानें 'इ' चा लोप होतोच. पण दुर्गाची ही केवळ क्लृप्ति होय. पाणिनि-व्याकरणांत 'तृचः' हा शब्द कसा बनला हें सांगितलें नाहीं. तें दुर्ग म्हणतो त्याप्रमाणें महाभाष्यांत सांगितलें आहे. वास्तविक त्रि + ऋचः यामध्यें 'रि' याचा म्हणजे फक्त एक वर्णाचाच लोप होतो.

अथापि आदिविपर्ययो भवति

शिवाय कधीं कधीं धातूच्या आरंभींचें जें अक्षर त्यांत वदल होतो.

**ज्योतिः घनः विन्दुः वाट्यः इति**

ज्योतिः = द्योतिः. येथें 'द्' चा 'ज्' झाला आहे.

ऋग्वेदांत 'हन्' सारखा 'घन्' असा धातु आहे. तेव्हां 'घन्' धातूपासून 'घन' असा शब्द झाला आहे.

बिन्दुः = भिन्दुः येथें भिद् धातु आहे व 'न्' हें अक्षर जास्त आलें आहे. पुष्कळ पाण्यांतून जो एक अल्पसा भाग **भिन्न** होतो तो भिन्दु म्हणजे बिन्दु.

'बिन्दति बिन्दुः' बिदि अवयवे (क्षीरस्वामी). बिद् = तुकडे पडणें किंवा वेगळे होणें.

वाट्यः = वाट्यः = भाट्यः. भट भृतौ. भट् = वाहणें. आपटे यांच्या कोशांत 'वाट्य' याचा 'वृक्षवाटिकेसंबंधीं' असा अर्थ दिला आहे. यास्ककालीं वाटय याचा काय अर्थ होता हें कळत नाहीं.

**अथापि आद्यन्तविपर्ययो भवति**

शिवाय कधीं कधीं धातूंतील आदि व अंत्य अक्षर ह्या दोघांतहि फरक होतो.

**स्तोका रज्जुः सिकता तर्कु इति**

श्चुत् = गळणें ह्या धातूंतील 'श्चु' चा 'स्तो' होतो, 'त्' चा 'क्' होतो, व 'आ' प्रत्यय लागून स्तोका हा शब्द बनतो. स्तोका हा शब्द अर्वाचीन संस्कृतांत विशेषण आहे. यास्ककालीं तो पुल्लिंगी व अनेकवचनी नाम होता असें दिसतें. स्तोकाः = बिन्दवः असा अर्थ असेल. ह्याच अर्थी हा शब्द ऋग्वेदांत सहा वेळां आला आहे. 'तुभ्यं श्चोतन्त्यध्रिगो शचीवः स्तोकासो अग्ने मेदसो घृतस्य' ३।२१।४. ह्याच सूक्तांत हा शब्द चार वेळां आला आहे.

'स्तौति स्तोकम्' (क्षीरस्वामी) आपटे यांच्या कोशांत हा शब्द 'स्तुच्' धातूपासून झाला आहे असें म्हटलें आहे.

'रज्जुः' हा शब्द 'सृज्' धातूपासून झाला आहे असें दुर्ग म्हणतो. आपण विहिरींत दोरी सोडतों म्हणून 'सृज्' धातूची कल्पना केली असावी. तसें असेल तर येथें 'स्' चा लोप होऊन व 'ऋ' चा र् होऊन 'ज' हें एक अक्षर ज्यास्त येतें यास्काच्या मनांत रज्जु हा सृज् धातूपासून झाला नसून तो 'जॄ' = जीर्ण होणें, घासून घासून बारीक होणें ह्यापासून झाला असेल. विपर्यय याचा नेहमींचा अर्थ घेतल्यास 'जॄ' पासून 'ऋज्' व मग रज्जु' असें होणें अशक्य नाहीं. तसेंच स्तोक हा शब्द 'कस्' धातूपासून झाला असावा असेंहि यास्काचें मत असेल. तसें असल्यास 'कस्' हा 'सक्' झाला व त्यामध्यें 'तो' हें जास्त अक्षर आलें असें म्हटलें पाहिजे.

कस् विकसने ह्यापासून सिकताः (वाळू) हा शब्द झाला आहे. यास्काच्या मतें फुलें जशीं जिकडे तिकडे विखुरलेलीं असतात तशी वाळू जिकडे तिकडे विखुरलेली असते. म्हणून त्यानें वि + 'कस्' धातु घेतला असावा. सिच्यन्ते सिकताः

(क्षीरस्वामी) म्हणतो. कृती – छेदने याच्यापासून 'तर्कु' = सूत कातण्याची चाती.

**टीपः**—'आदिविपर्ययः, आणि 'आद्यन्तविपर्ययः' येथें विपर्ययः हा शब्द बरोबर नाहीं. कारण त्या शब्दाचा अर्थ उलटापालट म्हणजे पहिला दुसऱ्याच्या जागीं व दुसरा पहिल्याच्या जागीं येणें किंवा ठेवणें असा होतो. अशा प्रकारचा विपर्यय फक्त सिकता व तर्कु शब्दांमध्यें दिसतो. बाकीच्यांत एका अक्षराच्या जागीं दुसरें अक्षर आलें आहे म्हणुन 'व्यापत्ति' हाच शब्द योग्य आहे. 'आदिव्यापत्तिः' आणि 'आद्यन्तव्यापत्तिः' असेंच म्हणावयास पाहिजे होतें. 'अथापि आदिविपर्ययः' येथपासून घोटाळा झाला आहे खास. कदाचित् मूळ पाठ पुढीलप्रमाणें असेलः—

अथापि विपर्ययो भवति सिकताः तर्कु इति । अथापि आदिव्यापत्तिर्भवति ज्योतिः घनः बिन्दुः वाट्यः इति । अथापि आद्यन्तव्यापत्तिर्भवति स्तोका रज्जुः इति । अथापि अन्तव्यापत्तिर्भवति.

**अथापि अन्तव्यापत्तिः भवति**

शिवाय शब्दामध्यें जें अंत्याक्षर असतें त्याच्या ठिकाणीं दुसरें अक्षर येतें; जसें

## खंड २ रा.

**ओघः मेघः नाधः गाधः वधूः मधु इति**

ओघः हा 'वह्' वाहणें ह्यापासून निघाला आहे संप्रसारणानें 'व्'चा 'उ' होतो व 'ह्' च्या ठिकाणीं 'घ' येऊन ओघ शब्द बनतो.

मेघः हा 'मिह्' शिंपडणें ह्यापासून

नाधः 'नह्' बांधणें यापासून. आपटे यांच्या कोशांत नाध् = नाथ् याचना करणें.

गाध गाह् पोहणें यापासून.

वधू वह् पोचणें. वधू माहेराहून सासरीं जाते.

मधु 'मद्' तृप्त करणें यापासून.

ह्या शब्दांतील धातूंचें शेवटलें अक्षर बदललें आहे हें स्पष्ट आहे.

**अथापि वर्णोपजनः**

शिवाय धातूचें रूप होतांना कांहीं धातूंमध्यें जास्त वर्ण येतो. जसें

**आस्थत् द्वारः भरूजा इति**

अस् फेकणें याला 'थ' लागून 'आस्थत्' हें रूप होतें.

द्वारः हा 'वार्' धातूपासून झाला आहे. घराला दारें असण्याचें कारण चोर वगैरेंचें निवारण व्हावें म्हणून. 'वार्' याच्या पाठीमागे 'द्' लावल्यानें 'द्वार' शब्द तयार होतो. 'द्वारः' हें 'द्वार्' ह्या स्त्रीलिंगी शब्दाचें प्रथमेचें अनेकवचन आहे.

भरूजा हा शब्द 'भ्रस्ज्' भाजणें यापासून झाला आहे असें दुर्ग म्हणतो. तसें असल्यास त्या धातूंत जास्त वर्ण कोणता आला? 'भरूज' यांतील 'ऊ' कीं

काय ? यास्काच्या मतें 'भरूज' शब्द 'भज्' धातूपासून झाला असावा असें दिसतें. 'भज्' मध्यें जास्त आलेलें अक्षर 'रू' असें त्याचें मत असावें. दुर्ग 'भरूजा' याच्या ऐवजीं 'भरूजः' असें रूप देतो. 'भरूजः'चा अर्थ कोल्हा असा आहे.

**तत् यत्र स्वरात् अनन्तरा अन्तस्था अन्तर्धातु भवति**

जेथें जेथें धातूमध्यें (अन्तर्धातु) य्, र्, ल्, व् यांपैकीं एखादें अक्षर (अन्तस्था) स्वराच्या आधीं किंवा मागून लगेंच आलेलें असतें

संप्रसारणाचें हें लक्षण जसें असावें तसें नाहीं. तें पुढीलप्रमाणें असावयास पाहिजे :—तत् येषु धातुषु स्वरात् अनन्तरा अन्तस्था भवति ते धातवः द्विप्रकृतीनां स्थानं भवन्ति = ज्या धातूंत स्वराच्या आधीं किंवा मागून लगेच अन्तस्थांपैकीं एखादा वर्ण येतो ते धातु दोन प्रकृतींचें स्थान होतात.

**तत् द्विप्रकृतीनां स्थानम्**

तेथें तेथें तो धातु दोन प्रकृतींचें ठिकाण होतो. म्हणजे त्या धातूच्या दोन प्रकृति होतात.

**इति प्रदिशन्ति**

असें व्याकरणकार संप्रसारणाचें लक्षण देतात.

'अव्' रक्षणें हा धातु घेऊं. यांत 'व्' हा अर्धस्वर ( अन्तस्था ) आहे. तो 'अ' च्या नंतर लगेच आला आहे. त्याचें संप्रसारण होतें. त्यामुळें 'अव्' ही एक प्रकृति असून 'ऊ' ही दुसरी प्रकृति होते. म्हणजे एका धातूपासून दुसरा धातु निर्माण होतो. 'अव्' याच्या पासून 'अवनम्' व 'ऊ' याच्यापासून 'ऊतिः' अशीं नामें उत्पन्न होतात.

'यज्' हें आणखी एक उदाहरण घेऊं. त्यांत 'य्' हा अर्धस्वरानंतर लागलाच 'अ' हा स्वर आला आहे. तेव्हां 'यज्' पासून संप्रसारणानें 'इज्' धातु उत्पन्न होतो. 'यज्' पासून 'यज्ञ' याग वगैरे व 'इज्' पासून 'इष्टि' वगैरे शब्द उत्पन्न होतात.

**टीपः**—हें कशाचें लक्षण हें यास्क सांगत नाहीं. त्याच्या वेळीं संप्रसारण असा पारिभाषिक शब्द व्याकरणांत अवश्य असावा. तो त्यानें येथें कां घातला नाहीं हें सांगतां येत नाहीं. वर सर्व ठिकाणीं 'अथापि'शब्दानें प्रत्येक बाबीचा आरंभ झाला आहे. येथेंहि तसा न्हावयास पाहिजे होता. 'अथापि संप्रसारणं भवति भरूजा इति' असा कदाचित् मूळपाठ असेल. कारण 'भ्रस्ज्' धातूपासून जर भरूजा किंवा भरूज हा शब्द निघाला असेल तर तो संप्रसारणानेंच निघाला असला पाहिजे. 'भ्रस्ज्' याच्यामध्यें 'र्' ह्या अर्धस्वरानंतर 'अ' आला आहे. तेव्हां 'र्' ह्याचा 'ऋ' होऊन 'भृज्ज्' व तदनंतर 'भरूज' असें रूपांतर झालें असावें. नंतर संप्रसारणाचें लक्षण देण्याची आवश्यकता यास्कास वाटली असावी.

**तत्र सिद्धायाम् अनुपपद्यमानायाम्**

जेव्हां एखाद्या शब्दांत मूळ धातु (सिद्धायाम् प्रकृतौ) लागू पडत नसेल म्हणजे त्या शब्दाची उपपत्ति मूळ धातूपासून होत नसेल (अनुपपद्यमानायाम्). उदाहरणार्थ,

'इष्टि' शुद्ध घेऊं. येथें 'यज्' हा सिद्ध धातु लागू पडत नाहीं. कारण तो इष्टि शब्दांत दिसत नाहीं. तेव्हां

इतरया उपपिपादयिषेत्

दुसऱ्या प्रकृतीनें ( इतरया प्रकृत्या ) त्या शब्दाची उपपत्ति करावी.

जसें:—इष्टि ह्याची उपपत्ति, यज् धातूची जी दुसरी प्रकृति, तिनें करावी. 'अव्' 'यज्' 'वद्' 'वच्' वगैरे सिद्धा म्हणजे मूळप्रकृति; 'ऊ', 'इज्' 'उद्' 'उच्' वगैरे दुसऱ्या प्रकृति होत. उपपिपादयिषेत् हें चिकीर्षिताचें (desiderative) रूप आहे. पण त्याचा अर्थ 'उपपादयेत्' असाच आहे.

तत्रापि एके अल्पनिष्पत्तयः भवन्ति

संप्रसारणानें निष्पन्न झालेल्या शब्दांमध्यें (तत्रापि) कांहीं शब्दांची ( एके ) निष्पत्ति म्हणजे उत्पत्ति स्वल्प ( अल्प ) असते.

तद्यथा एतत् ऊतिः मृदुः पृथुः पृषतः कुणारुम् इति

जसें, (तत् यथा एतत्) ऊतिः हा शब्द. अव् = ऊ. ऊ + तिः = ऊति. म्रद् = मृद्. मृद् + उः = मृदुः. प्रथ् = पृथ्. पृथ् + उः = पृथुः. प्रुष् शिंपडणें. प्रुष् = पृष्. पृष् + अत् = पृषत्; ह्याचें अनेकवचन पृषतः. कण् नाद करणें. कण् = कुण्. कुण् + आरुम् = कुणारुम्.

कुणारु हा ऋग्वेदांतला शब्द आहे. त्याचा अर्थ आवाज करणारा, गडगडणारा असा असून तो वृत्राला लावलेला आहे. त्याचें 'कुणारुम्' असें एकच रूप ऋग्वेदांत आलें असल्यानें तेंच येथें दिलें आहे.

यास्कानें या खंडांत कोठेंहि निवृत्ति, लोप, व्यापत्ति, विपर्यय वगैरेंचीं लक्षणें दिलीं नाहींत. तेव्हां संप्रसारणाचें लक्षण देण्याचें काय प्रयोजन होतें हें समजत नाहीं. वर म्हटल्याप्रमाणें 'अथापि संप्रसारणं भवति भरूजेति' असें मूळ असावें व त्यानंतर खालच्या बाबीला प्रारंभ केला असावा. ती बाब म्हणजे

अथापि भाषिकेभ्यः धातुभ्यः नैगमाः कृतः भाष्यन्ते

शिवाय कधीं कधीं वेदांत येणाऱ्या कृदन्तांची (नैगमाः कृतः) व्युत्पत्ति हल्लींच्या संस्कृतांत असलेल्या (भाषिकेभ्यः) धातूंपासून (धातुभ्यः) करितां येते (भाष्यन्ते).

येथें 'भाष्यन्ते' शब्द बरोबर नाहीं. 'व्युत्पाद्यन्ते' किंवा 'उपपाद्यन्ते' असा शब्द पाहिजे. 'भाष्' याचा अर्थ चालू भाषेंत वापरणें असा होतो.

दमूनाः क्षेत्रसाधाः इति

'दमूनस्' शब्द चालू संस्कृतांत असलेल्या 'दम्' धातूपासून झाला आहे. ज्याचें मन दान्त आहे म्हणजे ताब्यांत आहे असा त्याचा अर्थ होतो.

हें यास्काचें म्हणणें चुकीचें आहे. दमूनस् हा शब्द 'दम' म्हणजे घर ह्याच्यापासून झाला आहे. 'दमूनस्' म्हणजे गृहपति. लॅटिन भाषेमध्यें डॉमिनस् (dominus)

ह्या शब्दाचाहि अर्थ गृहपति असाच आहे. 'दम्' धातु ऋग्वेदांत आहे व त्याची 'दमिता' 'दमयन्तम्' 'दमयन्' 'दमन्यन्' अशीं रूपें आढळतात. 'दम्' धातूचा अर्थ तावडींत आणणें, नरम करणें, ताळ्यावर आणणें असा आहे.

'क्षेत्रसाधस्' ह्या शब्दाचा अर्थ जो शेत मिळवून देतो तो. 'क्षेत्रसाधस्'हें अग्नीचें विशेषण म्हणून आढळतें. 'साध्' हाहि धातु ऋग्वेदांत आढळतो.

**अथापि नैगमेभ्यः भाषिकाः**

शिवाय वेदांतील धातूंपासून ( नैगमेभ्यः ) चालू संस्कृतांत असणाऱ्या शब्दांची ( भाषिकाः ) व्युत्पत्ति किंवा उपपत्ति करितां येते. जसें

**उष्णं घृतम् इति**

'उष्णम्' ह्यांतील 'उष् भाजणें' हा धातु व 'घृतम्' ह्यांतील 'घृ' शिंपडणें हा धातु हे दोन्हीहि वेदांतच आढळतात.

**अथापि प्रकृतयः एव एकेषु भाष्यन्ते**

शिवाय नुसते धातूच (प्रकृतयः एव) कांहीं आर्यजातींत (एकेषु) वापरले जातात (भाष्यन्ते).

**विकृतयः एकेषु**

व कांहीं आर्यजातींत त्या धातूंपासून निघालेलीं नामें (विकृतयः) वापरलीं जातात.

**शवतिः गतिकर्मा कम्बोजेषु एव**

कम्बोज देशांतीलच लोकांमध्यें 'शव्' जाणें ह्याचीं धातुरूपें वापरतात.

**कम्बोजाः कम्बलभोजाः**

कम्बोजाः = कम्ब + भोजाः = कम्बल + भोजाः = कांबळें वापरणारे. कंबोज-देशांत थंडी असते म्हणून लोकांना अंगावर कांबळीं घ्यावीं लागतात.

**कमनीयभोजाः वा**

कम्बोजाः = कम् + भोजाः = कमनीय + भोजाः = जे चांगले चांगले पदार्थ म्हणजे अक्रोड, बदाम, पिस्ते, अंगूर वगैरे खातात ते.

**कम्बलः कमनीयः भवति**

कांबळ्याला कंबल असें म्हणण्याचें कारण कांबळा फार प्रिय असतो. म्हणजे 'कम्' धातूपासून 'कम्बल' शब्द निघाला असें यास्क म्हणतो. पण त्या शब्दांतील बल ह्याची त्यानें व्युत्पत्ति दिली नाहीं. पतञ्जलीच्या महाभाष्यांत 'अथापि भाषिकेभ्यः' वगैरे अवतरण घेतलें आहे. त्यांत कम्बोज वगैरेची व्युत्पत्ति आढळत नाहीं.

**विकारम् अस्य आर्येषु भाषन्ते शवः इति**

पण आर्यलोकांमध्यें 'शव्' धातूपासून निघालेलीं नामें वापरतात. जसें 'शवः'. हल्लींच्या संस्कृतांत 'शव' ह्याचा अर्थ प्रेत असा होतो. यास्ककालीं त्या शब्दाचा अर्थ गति असा असेल. किंवा इहलोक सोडून परलोकाला जाणारा असा कदाचित् अर्थ असेल. कम्बोज लोक जरी संस्कृत बोलत तरी ते आर्य नव्हते असें दिसतें.

**दातिः लवनार्थे प्राच्येषु**

दो = तोडणें (लवनार्थे) हा धातु. त्याचीं धातुरूपें पूर्वेकडील आर्यांमध्यें वापरतात.

**दात्रम् उदीच्येषु**

परंतु उत्तरेकडील आर्यांमध्यें त्या धातूचीं नामरूपें वापरतात. उदाहरणार्थ, 'दात्र'(= कोयता).

**एवम् एकपदानि निर्ब्रूयात्**

पद जेव्हां एकटेंच असतें म्हणजे जेव्हां तें समासांत आलेलें नसतें किंवा त्याचें तद्धित रूप झालेलें नसतें, तेव्हां त्याची व्युत्पत्ति अशा रीतीनें करावी.

ह्याची यास्कानें उदाहरणें द्यावयास पाहिजे होतीं. कम्बोज व कम्बल हीं त्याचीं उदाहरणें यास्क समजतो कीं काय ?

निर्वचन करावेंच करावें, संस्काराकडे लक्ष देऊं नये, शब्दामध्यें व तदर्थक धातुरूपांमध्यें थोडें बहुत साम्य असलें म्हणजे झालें; कधीं कधीं हें साम्य एखाद्या अक्षरापुरतें असलें तरी चालेल; अशा रीतीनें शब्दांची व्युत्पत्ति करावी. वैदिक शब्दांची जरूर वाटल्यास अर्वाचीन संस्कृतांतल्या धातूंपासून व्युत्पत्ति करावी. त्याचप्रमाणें अर्वाचीन संस्कृतांतील नामरूपांची व्युत्पत्ति जरूर असेल तेथें वेदांत असणाऱ्या धातूंपासून करावी. कांहीं झालें तरी व्युत्पत्ति केलीच पाहिजे असा यास्कानें निर्बन्ध घातला आहे. धातूंपासून नामरूपें होतांना भानगडी कोणत्या असतात हेंहि त्यानें सांगितलें आहे.

**अथ तद्धितसमासेषु एकपर्वसु च अनेकपर्वसु च पूर्वं पूर्वम् अपरम् अपरं प्रविभज्य निर्ब्रूयात्**

जेव्हां तद्धित व सामासिक शब्दांची व्युत्पत्ति करावयाची असते तेव्हां ते शब्द एक पेऱ्याचे असोत किंवा एकाहून अनेक पेऱ्यांचे असोत, त्या तद्धित व सामासिक शब्दांचा आधीं अर्थ सांगावा व अशा रीतीनें त्यांचा उलगडा केल्यावर (प्रविभज्य) त्यांतील अवयवांची व्युत्पत्ति द्यावी.

प्रविभज्य शब्द दुसऱ्या 'पूर्वं'च्या नंतर घालावयास पाहिजे होता. तसा न घातल्यामुळें घोंटाळा होतो व अर्थ लक्षांत येत नाहीं. तद्धित किंवा समास ह्याची 'पूर्वं' म्हणजे अगोदर प्रविभज्य म्हणजे फोड किंवा उलगडा करून त्यांतील पेऱ्यांची—मग तें पेर एक असो (एकपर्वसु) किंवा तीं अनेक असोत (अनेकपर्वसु)— व्युत्पत्ति द्यावी (निर्ब्रूयात्)

**दण्ड्यः पुरुषः**

दण्ड्य हा तद्धित शब्द पुरुष ह्याचें विशेषण आहे.

**दण्डम् अर्हति इति वा**

दण्ड्यः = दंडास जो पात्र होतो तो; किंवा

**दण्डेन संपद्यते इति वा**

किंवा ज्याच्याजवळ दण्ड म्हणजे दांडकें आहे असा. दुर्गानें 'दण्डेन संपद्यते'

ह्याचा अर्थ 'कार्षापणादिना यः संपद्यते संयुज्यते' म्हणजे ज्याला रुपया वगैरे दंड होतो असा अर्थ केला आहे. तसा अर्थ केल्यास दोन व्युत्पत्तींमध्यें फारसा फरक नाहीं. मी जो अर्थ केला आहे त्याला धरूनच

दण्डः ददतेः धारयतिकर्मणः

दण्ड शब्द 'दद्' धारण करणें ह्यापासून झाला आहे.

अशी यास्क व्युत्पत्ति देतो. 'धार्यते हि एषः अपराधेषु राजभिः':= राजे लोक अपराध करणाऱ्या मनुष्याला पकडतात असा व्युत्पत्तीचा अर्थ दुर्ग देतो. पण तो बरोबर नाहीं. दांडकें हातांत धरावयाचें असतें म्हणून त्याला दण्ड म्हणतात. पण कोणी म्हणेल धारणार्थीं दद् धातु कोठें आढळतो ? त्याला उत्तर

अक्रूरो ददते मणिम् इति अभिभाषन्ते

स्यमंतकमणि अक्रूर धारण करतो (ददते) म्हणजे तो वापरतो असें वाक्य लौकिक भाषेंत लोक उच्चारतात ( अभिभाषन्ते ).

दमनात् इति औपमन्यवः

दण्ड शब्द दम् धातूपासून निघाला आहे असें औपमन्यव म्हणतो. कारण ज्याला दण्ड होतो किंवा ज्याला शिक्षा म्हणून सोटा लगावतात तो नरम होतो (दमनात्).

दण्डम् अस्य आकर्षत इति गर्हायाम्

जेव्हां कोणाची निर्भत्सना करावयाची असते ( गर्हायाम् ) तेव्हां ह्याला सोटा लगावा असें लोक म्हणतात. सोटा लगावल्याशिवाय त्याची मगरुरी कमी होणार नाहीं. आकर्षत ह्याचा अर्थ ओढा असा होतो. तेव्हां वाक्याचा अर्थ ह्याचा सोटा ओढून घ्या असा होईल. सोटा हातांत असल्यामुळें हा मगरूरपणें वागत आहे असा अर्थ केल्यानेंहि निर्भत्सना व्यक्त होते. 'दण्डेन संपद्यते' म्हणजे ज्याला सोटा लगावला जातो तो असा अर्थ होईल काय ?

कक्ष्या रज्जुः अश्वस्य

घोड्याची म्हणजे घोड्याच्या पाठीवर जीन घालण्याकरितां ज्या दोरीचा उपयोग करितात ती. त्या दोरीला कक्ष्या म्हणतात.

कक्षं सेवते

कारण ती दोरी त्याच्या दोन्ही खांकांतून घेऊन मग खालीं बांधतात. येथें एकच खाक ( कक्षम् ) कां घेतली ? कक्षौ म्हणजे दोन खांका किंवा कक्षान् म्हणजे चार खांका असें म्हणावयास पाहिजे होतें. कारण जीन पाठीवर साफ बसण्याकरितां व कायम राहण्याकरितां त्याला चार दोऱ्या पाहिजेत. पुढील दोन खांकांत जाणाऱ्या दोन दोऱ्यांची गांठ पुढें व मागील खांकांतून जाणाऱ्या दोहोंची मागें असें असलें पाहिजे. कक्ष्या ह्याचा बरोबर अर्थ लक्षांत येत नाहीं. ऋग्वेदांत 'कक्ष्येव युक्तं लिबुजेव वृक्षम्' असे शब्द १०।१०।१३ यांत आले आहेत. लता जशी झाडाला कवटाळते व कक्ष्या जशी घोडयाला कवटाळते असा त्या शब्दांचा अर्थ आहे. तेव्हां कक्ष्या

म्हणजे घोड्याच्या अंगाभोंवतीं गुंडाळण्याची वस्तु. ती काय असावी ? ती नुसती दोरी कशी असेल ? ऋग्वेदकालीं 'कक्ष' म्हणजे खांक असा अर्थ होता हें मानण्याला कांहीं प्रमाण नाहीं.

**कक्षः गाहतेः**

कक्ष शब्द 'गाह्' ह्या धातूपासून (झाला आहे).

**क्सः इति नामकरणः**

गाह्‌ला नाम बनविणारा 'क्स' हा प्रत्यय लागला आहे. गाह् + क्सः येथें गा चा क व ह् चा क् केल्यानें कक् + क्सः = कक्षः. किंवा ह् चा लोप केल्यानें क + क्सः = कक्षः. असें कसें तरी रूप बनवावयाचें. कारण अर्थावरून व्युत्पत्ति करावयाची हा निरुक्ताचा सिद्धांत आहे. पाण्यांत बुडी मारावयाला खांकेचा काय उपयोग होतो हें समजत नाहीं. पैलतीराला जावयाला खांका बळकट पाहिजेत; नाहींतर हात दमतील. खांकेंत बळ असतें म्हणूनच स्त्रिया दध्यादिकांचें आलोडन म्हणजे ताक करूं शकतात. तेव्हां स्त्रियांच्या खांकांना 'कक्ष' शब्द प्रथमतः लावण्यांत आला असें दुर्ग म्हणतो.

**ख्यातेर्वा**

किंवा कक्ष शब्द 'ख्या' धातूपासून झाला असेल.

**अनर्थकः अभ्यासः**

त्या धातूचा कांहीं कारण नसतांहि अभ्यास करावयाचा म्हणजे 'कख्य' असें रूप करावयाचें. परंतु 'कख्य' याचें 'कक्ष' रूप कसें करावयाचें हें यास्कानें सांगितलें नाहीं.

**किम् अस्मिन् ख्यानम् इति**

ह्या खांकेचें प्रदर्शन म्हणजे ख्यानम् काय म्हणून करावयाचें ? खांकेमध्यें इतका घाम सांचतो कीं ती कोणास दाखविणें हें अप्रशस्त समजलें जातें. 'इति' च्या पुढें 'वा' कां घातला हें समजत नाहीं. ही निराळी व्युत्पत्ति आहे. ह्या व्युत्पत्तीनें 'किंख्यः' हें मूळचें शब्दरूप असून त्याचें 'कख्यः' व नंतर 'कक्षः' असें रूप झालें.

**कषतेर्वा**

किंवा हा शब्द 'कष्' खाजविणें ह्यापासून झाला असेल. कारण कंड सुटल्यामुळें खांक नेहमीं खाजवितात. ह्या सगळ्या व्युत्पत्तींमध्यें धातु कोणताहि असो त्याला नामकरण क्स प्रत्यय लावलाच पाहिजे व तसें यास्कानें म्हणावयास पाहिजे होतें.

**तत्सामान्यात् मनुष्यकक्षः**

घोड्याची खांक व मनुष्याची खांक ह्यांमध्यें साम्य असल्यामुळें ( तत्सामान्यात् ) म्हणजे वर जे धातु सांगितले त्यांचे अर्थ मनुष्याच्या खांकेलाहि लागत असल्यामुळें मनुष्याच्या खांकेलाहि कक्ष म्हणूं लागले. दुर्ग म्हणतो, "कक्ष शब्द पहिल्या प्रथम स्त्रीच्या खांकेला लावला गेला व नंतर सर्व मनुष्यांच्या खांकेला तो लावूं लागले." परंतु स्त्री मनुष्यांत मोडत नाहीं कीं काय असें दुर्गास विचारावयास पाहिजे होतें.

बाहुमूलसामान्यात् अश्वस्य

मनुष्याच्या बाहूंचें मूल जी खांक ती घोड्यालाहि असल्यामुळें घोड्याच्या त्या अंगाला 'कक्ष' म्हणूं लागले.

येथें कांहीं तरी घोटाळा झाला आहे. घोड्याची जी रज्जु तिला कक्ष्या म्हणतात अशी सुरवात करून यास्कानें कक्ष शब्दाच्या व्युत्पत्ति दिल्या. तेव्हां अश्वाचाच कक्ष त्याच्या डोळ्यापुढें होता. घोड्याच्या कक्षेवरून मनुष्याच्या खांकेलाहि कक्ष म्हणूं लागले. तेव्हां 'मनुष्याच्या कक्षेवरून घोड्याच्या खांकेस कक्ष म्हणूं लागले' असें यास्क कसें म्हणेल? माझ्या मतें 'बाहुमूलसामान्यात् अश्वस्य' हें तत्सामान्यात् ह्याचें विवरण पोथीच्या बाजूला कोणीतरी लिहिलें व तें मागून ग्रंथांत घुसडलें गेलें. यास्क नेहमीं एकच उदाहरण देत असतो. तेव्हां 'दण्ड' याची व्युत्पत्ति दिल्यावर 'कक्ष्या' याची व्युत्पत्ति देण्याचें कांहीं कारण नव्हतें. हें कक्ष्या-प्रकरण प्रक्षिप्त असावें असें वाटतें.

दण्ड व कक्ष्या हीं एकपर्व तद्धिताचीं उदाहरणें होत.

## खंड ३ रा.

राज्ञः पुरुषः राजपुरुषः

राजपुरुष म्हणजे राजाचा पुरुष, राजानें नेमलेला अधिकारी. ह्या समासामध्यें दोन पर्वे आहेत. त्यांची व्युत्पत्ति यास्क खालीलप्रमाणें देतो.

राजा राजतेः

राजन् शब्द राज् अम्मल करणें ह्यापासून झाला आहे. जो लोकांवर अम्मल करतो (राजतेः) तो राजा.

पुरुषः पुरिषादः

पुरु = पुरि = पुरीतत् नांवाच्या नाडीमध्यें; दुर्ग म्हणतो, "पूः = शरीर किंवा बुद्धि; तिच्यामध्यें 'षः' (= षादः = सीदति) = जो बसतो तो. पुरीतत् नाडींत किंवा शरीरांत किंवा बुद्धींत जो वसतो, वास करितो तो पुरुष म्हणजे आत्मा. अथवा

पुरिशयः

'पुरि' शब्दाचा अर्थ वरीलप्रमाणेंच. फक्त षः = शयः = जो त्यांमध्यें निजतो तो.

पूरयतेर्वा

किंवा पुरुष शब्द पूरय् भरून काढणें ह्यापासून झाला असेल. तेव्हां पुरुष शब्दाचा अर्थ सर्व ब्रह्मांड जो व्यापून टाकतो तो म्हणजे परमात्मा.

पूरयति अन्तर् इति अन्तरपुरुषम् अभिप्रेत्य

पण ज्या वेळेला अन्तरपुरुष म्हणजे अंतःकरणांत असणारा पुरुष अशा अर्थी पुरुष शब्द असेल त्यावेळीं पुरुष शब्दाचा अर्थ जो अन्तर् म्हणजे अंतःकरण व्यापून टाकतो तो.

पुरुष शब्दाचा जसा भिन्न अर्थ होईल तशी त्याची भिन्न व्युत्पत्ति दिली पाहिजे. अन्तरपुरुषम् यांतील 'अन्तर' बद्दल 'आन्तर' पाहिजे.

राजपुरुष म्हणजे पोलिसासारखा कोणी अधिकारी, ग्रामरक्षक किंवा नगररक्षक; तेव्हां पुरिषादः ह्याचा अर्थ जो नगरांत (पुरि) रक्षणासाठीं वसतो म्हणजे वास करितो तो अधिकारी. ह्यावरून 'पुरि' शब्दाचे वर दिलेले तीनहि अर्थ चुकीचे ठरतात. पुरिशयः ही व्युत्पत्ति जीवात्म्यालाच लाविली पाहिजे. ग्रामरक्षक किंवा नगररक्षक ह्यांना ती लावतां येत नाहीं. कारण हे रक्षक जर गांवांत किंवा नगरांत निजून राहतील तर ते रक्षणाचें काम कसें करतील? 'पूरयतेर्वा' ही परमात्मा जो पुरुष त्याची व्युत्पत्ति आहे. 'पूरयति अन्तर्' वगैरे जीवात्मा जो पुरुष त्याची व्युत्पत्ति खास नव्हे. कारण त्याला 'पुरिशय' असें आधींच म्हटलें आहे. तेव्हां हीहि व्युत्पत्ति परमात्मा जो पुरुष त्याचीच होय. कारण परमात्मा ब्रह्मांडांत असतो व अंतःकरणांतहि असतो. हाच अर्थ पुढील ऋचेंत आला आहे.

**यस्मात् परं नापरमस्ति किंचित्**

ज्याच्याहून (यस्मात्) दुसरी कोणतीहि वस्तु (अपरं किंचित्) श्रेष्ठ नाहीं (परं नास्ति)

**यस्मान्नाणीयो न ज्यायोऽस्ति किंचित्**

ज्याच्याहून जास्त बारीक (अणीयः) किंवा जास्त मोठें (ज्यायः) असें कांहीं नाहीं

**वृक्ष इव स्तब्धो दिवि तिष्ठत्येकः**

जो वृक्षाप्रमाणें निश्चल (स्तब्धः) असा स्वर्गांत (दिवि) एकटा वास करितो. (तिष्ठति एकः)

**तेनेदं पूर्णं पुरुषेण सर्वम्** (श्वेताश्वतरीयोपनिषत् ३।९)

त्या पुरुषानें हें सर्व व्यापून टाकलें आहे (पूर्णम्)

**इत्यपि निगमो भवति**

असा वैदिक मंत्रहि आहे.

हा मंत्र 'पूरयतेर्वा' ह्याचें उदाहरण होय. 'पूरयति अन्तर्....अभिप्रेत्य' ह्या शब्दाची कांहीं जरूरी नाहीं. त्यांचा अर्थ पुरिशय ह्यामध्यें आला आहे.

राजपुरुषः हा समास यास्क एकपर्व समजतो असें दिसतें. परंतु हा एकपर्व कसा होईल? वास्तविक एकपर्व समासाचें उदाहरण 'पितरौ' (आईबाप) हें होईल.

**विश्वकद्राकर्षः**

मूळ पाठ 'विश्वकद्रः' असा असावा. कारण यास्क तेवढयाचेंच विवरण करितो.

**वि इति चकद्रः इति**

विश्वकद्रः याचे वि आणि चकद्रः असे दोन भाग पडतात.

**श्वगतौ भाष्यते**

'चकद्र' हा शब्द हल्लींच्या संस्कृतांत कुत्र्याच्या गतीला लावतात. तो शब्द खालीलप्रमाणें बनला आहे.

**द्राति इति गतिकुत्सना**

द्रा ह्या धातूनें वाईट गति म्हणजे गरीब प्राण्यांना मारण्यासाठीं जी गति ती दाखविली जाते.

**कद्राति इति द्रातिकुत्सना**

'द्रा' धातूमध्यें जो वाईट अर्थ आहे त्याला 'क' यानें जास्त जोर येतो. म्हणजे 'कद्राति' ह्यानें अतिशय घाणेरडी गति दाखविली जाते.

**चकद्राति कद्राति इति सतः अनर्थकः अभ्यासः**

कद्राति किंवा कद्रा ह्याचा कांहीं कारण नसतांनाहि (अनर्थकः) अभ्यास करावयाचा. तसें केल्यानें चकद्राति हें रूप सिद्ध होतें.

**तत् अस्मिन् अस्ति इति विश्वकद्रः**

तत् म्हणजे ती अतिशय घाणेरडी गति आहे ज्याच्यामध्यें असा शिकारी कुत्रा.

वि (=वत्) हा चकद्र याला लाविल्यामुळें तो शब्द तद्धित झाला आहे. 'वि' ह्याचा अर्थ जवळ असणें. विश्वकद्र हा शब्द अनेकपर्व तद्धिताचें उदाहरण होय. वि हा प्रत्यय असून चकद्र ह्याचीं तीन पर्वें पडतात. तीं तीन पर्वें द्र, कद्र व चकद्र, अशीं होत. वि हें पर्व समजल्यास दण्डय यांतील 'य' हि पर्व समजलें पाहिजे. परंतु यास्क दण्डय हें एकपर्वाचें उदाहरण देतो. तेव्हां चकद्र ह्यांत तीनच पर्वें आहेत असें समजलें पाहिजे. हा दिलेला अर्थ दुर्गाला पसंत नाहीं. तो पुढीलप्रमाणें अर्थ करितो. शिकारी कुत्रा घेऊन गरीब प्राण्यांना पकडण्याला किंवा मारण्याला जो पारधी जातो त्याच्या गतीला 'द्राति' (वाईट कामाला जातो) असा शब्द लावितात. नुसती वाईट गतीच (द्राति) नव्हे तर अतिशय वाईट गति (कद्राति) ज्याच्यामध्यें आहे त्या पारध्याला विश्वकद्र म्हणतात. तो अपराधी म्हणून जो कोणी अंमलदार त्याला खेंचून नेतो तो विश्वकद्राकर्षः (विश्वकद्रं यः आकर्षति सः). दुर्गाच्या पाठांत 'तम् आकर्षति इति विश्वकद्राकर्षः' असे जास्त शब्द विश्वकद्रः आणि कल्याणवर्णरूपः ह्यांमध्यें असावेत. विश्वकद्राकर्षः हें समासाचें दुसरें उदाहरण होय असें तो म्हणतो. पण ती त्याची चूक होय व त्यानें घेतलेला पाठहि चुकीचाच होय. विश्वकद्रः हें अनेकपर्व तद्धिताचें उदाहरण आहे असें वर म्हटलेंच आहे. कदाचित् यास्काच्या मतें विश्वकद्र शब्दामध्यें वि + च + क + द्र अशीं चार पर्वें असतील. 'वि' हा चकद्र याला लावल्यानें मध्यें 'श्' येतो असें पाणिनीनें कोठेंहि म्हटलें नाहीं. पाणिनीच्या वेळीं हा शब्द अस्तित्वांत नसावा. तो जर त्याच्यावेळीं अस्तित्वांत असता तर हरिश्चन्द्र ह्या शब्दाचा जसा त्यानें निर्देश केला आहे, तसा ह्याहि शब्दाचा केला असता. यास्क पाणिनीच्या आधीं होऊन गेला ह्या ह्मणण्याला हा एक पुरावा होईल. 'श्वा विश्वकद्रुर्मृगयाकुशलः' ( अमर २।१०।२३)= शिकारीमध्यें जो कुशल अशा कुत्र्याला

# परिषद्वार्ता

## साहित्यसंमेलन

चौदावें-महाराष्ट्र-साहित्य संमेलन बेळगांवास ता. २६, २७, २८ मे रोजीं यशस्वी रीतीनें पार पडलें हें कळविण्यास आनंद होतो. संमेलनाचा अधिकृत वृत्तांत पुढील अंकीं प्रसिद्ध होईल.

## कार्यकारी मंडळाच्या सभा

( १ ) ता. ७ एप्रिल १९२९. हजरः—चापेकर, फाटक, पोतदार, वैद्य, ओगले व काणे. ठरावः—(१) संमेलनाचे अध्यक्षपदासाठीं प्रो. परांजपे, श्री. सरदेसाई व प्रो. वा. म. जोशी यांचीं नांवें सुचविणें. (२) कर्नाटक-साहित्य-परिषदेच्या संमेलनविरोधी ठरावास उत्तर पाठविण्याचा अधिकार कार्याध्यक्षास देणें. (३) रा. ब. पाध्ये यांजकडून १९२८ चें व्याज मागणें. (४) प्रि. घारपुरे यांस उपाध्यक्ष नेमणें.

( २ ) ता. ५ मे १९२९ हजरः— फाटक व सुंदरराव वैद्य; कोरम नाहीं म्हणून तहकूब.

( ३ ) ता. १९ मे १९२९ हजरः— चापेकर, ओगले, फाटक व काणे; कोरम नाहीं. बेळगांव संमेलनापुढें मांडण्याचे ठराव सुचविण्याविषयीं कार्यकारी मंडळाच्या सभासदांना पत्रेंहि पाठविलीं होतीं परंतु प्रो. पोतदार यांचे खेरीज कोणाचेंहि उत्तर आलें नाहीं.

( ४ ) ता. ३० जून १९२९ हजरः— चापेकर, फाटक, वैद्य, आळतेकर व काणे. पत्रानें मतें मागविलीं त्यांपैकीं फक्त रा. दाते यांजकडून मत आलें. ठरावः—गोव्यास पुढील संमेलन भरविण्याची परवानगी गोमांतक-साहित्य सेवक मंडळास देणें.

## साधारण सभा

साहित्य-परिषदेची साधारण सभा बेळगांव येथें ता. २८ मे रोजीं सकाळीं श्री. सरदार किबे यांचे अध्यक्षतेखालीं भरली होती. सभेस सुमारें शंभर सभासद हजर होते. परिषदेच्या कार्याची सर्व-साधारण माहिती ना. गो. चापेकर यांनीं सांगितल्यावर परिषदेची कचेरी मुंबईहून पुण्यास नेण्याच्या सूचनेवर चर्चा झाली.

## सभासद वाढविण्याबद्दल विनंति

मागील अंकीं केलेली कळकळीची विनंती इतरत्रहि प्रसिद्ध केली होती. तिचा थोडा उपयोग झाला पण व्हावा तसा झाला नाहीं याबद्दल खेद होतो. खासगी रीतीनें पत्रेंहि कित्येक पाठविलीं त्यांचाहि थोडा उपयोग झाला. या बाबतींत श्री. प्रल्हाद धोंडो कानिटकर ( भोर ) यांच्या मदतीचा साभार उल्लेख करणें जरूर आहे. पण सभासद वाढविण्याच्या कामीं सर्वांनीं साह्य करावें अशी पुन्हा एकदां प्रार्थना करतों.

## नवीन तहाहयात सभासद

रा. ब. आण्णा बाबाजी लठ्ठे, दिवाण कोल्हापूर ( रु. शंभर )

श्रीमंत नारायणराव बाबासाहेब घोरपडे, संस्थान इचलकरंजी

श्री. दत्तो आप्पाजी तुळजापुरकर, मुंबई.

डॉ. शंकर पुरुषोत्तम आगारकर, कलकत्ता.

श्री. गणेश गंगाधर जांभेकर, पुणें ( हप्त्यानें )

श्री. परशुराम दामोदर वैद्य, ठाणें

श्री. महादेव विनायक डोंगरे, महाड.

श्री. पांडुरंग केशव शिराळकर, कऱ्हाड.

श्री. केशव आप्पा पाध्ये, मुंबई.

अनुक्रमणिका

ग्रंथपरीक्षण

# श्रीरामायण-समालोचना

( लेखकः—ना. गो. चापेकर )

रत्नागिरी जिल्ह्यांतील राजापुरासारख्या आडगांवीं रहाणाऱ्या व विश्वविद्यालयाच्या शिक्षणाचा लाभ न घेतलेल्या अशा एका होतकरू तरुणानें रामायणासारख्या लोकमान्य ग्रंथावर जवळ जवळ हजार पानांचा चिकित्सात्मक ग्रंथ कुशलतेनें लिहावा ह्या गोष्टी-बद्दल "महाराष्ट्रीयां"बरोबर अखिल महाराष्ट्राचें अभिनंदन करणें अनुचित होणार नाहीं अशी आम्हांस खात्री वाटते. उघडच आहे कीं आजवर अगदीं वरच्या थरास असणारी विद्वत्ता खालच्या थरावर आलेली पाहून कोणाला आनंद होणार नाहीं ?

रामायण हा ग्रंथ अनेक दृष्टींनीं अपूर्व असल्यामुळें चिकित्सक दृष्टीनें त्याचें अध्ययन होणें अवश्य होतें. रामायणांतील राक्षस आणि वानर, रामायणांतील विमान, रामायणांतील चातुर्वर्ण्य, रामायणांतील यौवराज्याभिषेक, इत्यादि गोष्टींनीं ह्या आदि-काव्यास अलौकिकत्व प्राप्त झालें आहे. ह्या असामान्य गोष्टींमुळें रामायणाला ऐतिहा-सिक महत्व जसें आलें आहे तसेंच त्यांतील पात्रांच्या अत्यंत उदात्तस्वभावरेखनामुळें ह्या ग्रंथाच्या वांट्याला विद्वन्मान्यताहि आलेली आहे. म्हणून रामायणाचा परामर्श घेण्यास जाडी विद्वत्ता अंगीं असणाऱ्या पंडिताची अवश्यकता आहे हें उघड आहे. ग्रंथकाराचें रामायणविषयक अध्ययन अत्यंत सूक्ष्म व विस्तृत आहे यांत शंका नाहीं. ह्या त्यांच्या ग्रंथप्रभुत्वाच्या जोडीला लेखनकौशल्य लाभलें असल्यामुळें समग्र ग्रंथ फारच मनोरंजक झाला आहे. परंतु ह्या सर्वांमध्यें ऐतिहासिक दृष्टीची जर भर पडती तर हा ग्रंथ फारच बहुमोल झाला असता. कोणत्या गोष्टीला किती महत्त्व द्यावयाचें हें कळणें सोपें नसतें. कोणत्याहि गोष्टीची बरोबर पारख करणें हें मनुष्य अनुभवानेंच शिकत असतो. इतिहासाच्या अभ्यासानें प्राप्त झालेल्या व्यापक दृष्टीची येथें अवश्य-कता असते. "रामायणाच्या उपसंहारानें" एतद्विषयक अनेक ग्रंथ नामशेष झाले तरी श्री. चिंतामणराव वैद्यांचें एतद्विषयक लिखाण अबाधित रहाण्याची जी खात्री वाटते त्याचें कारण 'उपसंहार'कर्त्यांत ऐतिहासिक दृष्टीचा अभाव हेंच होय.

वर वर्णन केलेली दृष्टी महाराष्ट्रियांना अद्यापि आली नसल्यामुळें ज्या कांहीं थोड्या भ्रामक कल्पना त्यांच्याकडून ह्या ग्रंथांत मांडल्या गेल्या आहेत त्यांपैकीं 'रामायण हें काव्य नसून इतिहास आहे' ही एक होय. अयोध्येंत दशरथ नांवाचा राजा असेल; त्या राजाला रामलक्ष्मणादि चार पुत्रहि असतील. पण इतक्या इतिहा-साच्या सामग्रीवर काव्य रचतां येत नाहीं असें थोडेंच आहे ? रामायण हा इतिहास

आहे हें प्रतिपादन करण्यास महाराष्ट्रियांनीं जीं तुटपुंजीं कारणें दिलीं आहेत तीं आम्हांस पटत नाहींत. शिवाय इतिहास म्हटला तरी त्यांतहि आणखी एक असा उपप्रश्न उत्पन्न होतो कीं वाल्मिकी ऋषींनीं रामराज्याचा इतिहास लिहिला अथवा त्यांच्या मनांतून रामाचेंच चरित्र लिहावयाचें होतें ? रामाच्या राज्याचा इतिहास होता हें म्हणणें शक्य नाहीं. कारण सगळ्या रामायणांत रामाच्या राज्यपद्धतीचें अगर अत्रांतर गोष्टींचें वर्णन प्राधान्यानें कोठेंच केलेलें आढळत नाहीं. बरें; वाल्मीकींचा उद्देश रामाचें चरित्रच लिहिण्याचा होता असें म्हणावें तर रामाच्या बाललीला, त्याचा उपनयन-संस्कार, त्याचा गुरुगृहवास, इत्यादि, चरित्रांतील अवश्यक व महत्त्वाच्या गोष्टी वर्णिलेल्या नाहींत हें विसरतां कामा नये. रामचरित्रांतील एका विशिष्ट प्रसंगाचाच हा इतिहास आहे असें म्हणतां येण्यासारखें आहे. पण तसें महाराष्ट्रियांनीं म्हटलें नसल्यामुळें त्याचा विशेष विचार करण्याचें प्रयोजन नाहीं. हा विशेष प्रसंग म्हणजे रावणानें सीतेला पळविणें व रामाच्या हातून रावणाचा वध होणें हा होय. पण ह्या प्रसंगाचा पायाच असा आहे कीं तो काढून घेतल्यास 'इतिहास' 'इतिहास' म्हणून म्हटली जाणारी इमारत क्षणाचाहि विलंब न लागतां एकदम ढांसळून पडेल. मारीचानें सुवर्ण-मृगरूप धारण केल्यामुळें सीता त्या मृगाला मोहित झाली व तिच्या शब्दाकरितां रामाला त्या मृगाची शिकार करण्यास जावें लागलें. आतां मनुष्यानें मृगरूप धारण करणें हा इतिहास आहे असें कोणीहि ध्वनित करीत नाहीं. ही कवीची चतुर कल्पना आहे व अशा कल्पनांचा आश्रय केल्याशिवाय कवीला आपल्या काल्पनिक प्रासादाची उभारणी करतां येत नाहीं असा आपला अनुभवहि आहे. तसेंच जनस्थानापासून लंकेत आकाशमार्गानें—किंवा पाहिजे तर भुईमार्गानें म्हणा—रावण सीतेला घेऊन गेला हा निव्वळ इतिहास आहे ही गोष्ट कोणाच्याहि विवेचक बुद्धीला मान्य होण्यासारखी दिसत नाहीं. शेवटीं पृथ्वीनें सीतेला पोटांत घेतली हें अक्षरशः खरें मानावयाचें नसल्यास ह्या अलंकारिक भाषेचा खरा अर्थ काय होतो ह्याचाहि विचार करणें अवश्य आहे. पण 'महाराष्ट्रियां'नीं तो केलेला दिसत नाहीं. ह्या विलक्षण अथवा असामान्य गोष्टी रामायणाच्या कथानकाशीं एकजीव होऊन बसल्यामुळें रामायण हा इतिहास आहे असें म्हणणें धाडसाचें होईल असें आम्हांस वाटतें. पापी रावणाच्या मुठींत सांपडलेली सीता शुद्ध राहणें संभवनीय नाहीं अशी शंका प्रत्यक्ष रामाच्या वेळेस लोकांना येत होती. त्या शंकेचा आजमितीस तरी परिहार करणें शक्य आहे काय ? सीतेच्या पातिव्रत्याच्या तेजापुढें रावणाचें कांहीं चालेना हें म्हणणेंहि जरी काव्यमय असलें तरी तें वस्तुस्थितिदर्शक नाहीं हें निश्चित. कारण रावणानें सीतेला दोन महिन्यांची मुदत दिली होती व त्या कालानंतर जर तो जिवंत राहिला असता तर त्याच्याकडून सीता भ्रष्ट झाली नसती असें म्हणण्याला कोणी तयार आहे काय ? रामायणाला आपण ऐतिहासिक स्वरूप दिलें म्हणजे आपण आपल्या भोंवतीं अनेक शंकांचें जाळें निर्माण

करितों. सीतेला पळवून नेण्यापूर्वी लक्ष्मण आश्रमापासून दूर कां गेला ही शंका आपणांस त्रास देते व तिचें उत्तर देतां येत नाहीं. सीतेच्या अनपेक्षित व कटु भाषणानें कदाचित् सीतेच्या दृष्टीआड लक्ष्मणाला होणें भाग पडलें तरी आश्रमाच्या आसपासच त्यानें कोठेंतरी दडून रहावयास पाहिजे होतें. पण लक्ष्मणासमक्ष सीतेला पळवून नेणें रावणालाहि अशक्य आणि कवीला तर ती गोष्ट घडवून आणावयाची एवढयाचसाठीं सीतेच्या तोंडीं तिच्या स्वभावाला अननुरूप अशी भाषा कवीला घालावी लागली आणि लक्ष्मणाला आश्रमापासून दूर न्यावा लागला. एकंदरींत आमच्या मतें रामायण हा इतिहास आहे असें मानण्याला सबळ कारणें 'समालोचनें'त दिलेलीं नाहींत. राक्षसांविषयीं अतिशयोक्तिपूर्ण वर्णनें हीहि गोष्ट आमच्या तर्काला अनुकूलच आहे. तात्पर्य, रामायण इतिहासहि नव्हे व पुराणहि नव्हे तर आजपर्यंत लोकांत समज आहे त्याप्रमाणें तें काव्यच आहे यांत संशय नाहीं. रामायण जर ऐतिहासिक काव्य असतें तर रामायणाच्या मूळ कथेंत कधींहि फरक झाला नसता. बरींच प्राचीन जीं जातकें त्यांत तर सीतेला राम-लक्ष्मणांची बहीण बनविल्याचें आपण वाचतोंच. इतका फरक भारताच्या कथानकांत कोणाला आढळेल काय? आजपर्यंत रामायणाचे जे अवतार झाले त्यांत ग्रथित केलेल्या गोष्टी एकत्र करून जर एक गोधडी निर्माण केली तर तिचें स्वरूप मूळ रामायणाहून किती तरी पालटलेलें दिसून येईल. भारतासंबंधानें असें म्हणतां येणार नाहीं. 'महाराष्ट्रियां'ची काव्यविषयक कल्पनाहि चुकीची आहे असा आम्हांस संशय येतो. काव्य निर्माण करण्यापूर्वी कवीची मनोवृत्ति त्या विषयाशीं तदाकार झाली असली पाहिजे हें 'महाराष्ट्रियां'चें काव्याचें लक्षण कोणासहि संमत होण्यासारखें नाहीं. "उचंबळलेल्या मनोवृत्तींचा स्फोट म्हणजे काव्य" ह्या वर्डस्वर्थ कवीच्या लक्षणाशीं हें लक्षण जुळतें असें म्हणणें तर अगदींच चुकीचें आहे. स्फूर्ति आपोआप होते; तादात्म्यांत प्रयत्नाची अपेक्षा असते. विषयाशीं तादात्म्य पावणें हें बुद्धीचें कार्य असून, स्फूर्ति होणें हें मनाचें कार्य आहे. म्हणून प्रचलित लोकसमजूत आहे तीच खरी असून भारताहून रामायणाची भिन्नता दर्शविण्यास ती अत्यंत उपयुक्त आहे. काव्य म्हणूनच रामायणाचा अभ्यास केल्यास मनाला जितका आनंद होईल तितका आनंद इतिहास ह्या दृष्टीनें रामायण वाचलें असतां होणार नाहीं, अशी आमची समजूत आहे.

'समालोचना'कारांचा दुसरा मोठा भ्रम म्हणजे 'रावण हा ब्राह्मण असून, वेदाध्ययनशील व यज्ञ करणारा होता. ह्यासंबंधानें महाराष्ट्रियांनीं रा. का. न. केळकर ह्यांना दिलेलें प्रसिद्ध व अप्रसिद्ध उत्तर आम्हीं वाचलें आहे. व तें वांचल्यानंतरहि राक्षसांना वेदानुयायी म्हणण्याला आम्ही तयार नाहीं. यज्ञाचा विध्वंस करणारे यज्ञमार्गीय कसे असूं शकतील याची कल्पनाहि आम्हांला करवत नाहीं. नरमांसभक्षक, निशाचर, सुरापान करणारे, तसेंच परस्त्रीहरण करणारे, हे लोक रामाच्याच धर्माचे होते असें महाराष्ट्रियांना म्हणविलें तरी कसें याचें आम्हांला राहून राहून आश्चर्य

वाटतें. असुर आणि राक्षस ह्यांचें तादात्म्य मानण्यांत महाराष्ट्रियांनीं आणखी एक चूक केली आहे. देवमनुष्यांप्रमाणें असुर हे सुद्धां अग्नीचे उपसक होते. परंतु राक्षस देवीचे आणि शंकराचेच उपासक होते. 'निकुंभिला' देवीची उपासना राक्षस करीत असें महाराष्ट्रियांनींच कबूल केलें आहे. तसेंच रावणाच्या लिंगपूजेचाहि उल्लेख उत्तरकांडांत केलेला आढळून येतो. उदाहरणार्थः—

यत्र यत्र च याति स्म रावणो राक्षसेश्वरः
जाम्बूनदमयं लिङ्गं तत्र तत्र च नीयते ॥

परंतु रामाच्या कुटुंबांत देवींची अथवा लिंगाची उपासना असल्याचें रामायणावरून दिसत नाहीं. असो. कोणताहि राक्षस मंत्रकर्ता म्हणून प्रसिद्ध नाहीं. फार काय पण असुरांच्या नांवावरहि एकसुद्धां ऋक्मंत्र असूं नये ही गोष्ट ध्यानांत ठेवण्यासारखी आहे. देव हेच काय ते ऋषी असून मंत्रकर्ते होते असें एकंदर प्राचीन इतिहासावरून अनुमान करण्यास हरकत दिसत नाहीं. ह्यावरून रावणाचें अग्निहोत्र, हवन इत्यादि वर्णनें प्रक्षिप्त असावीं असें आमचें मत झालें आहे. 'सालकटंकटा' हें राक्षसांच्या मूळ भाषेंतील नांव असावें हा श्री. चिंतामणराव वैद्य यांचा तर्क बरोबर आहे. दशग्रीव, रावण, शोणिताक्ष, मित्रघ्न, दूषण, विभीषण, इत्यादि राक्षसांचीं नांवें हीं राक्षसेतरांच्या भाषेंतील असून त्यांनींच तीं बनविलेलीं असावीं. असल्या कामीं रामायणांतील पुराव्यावरून सिद्धांत बांधणें गैरशिस्त आहे. नरमांसभक्षण इत्यादि जे राक्षसांचे निर्विवाद असे विशिष्ट आचार आहेत त्यांवरून राक्षस हे अनार्य असले पाहिजेत असें जें शास्त्रोक्त अनुमान करितां येतें व त्यावरून जो सिद्धांत बांधतां येतो त्या सिद्धांताला अनुसरून रामायणांतील पुराव्याची छाननी करावी हेंच योग्य होय. विश्वामित्र यज्ञानुष्ठानाला बसले असतां त्यांच्या वेदीवर रक्ताची वृष्टी करणाऱ्या राक्षसांचा धर्म तोच ब्राह्मणांचा धर्म होता असलें अनुमान कोणीहि समंजस मनुष्य करणार नाहीं. असो. रामायण हा इतिहास आहे आणि राक्षसांचा व मनुष्यांचा धर्म अभिन्न होता एवढ्या गोष्टी वगळल्या तर महाराष्ट्रियांचें बाकीचें विवेचन चांगलेंच वठलें आहे असें म्हणण्यास प्रत्यवाय नाहीं.

रामायण हें काव्य आहे ह्या मताचा एकदां अंगीकार केला म्हणजे रामायण लिहिण्याचा हेतू काय याची चिकित्सा करितांच येत नाहीं. मैथुनकर्मांत रत असलेल्या एका क्रौंच जोडप्यांतील नराला एका निषादानें बाणानें मारतांना पाहतांच वाल्मीकिऋषींच्या मनोवृत्ती उचंबळून गेल्या व त्याचाच परिणाम म्हणजे रामायणरचना होय. तथापि ज्यानें त्यानें आपआपल्या आंखून दिलेल्या मर्यादेंत राहून कर्तव्यातिक्रमण कोणाऱ्याहि हातून घडूं नये ह्या गोष्टीचें महत्त्व रामायणद्वारा वाल्मीकीनें वर्णिलें आहे असें आम्हांस वाटतें. ही गोष्ट वाचकांनीं ध्यानांत ठेवली तरच रामायणांतील पुष्कळ अवांतर गोष्टींचा उलगडा होणार आहे. राम राज्यावर बसला असतां एकंदर प्रजेला अधिक सुख लाभलें असतें म्हणून त्यानें आपल्या स्त्रीलंपट पित्याची आज्ञा मोडावयास

पाहिजे होती असला युक्तिवाद करणाऱ्यांना वाल्मीकींच्या कृतीचें रहस्यच समजलें नाहीं असें म्हणावें लागतें. राज्यावर बसण्यापूर्वी राम हा जिवंत पित्याचा पुत्र होता. अर्थात् त्या वेळीं पुत्रधर्माचें परिपालन करणें हेंच त्याचें कर्तव्य होतें. 'समाजावर माझ्या कृतीचा परिणाम कितपत होईल,' ह्याचा विचार त्या वेळीं करणें अगदीं अप्रस्तुत झालें असतें. ज्यावेळीं प्रजेच्या सुखदु:खांचा किंवा भावनांचा विचार करण्याची जबाबदारी त्याच्यावर आली त्यावेळेस त्यानें आपल्या राजधर्माचेंहि आपल्या पतिनिष्ठ स्त्रीचा त्याग करून परिपालन केलें. एकसमयावच्छेदेंकरून जेव्हां दोन धर्मांचा विरोध येतो त्यावेळीं कनिष्ठ धर्म सोडून श्रेष्ठ धर्माचाच स्वीकार करावा लागतो हें कोणीहि मान्य करील. रामानें सीतात्याग केला त्यावेळीं त्याच्यापुढें पतिधर्म व राजधर्म असे दोन धर्म पण परस्परविरोधी उभे राहिले. अर्थात् त्यानें स्त्रीविषयक कर्तव्य कमी दर्ज्याचें म्हणून त्याला रजा देऊन अधिक महत्त्वाचें जें प्रजाविषयक कर्तव्य त्याला कवटाळलें यांत आश्चर्य नाहीं. रामायणांतील व्यक्ती आपण होऊन आपल्यावर संकटें ओढवून घेत नाहींत. त्या संकटांतहि धर्मतत्पर असतात एवढेंच. रामाच्या मागोमाग सीता अरण्यांत गेली हें तिचें करणें स्त्रीधर्माला अनुसरून झालें याबद्दल वाद नाहीं. पण लक्ष्मणानें कां जावें हा प्रश्न पुष्कळांच्या मनाला त्रस्त करतो. आणि बंधुप्रेमामुळें लक्ष्मणानें आपखुषीनें अरण्यवास पत्करिला असें म्हणून कित्येक लोक आपल्या मनाचें समाधान करून घेतात. आम्हांला वाटतें कीं प्रेमाचें प्रदर्शन करण्याकरितां वाल्मीकींनीं लक्ष्मणाला वनवास करावयास लावलें नाहीं. कनिष्ठ बंधु "ज्येष्ठवशगो भवेत्" असा धर्म आहे. आणि हा धर्म ओळखूनच लक्ष्मणानें स्वखुषीनें वनवास पत्करिला आणि भरतानें पुढें चालून आलेलें राज्य झुगारून दिलें. "वनवासांत असतांना राक्षसांचा वध करणें हें क्षत्रियांचें कर्म आहे व मी राजा नसलों तरी क्षत्रिय आहे म्हणून राक्षसांचा नाश करून ऋषिजनांना सुखानें यज्ञयाग करूं देणें हें माझें कर्तव्य आहे." हें रामाचें प्रतिपादन घ्यानांत ठेवण्यासारखें आहे. सारांश कर्तव्यनिष्ठा हेंच आमच्या समजुतीप्रमाणें रामायणाचें रहस्य होय. सांप्रतकाळीं ह्या गुणाची आमच्या समाजांत फार मोठी उणीव आहे. आपापल्या कर्तव्याची सीमा ओलांडून दुसऱ्याच्या कर्तव्यक्षेत्रांत अतिक्रमण करण्याची धडपड प्रत्येक व्यक्तीकडून सध्यां केली जात आहे. बाप अमुक रीतीनें वागतो; त्याचें तें वागणें मला रुचत नाहीं, अथवा माझीं मतें माझ्या बापाहून निराळीं आहेत म्हणून पित्याशीं द्रोह करणारे पुत्र आजच्या समाजांत घरोघरीं आढळून येतात. न्यायाधीशाला अधिकारमर्यादा असते. त्याच्याबाहेर जर तो आपला अधिकार चालवूं पाहील तर त्याला कोणीहि तसें करूं देणार नाहीं. तोच न्याय न्यायमंदिराच्या बाहेर लागू पडूं नये काय ? पित्याच्या आचरणावर वा मतांवर टीका करण्याचा अधिकारच पुत्राला प्राप्त होत नाहीं. जी गोष्ट पितापुत्रांची तीच पतिपत्नींची. कुटुंब सोडून सार्वजनिक कामांतहि हा नियम पाळणें अत्यंत अवश्यक आहे. गांधी-नेहरूंसारखे देशहितनिष्ठ पुढारी जिवंत असतां केवळ त्यांच्या मताशीं

आपलें थोडेसें जुळत नाहीं एवढ्या सबबीवर बंडखोर बनलेल्या तरुणांनीं वाल्मीकि-रामायणाचें पारायण करावें. हे पुढारी कालवश झाल्यानंतर जेव्हां तुम्ही त्यांचे ठिकाणीं स्थानापन्न व्हाल तेव्हां तुमचीं मतें तुम्ही आचरणांत आणा असें या देशप्रेमी तरुणांना समजावून द्यावयास वाल्मीकिरामायणाचें वाचन अत्यंत उपयुक्त होईल.

याप्रमाणें कर्तव्यनिष्ठेचें महत्त्व रामायणद्वारा लोकांच्या मनावर बिंबविण्याचा प्रयत्न वाल्मीकींनीं केल्यामुळें जरी हें काव्य एवढें वंदनीय झालें असलें तरी इतर अनेक कारणांनीं सुद्धां रामायणाला एक प्रकारचें वैशिष्ट्य प्राप्त झालें आहे. ह्या काव्याचें पर्यवसान दुःखांत झालें आहे ह्या गोष्टीकडे मुख्यत्वेंकरून वाचणाराचें लक्ष्य तात्रडतोब वेधतें व त्याबरोबर ह्या ग्रंथाचें प्राचीनत्वहि आपोआपच सिद्ध होतें. रामायण व भारत यांमध्यें बराच काळ लोटला असून रामायण आपणांला वेदकाळाच्या जवळ नेतें अशी आमची समजूत आहे. वेदकालीन अग्नि-उपासना रामायणकालीं प्रचलित होती. आणि मूर्तिपूजेचे जरी ओझरते उल्लेख क्वचित् असले तरी हल्लींच्या स्वरूपांत मूर्तिपूजा तेव्हां नव्हती यांत शंका नाहीं. तसेंच रामायणांत विद्यमान कालांतील देवतांपेक्षां वेदांतील देवतांचाच उल्लेख अधिक येतो. शिवाय स्त्रियांचें वेदाध्ययन, बौद्ध धर्माच्या उल्लेखाचा अभाव, सहगमनाच्या चालीचा मागमूसहि नसणें व ब्राह्मण वर्णाचा मांसाहार ह्या गोष्टी रामायणाचें पुराणत्वच सिद्ध करितात. इतकें प्रास्ताविक विवेचन केल्यानंतर समालोचनेचें पृष्ठशः परीक्षण करण्यास आपण आतां सुरवात करूं.

ह्या ग्रंथाला 'केसरी'चे सहसंपादक श्री. जनार्दन सखाराम करंदीकर ह्यांनीं एक उत्कृष्ट प्रस्तावना लिहिली आहे. ह्या प्रस्तावनेंत श्री. करंदीकर ह्यांनीं मूळ ग्रंथांतील अनेक वादविषयक स्थलांचा ऊहापोह मार्मिकपणें केला आहे. मूळ ग्रंथाचें परीक्षण करितांना पुढें जरूर त्या ठिकाणीं प्रस्तावनाकारांच्या मतांचा उल्लेख आम्हांस कदाचित् करावा लागेल. पण सध्यां येथें आम्हांस एवढेंच सांगावेंसें वाटतें कीं रामायणाला भारत व भागवत यांच्या पंक्तींत बसविण्यांत श्री. करंदीकर यांची चूक झाली आहे. भागवत हें पुराण आहे. पुराणाचें गमक सर्वथैव त्या भक्तिप्रधान ग्रंथास लागू पडतें आणि भारत हा इतिहास आहे हें प्रत्यक्ष भारतावरूनच दिसून येतें.

'इतिहासमिमं विप्राः पुराणं परिचक्षते' ( महाभारत १–१२ )

आणखी रामायण तर काव्य आहे हें आम्ही पूर्वींच विस्तृत रीतीनें प्रतिपादन केलें आहे. महाभारताला काव्य ही संज्ञा लावितां येईल काय ? म्हणून ह्या दोन ग्रंथांत स्वरूपतःच भेद आहे असें आम्हांस वाटतें. तसेंच "रामायण हा ग्रंथच वैयक्तिक सद्गुणांचा आदर्श म्हणून लिहिलेला आहे" हें म्हणणेंहि आम्हांला अभिमत होत नाहीं. वैयक्तिक सद्गुणांचा आदर्शच वाल्मीकींना दाखवावयाचा असता तर रामाकडून एका शूद्र तपस्व्याचा वध वाल्मीकींनीं करविला नसता. अथवा पतिव्रता अशा गर्भवती सीता अचानक रीतीनें वनांत सोडून तिचा छळहि करविला नसता. वैयक्तिक सद्गुण

दाखविणें हें रामायणाच्या ऐवजीं महाभारताचेंच कार्य होतें.

विस्तरं कुरुवंशस्य गांधार्या धर्मशीलतां ।
क्षत्तुः प्रज्ञां धृतिं कुन्त्याः सम्यग्द्वैपायनोऽब्रवीत् ॥
आदिपर्व अ. १-९९.

आमच्या मतें आरंभींच सांगितल्याप्रमाणें कर्तव्यनिष्ठेचा आदर्श वाचकांपुढें ठेवणें हेंच वाल्मीकिऋषींचें उद्दिष्ट होय. आमच्या ह्या म्हणण्याच्या समर्थनार्थ रामाचेंच उदाहरण घेऊं. वनवासाची अनुचारित आज्ञा पित्याकडून झाल्यावरोबर तिच्या युक्तायुक्ततेविषयीं विचार न करितां रामानें ती शिरसावंद्य केली.

दंडकारण्यमेषोहं गच्छाम्येव हि सत्वरः ।
अविचार्य पितुर्वाक्यं समावस्तुं चतुर्दश ॥ अयोध्याकांड १९–११.

यानंतर 'रामायणाची योग्यता' हें पहिलें प्रकरण लिहून 'महाराष्ट्रीयां'नीं आपल्या समालोचनेचा प्रारंभ केला आहे. रामायणाची योग्यता जो उद्देश पुढें ठेवून वाल्मीकी ऋषीनीं रामायण लिहिलें असेल तो उद्देश ज्या मानानें साधला असेल त्या मानानेंच ठरली जाणार हें उघड आहे. आम्ही वर जें म्हटलें आहे त्याचाच अनुवाद करून पुन्हा असें म्हणतों कीं कर्तव्यनिष्ठेचें उज्वल स्वरूप जगापुढें ठेवणें हाच रामायण लिहिण्यांत वाल्मीकींचा उद्देश असला पाहिजे. कर्तव्यनिष्ठेलाच आम्ही धर्मनिष्ठा म्हणतों. प्रत्येकानें आपआपल्या धर्माप्रमाणें आचरण केलें पाहिजे हीच रामायणाची शिकवणूक होय. यामुळें स्वार्थत्यागाची भाषा अस्थानीं होते असें आम्हांस वाटतें. रामानें धर्माचरण केलें. स्वार्थत्याग केला नाहीं. स्वार्थ असेल तरच त्याचा त्याग करितां येईल. पण मुळांत जेथें स्वार्थच नाहीं तेथें त्याग तरी कोण व कसा करणार ? "पित्राज्ञा पालन करणें हा माझा धर्म आहे. त्याप्रमाणें मी वागलों. ह्यांत कोणताहि स्वार्थत्याग मी केला नाहीं" असेंच रामाला कोणी विचारलें असतां त्यानें उत्तर दिलें असतें. आर्यसंस्कृतीच्या भाषेंत बोलावयाचें म्हणजे मनुष्यप्राणी हा आपलें नियुक्त कर्म करण्यासाठीं जन्मास आला आहे; स्वार्थासाठीं नव्हे. स्वार्थ संपादन करण्याकरितांच जर मनुष्याचा जन्म असेल तर त्यानें स्वार्थाचा त्याग करणें हा मूर्खपणा होय. अशा रीतीनें रामायणाकडे आम्ही निराळ्या रीतीनें बघतों. 'महाराष्ट्रीय' किंवा 'समालोचने'चे प्रस्तावनालेखक यांच्याहून आमचा दृष्टिकोन भिन्न असल्यामुळें त्यांनीं योजिलेली भाषा आम्हांला साहजिकच पटत नाहीं. स्वार्थत्यागाची अर्वाचीन हीन ध्येयाची भाषा वाल्मीकींना संमत झाली नसती.

"दीनो वा राज्यहीनो वा यो मे भर्ता स मे गुरुः"
अथवा "व्यसनी वा समृद्धो वा गतिरेष तवानघ
एष लोके सतां धर्मो यज्ज्येष्ठवशगो भवेत्" ॥

ह्या वचनांतील ओजस्विता स्वार्थत्यागाच्या भाषेंत आढळेल काय ? स्वार्थत्याग हा धर्माचरणाचा परिणाम असूं शकेल. परंतु तो आर्यांच्या कर्मांचा हेतू होऊं शकत नाहीं.

कारण धर्माचरण हें अहेतुक असतें. सारांश आमच्या मतें स्वार्थत्यागाचा कळस नव्हे तर कर्तव्यनिष्ठेची परमावधी वाल्मीकिऋषींनीं आपल्या काव्यांत करून दाखविली असल्यामुळें रामायण हें काव्य फार मोठ्या योग्यतेस पोंचलें आहे.

'रामायणकालीन लोकस्थिति' ह्या दुसऱ्या भागांत रामकालीन राजसत्तेचा ऊहापोह 'महाराष्ट्रीयां'नीं केला आहे. त्याचा मथितार्थ इतकाच कीं विद्यमान काळीं ज्याप्रमाणें लोकांच्या हातीं सत्ता आहे त्याप्रमाणेंच रामाच्या वेळींहि ती प्रायः होती. म्हणजे राजा हा फक्त अंमलबजावणी करणारा अधिकारी असून तो प्रजेच्या नियंत्रणाखालीं असे. ग्रंथकाराच्या ह्या मताला रामायणांत अगर इतरत्र आधार मिळेल असें आम्हांस वाटत नाहीं. लोकसत्ताक पद्धति उत्कृष्ट आहे असा प्रथम ग्रह करून घेऊन आमच्याकडेहि ती पूर्वीं प्रचलित होती असें प्रतिपादन करण्याचा मोह पुष्कळदां आवरत नाहीं हें खरें आहे. आमचा अभिप्राय असा आहे कीं प्रत्यक्ष राज्यकारभार प्रजाजनांच्या हुकमतीखालीं आमच्याकडे कधींच नव्हता व तसें असणेंहि इष्ट नाहीं. अलीकडील राजांप्रमाणें राज्य हें आपल्या खासगी मालकीचें आहे अशी मात्र आपल्या प्राचीन राजांची समजूत नव्हती. लोकांच्या इच्छेप्रमाणें आणि त्यांच्या सुखाकरितांच राज्यकारभार करणें हा राजाचा धर्म आमच्या इकडील राजपुत्रांना बालपणापासून शिकविला जात असे. प्रजेच्या कल्याणाव्यतिरिक्त राजाला दुसरें कर्तव्य नाहीं. प्रजेचें हित तेंच राजाचें हित ही गोष्ट राजपुत्रांचे मनावर बिंबविण्याचा आमच्या धर्मशास्त्रांचा कटाक्ष होता आणि म्हणूनच

"स्नेहं दया तथा सौख्यं यदि वा जानकीमपि
आराधनाय लोकानां मुञ्चतो नास्ति मे व्यथा ॥"

अथवा "क्षत्रियैर्धार्यते चापो नार्तशब्दो भवेदिति ।"

अशा प्रकारचीं सुवचनें फक्त संस्कृत वाङ्मयांतच आढळून येतात. लोकसत्ताक राज्यपद्धतींत राजा प्रजेचा नोकर असतो. त्याच्या मुखांतून उपरिनिर्दिष्ट उद्गार निघणें संभवनीय तरी कसें होईल? रामायणांत जानपद सभा भरवून लोकांची संमति घेतल्याचें एकच उदाहरण आहे. व तें रामाच्या यौवराज्याभिषेकासंबंधींच होय. ह्याशिवाय दुसरें उदाहरण नाहीं. म्हणून एका उदाहरणावरून प्रजेचा दाब राजसत्तेवर होता हें अनुमान मुळींच निघत नाहीं. पित्याचा शब्द वृथा जाऊं नये म्हणून वनवास भोगणें रामाला प्राप्त होतें. एवढ्याकरितां रामानेंच राज्यावर बसलें पाहिजे असा आग्रह पौरजानपदांना धरतां येईना. हें जरी कै. रा. ब. महाजनी यांच्या आक्षेपास बिनतोड उत्तर असलें तथापि त्यानें राज्यकारभारावर प्रजेचें नियंत्रण कसें सिद्ध होतें हें आम्हांस समजत नाहीं. आणि दशरथाची सभा हा एक प्रकारचा दरबार होता. आणि तो भरविण्याचा हेतू कदाचित् राज्यारूढ होण्याला लोकांची अनुमती असावी एवढाच असावा. कोणत्याहि स्मृतिग्रंथांत अशा कार्याकरितां प्रजेची संमति घ्यावी असें सांगितलें नाहीं. पण वैदिक आर्यांची ही रीत असावी असें अनुमान करण्यास जागा आहे.

"त्वां विशो वृणताम् त्वामिमाः प्रदिशः पञ्च देवीः"

असा एक अथर्ववेदामध्यें (३-४-२) मंत्र आहे. त्याचा अर्थ हे राजा तुला लोक निवडोत, तुला ह्या दैदीप्यमान पांची दिशा निवडोत असा आहे. मंत्रांतील प्राचीन कल्पनेला अनुसरून दशरथानें रामाच्या यौवराज्याभिषेकाच्या पूर्वी लोकांची सभा भरविली असावी. रामायण हें वैदिक कालाच्या जवळ जवळ आहे हें आमचें मत आम्ही पूर्वींच प्रदर्शित केलें आहे. महाराष्ट्रियांनीं आपल्या मतसमर्थनार्थ लोकसभेनें रामाच्या गुणांचें केलेलें वर्णन उद्धृत केलें आहे. परंतु त्याच्या अनुपयुक्ततेखेरीज तो सर्व भाग प्रक्षिप्त असावा असा आम्हांस संशय येतो.

"इति तद्वचनं श्रुत्वा राजा तेषां मनःप्रियं" येथपासून पुढील दुसऱ्या अध्यायांतील सर्व श्लोक प्रक्षिप्त मानण्याला प्रबल कारणें आहेत. मी आतां वृद्ध झालों आहें, मला आतां राज्यकारभाराची दगदग होत नाहीं; विश्रांतीची अवश्यकता आहे म्हणून मी रामाला राज्यावर बसवून निवृत्तकार्य होतों. (जीर्णस्यास्य शरीरस्य विश्रांतिमभिरोचये । सोऽहं विश्राममिच्छामि पुत्रं कृत्वा प्रजाहिते ॥) हें दशरथानें सांगितलेलें कारण अगदीं योग्य असल्यामुळें पुन्हा दशरथानें प्रश्न विचारण्याचें वस्तुतः कारण नव्हतें. आणि यदाकदाचित् असा प्रश्न दशरथानें विचारला असता तरी प्रजाजनांकडून "हे राजा, तुझा आतां वृद्धापकाळ झाला आहे व रामहि तुझ्यासारखाच प्रजाहितदक्ष आहे" एवढेंच उत्तर द्यावयास पाहिजे होतें. ही रामाच्या गुणांची यादी एवढी विस्तृत आहे कीं रावणवधानंतर अयोध्येला परत येऊन अनेक वर्षें राज्य केल्यावरहि वरील गुणांत अधिक भर घालतां आली नसती. दुसऱ्या सर्गांतील हा भाग प्रक्षिप्त आहे असें महाराष्ट्रियांनां वाटत नाहीं. परंतु आम्ही त्याला प्रक्षिप्तच मानतों. ह्या प्रक्षिप्त भागांतील एक वाक्य मात्र उत्कृष्ट वक्तृत्वाचें निदर्शक आहे हें जातां जातां येथें आम्हांस सांगावेंसें वाटतें. तें वाक्य असें:—

शक्तस्त्रैलोक्यमप्येष भोक्तुं किं नु महीमिमाम् ।

असो. कितीहि पराक्रमी पुरुष असला तरी एका माणसाच्या हातून राज्ययंत्र चालणें शक्य नसल्यामुळें धर्मशास्त्रकारांनीं राजानें अष्टप्रधान सहाय्यास घ्यावे असा निर्बंध घातला आहे. उदाहरणार्थः मनू म्हणतो— अपि यत्सुकरं कर्म तदप्येकेन दुष्करं । विशेषतोऽसहायेन किन्तु राज्यं महोदयम् ॥ (अ० ७–५५) आणि म्हणूनच

"सचिवान् सप्त चाष्टौ वा प्रकुर्वीत परीक्षितान्" ७-५४

ह्यावरूनच हल्लीं ज्या अर्थानें आपण प्रजासत्ताक राज्यपद्धति समजतों त्या अर्थानें ती रामायणकालीं नसली पाहिजे असें सिद्ध होतें.

आतां एवढें खरें कीं राज्ययंत्राचें चक्र चालविण्याला जरी प्रजेचा हात लागत नसला तरी राजसत्तेचा उगम प्रजेमध्येंच आहे ही जाणीव होती. आणि म्हणून जेव्हां जेव्हां राजसत्तेच्या दुरुपयोगाचा अतिरेक होई तेव्हां तेव्हां विष्णुसमान मानल्या

जाणाऱ्या राजाचें देहावसान करण्यासहि प्रजेनें कमी केलें नाहीं. शिवाय धर्मरक्षण करणें हें राजाचें मुख्य कर्तव्य असल्यामुळें राजाच जेव्हां धर्माप्रमाणें वागत नाहींसा होतो तेव्हां अशा राजाचा समूळ नाश केल्यावांचून प्रजेला गत्यंतरच नसतें. अशापैकींच वेन राजाचें उदाहरण आहे. पण असल्या उदहरणांवरून उपसंहर्ते भलतीच अनुमानें काढतात असें आम्हांस वाटतें.

याच्यापुढचें लोकशिक्षण आणि विचारस्वातंत्र्य ह्या विषयांवरील विवेचन सोडून दिलें तरी रामायणकालीन लोकस्थितीचें त्यानंतरचें वर्णन फारच उत्कृष्ट वठलें आहे. पण आपण वर्णव्यवस्थेकडे वळलों म्हणजे तद्विषयक महाराष्ट्रियांचें विवेचन अपुरें झालें आहे असा संशय येतो. एक सुंदर काव्य म्हणून रामायणाचें महत्त्व जरी फार मोठें असलें तरी ह्या ग्रंथाला अवांतर गोष्टींमुळें ऐतिहासिक महत्त्व त्याच्याहूनहि अधिक प्राप्त झालें आहे. ही गोष्ट महाराष्ट्रियांच्या मनावर बिंबावी तशी बिंबलेली दिसत नाहीं. ऋग्वेदकालीं पुरुषसूक्तावांचून चार वर्णांचें अस्तित्व आढळून येत नाहीं. एवढेंच नव्हे तर पुरुषसूक्तरचनाकालीं सुद्धां चार वर्ण असले तरी चातुर्वर्ण्य नव्हतें. चातुर्वर्ण्याचा खराखुरा अंमल फारच अल्पकाल असला पाहिजे. कारण महाभारतामध्यें अनेक संकर जातींचा उल्लेख आहे; आणि संकर जातींचें अस्तित्व चातुर्वर्ण्याला विघातक होतें. तेव्हां ऋग्वेदकाल आणि महाभारतकाल ह्या दोन सीमांच्यामध्यें चातुर्वर्ण्याचा अंमल पूर्णत्वानें जर कधींकालीं चालू असेल तर असला पाहिजे. अशा काळच्या लोकस्थितीचें चित्र वैदिक वाङ्मयापेक्षांहि आपणांस फक्त रामायणांतच पहावयास मिळतें. आणि त्यामुळेंच इतिहासकाराला ह्या ग्रंथाचें महत्त्व अतिशय वाटतें. दशरथाला तीन वर्णांच्या तीन स्त्रिया होत्या आणि हेंच चातुर्वर्ण्याचें मुख्य लक्षण होय. चार वर्णांना चातुर्वर्ण्यानें एकत्र केलें. एका वर्णाचे चार वर्ण झाले ही कल्पना आम्हांस मानवत नाहीं. चातुर्वर्ण्यामुळें अनुलोम पद्धतीनें बेटीव्यवहार व विलोम अनुलोम पद्धतीनें रोटीव्यवहार परस्परांत होऊं लागला. असा प्रकार चालू असतां वर्णसंकर होणेंच अशक्य होतें. स्मृतिकारांनीं असवर्णविवाहाचा निषेध केला तेव्हांच निरनिराळ्या जातींचा उद्भव झाला. महाभारतांत वर्णसंकराविरुद्ध मोठा कटाक्ष आहे हें सर्वश्रुतच आहे. मनूनें तर ब्राह्मणक्षत्रियांनीं आपत्कालीं सुद्धां शूद्र भार्या करूं नये असें स्पष्ट म्हटलें आहे.

न ब्राह्मणक्षत्रिययोरापद्यपि हि तिष्ठतोः
कस्मिंश्चिदपि वृत्तान्ते शूद्रा भार्योपदिश्यते ॥ (अ० ३-१४)

ह्या धर्मशास्त्राच्या विरुद्ध शूद्रा स्त्रीशीं विवाह करण्यांत दशरथाचें वर्तन झालें असें म्हटलें पाहिजे. पण दशरथाला ह्या बाबतींत कोणीहि दोष दिलेला नाहीं. अर्थात् स्मृतिकारांचा निषेध रामायणकाळीं नव्हता हें यावरून सिद्ध होतें. ह्या निषेधानंतरहि ब्राह्मणक्षत्रिय हे शूद्र कन्येशीं विवाह करीत असावे. तथापि दारकर्माकरितां अशा स्त्रीची योजना होत नसे. मनूनें म्हटल्याप्रमाणें त्यांचा उपयोग कामतृप्तीकरितांच होय.

११४

प्रमाणे चालते केले त्याची वहिवाट आजपर्यंत भोगवटा चालत असे कलम
१ देशमुख अधिकारी देशपाडे कुलकर्णी सदरहु वतने येकाची याणी चाकरी करावी
१ माहाल मजकूरची रयेत हरयेक विसी तजावजा झाल्यास दिलदिलासा होऊन कीर्द मामुरा करावी कलम
१ जमाबंदी संमधे ऐन जिनसी व वजनी व नख्ती बाबेची सरकारातोन पहाणी अगर वैवी जमाबदी जाहाली तरी आमचे विद्यमाने होते त्या समंधे कागदपत्र जमा बंदीचे लिहिणे
१ पेंढे व कारसाईचा जावता करणे तो आम्हीं करून देतो कलम
१ माहाली जबान्या घेणे त्या आम्ही लिहितो कलम
१ सरकार समंधे जमेदार प्रकर्णाचा कागद लिहिणे तो आम्हीं लिहितो
१ जमाबदी पाहाणी हरयेक विसीची होईल त्याजबराबर आम्ही जाऊन वाजवी सरकारचे नुकसान न होता व रयतेवर जलेली न होता वाजवी करावी पाहाणी खर्डा वगैरे जमाबंदी संमधे आम्ही घालितो ताहुल पैसे जमा होतील ते निमे सरकार व निमे आम्ही कलम
१ माहाली व सुभा हुजूर रयेत समधाचा जावसाल आम्ही करितो कलम
१ माहाल मजकुरी हरयेक गावी रयेतावा नाही येविसी सरकारात आम्हीं बोलणे करून लावणी संचणी करून वसाहात करावी कलम
१ सरकारातून जमाबंदी होते ते समई दार नादार व उतम मध्येम कनिष्ठ जमीन जसी असेल तसी वास्तविक असल ते सरकारात बारिक मोठे समजवणे ते आम्ही समजाऊन बोलतो आणि समजावितो कलम
१ ऐन जिनसी अथवा नख्ति व मख्ता रयतेस देणे तरी ती चिठी माहालाकडून देणे ती देशपाडे कुलकर्णी याणी ल्याहावी आणि मजुमदार याणी तारीख घालून हावलदार याणी मोर्तब करून पावतीवर खाली सही करावी नंतर घ्यावी
१ चिठी कसाला माहालाकडून होणे तो आमचे विद्यमानें होतो ती चिठी देशपाडे कुलकर्णी याणी ल्याहावी

---

१ सरकारातून सनदपत्र लावणी सचणी व हरयेकविसी माललेदार सुभास आले म्हणजे यास हुजूरचे पत्र जमेदार याचे नावे देतात ते देशमुख देशपाडे याचे नावे कलम
१ सरकारातून जमाबंदी आगर लावणी सचणी होते ते समई जमदार यासी शेला पागोटी देतात सरकारातोन विडा मान देतात कलम
१ जकाती समधे कलमें माफ जमादार यास कलमे

१ वटकी गुलाम व घोडे व म्हशी बैल उट वगैरे घेतले अथवा दिल्हे त्यास पाल आहे
१ हरयेक लग्न प्रयोजन व घरखर्चास कापड वगैरे जिनस आणिल्यास जकात माफ कलम
१ दाणा गला वगैरे घेतला अगर फरोख्त दिल्हा त्याची जकात माफ

३

१ आमचे खुद धार गावगना आहेत त्यास पेंढे व कारकुनी साजिलवार माहाल खर्चे पाल असे कलम
१ देशमुख आधिकारी देशपाडे कुलकर्णी टिपणीस पाणसरे सरखोत याचा हुकूम रयतेवर चालतो ती कलमे

१ गावगना व खुलावर ( बुलावर ) मेहेतर व सेटे आहेत त्याणी चाकरीत फरामस्ती करू लागल्यास त्याचे काम त्याचे भाऊबंदाकडे सागोन पुढे ज्याचा तो मस्ती सोडून जामीन दिल्ह्यास याचे काम त्याजकडे सागतो कलम

१ माहार वतंनदार गावगना आहेत त्यार्णी चाकरीस फरामस्ती केली आसता त्याचे माहारकीने काम त्याचे भाऊबंदास सांगतो आणि त्याजकडील माहारकी बंद करितो पुढे ज्याचा तो फरामस्ती सोडून जामीन दिल्यास त्याचे काम त्याजकडे सागतो कलम

१ गावगना हरकोण्ही धराचे विमले विकू लागल्यास आमचे विद्यमान विकावे अथवा मोडून न्यावे

१ हरयेक जातीचे बाजे वतंदार वगैरे खुला व रयेतराव सरकार कामात किवा वतनदार याचे कामात आगर हरयेक कामात गैर राहा चालला असता त्यास बोलाऊन आणून चौकसी करून तंटा आम्ही चुकवितो तो न ऐके तरी सरकारात जाऊन समजावितो कलम

१ देशमुख आधिकारी देशपाडे कुलकर्णी सदरहू वतने येकाचीच असत रयतेकडून हक लाजिमा पावतो कलम

१ लग्न प्रयोजन हरयेक जातीत जाले असता तेथे मानपान आमचा येतो खोत पाटील याजकडे लग्नाचा शेलापागोटे व नारळ येतो व जेवणी ज्या असाम्या असतील त्या घेतो कलम

१ दतविधान म्हणजे धर्मपुत्र हरयेक यातीत घेतात ते समई आम्हास येथा सामर्थे शेलापागोटे देतात व जेवण घेतो

१ गावगना देवस्थाने अगर जिर्णोधार अर्च्या जाल्यास तेथे आम्ही जाऊन देवाच्या मुहुर्ती सिंव्हासनास वसवितो आणि मानपान करणाराही करावा आणि घ्यावा

१ गावगना जत्रा भरते ते समई आम्हास बोलाऊन नारळ व मानपान देतात कलम

१ कसवे नाते येथे श्री. **रवलनाथ** याची जत्रा पौष शुद्ध १५ पोर्णिमेस येक दिवस भरते तेथे माहाडकर वगैरे उदमी दुकानदार येतात त्याजपासून दर दुकानास येक पैशाचा जिनस शेवा म्हणोन घेतो कलम

१ गावगना व किले रायगडास व वाडी पाचाडास व कसवे मजकुरी आठा दिवसी बाजार भरत होता ते समई दुकान पाहून शेवा घ्यावयाचा शिरस्ता चाल होती आलिकडे बाजार भरत नाही सबब शेवा येत नाही कलम

१ घणगर गावगना आहेत त्याची पाहाणी दरसाल होते त्याच्या म्हसी पालवजा होऊन दर म्हसीस सरकारचा रुपाया १ प्रमाणे जो आकार होईल त्याप्रमाणे दर म्हसीस लोणी वजन कचे ००१॥ दीड सेर प्रमाणे आम्ही घेतो कलम

१ तेली याची खुटे गावगना व कसवे मजकुरी आहेत यास दर खुटास तेल वजन कचे ००७॥ प्रो घेतो

१ पानाच्या खाड्या कसवे मजकुरी वगैरे आली असता दर खाडीस पाने विच्याची सुमार ५० प्रमाणे घेतो कलम

१ मासली डोई वोझ्यानी आली असता दर वोझ्यास रुके ०३ व सुकटे आली असता वानगी घ्यावयाची चाल आहे त्या प्रमाणे घेतो व बैल आला असता दर बैलास मासा येक प्रमाणे घेतो कलम

१ हरयेक जिनस कसबे मजकुरी विकावयास आला असता दर वोझ्यास वानगी काही घेतो कलम

१ गावगना रायमाडाची झाडे आहेत त्यास सेताभाताचे कामगतीस व मलणीस माडी लागली असता मण दीडमण परयेत आणावी या प्रमाणे शिरस्ता आहे कलम

१ कमलकाच्या मव्या पहिल्या होत्या हाली रेदवा मकखोदार बाजे माहालातून दारू आणून विकितो त्यास याजवलून दारु कचे वजन ०।० दाहा सेर घेतो कलम

१ गौली व घणगर याच्या चवाठ्यावर माहालास वगैरे सणास दूधघागर दोन घागरी असेल तसे पाहून घेतो

१ गोकुल अष्टमीस दही ठिला येक व भाजी व पानभारा गावगना घ्यावयाचा सिरस्ता आहे त्या प्रमाणे घेतो कलम

१६०

१ गावगना पारध निघोन सावजे मारली आगर वाखे जाहाले असता चर करोन मारले असता आगर सापल्यात सापडोन मारल असता येणे प्रमाणे घ्यावयाचे

१ इवा पाठीवरील येक १ भाक्ष्या तीन ३

२

१ तलाव तली व विहिरी व देवले व मसिदी व घरघरटे व घडी चिरेबंदी बांधू लागल्यास आम्हास विचारून बांधावे आम्ही जागा नेमून देतो कलम

१ लग्न व पाठ खुमाचे होतात त्यास सरकारातून पैका घेऊन आगर पालक चिठी घेतात ती पाल सुधा पान सुपारी दर लग्नास रुपये ।· च्यार आणे प्रमाणे घेतो

१ गावी कुभार आहेत त्याजपासून दर कुभारास येक सिकारा व सक्रातीस खण लागतील तसे आणवितो सिरस्ता आहे लग्नास व मुंर्जास ली(?) असता वही घालावी त्यावद्दल लुगडे चाल खण येक रुपया कुभारास द्यावा कलम

१ ज्या गावी बुरूड आहेत त्यास दर दुकानास सुपे वगैरे सुमारी ३ तीन या प्रमाणे घ्यावयाचा सिरस्ता आहे व कार्य प्रयोजन जाहाले असता येक दिवसापासोन च्यार दिवस परयेत त्यास पोटास द्यावे आणि जे काम असेल ते करावे याप्रमाणे चाल आहे कलम

१ इतर खुमाचे मेहेतर आहेत त्यास कार्य प्रयोजनी आगर हरयेक काम सागितले असता येक दिवसापासून च्यार दिवस चाकरीचे करावे त्या खुमाचे माणसाचे कारण लागल्यास मेहेतर याणी घेऊन येऊन च्यार दिवस परयेत चाकरी करावी त्याचे पोटास द्यावे लागते कलम

१ चाभार याजकडून गावगना दर दुकानास जुती जोडे

१ जोडा सुमारी

२ जुती दोन

३

सदरहू प्रमाणे घ्यावयाचा सिरस्ता आहे कलम

१ कार्य प्रयोजन आम्हाकडे जाहाले असता गावगनाचे पाटील व माहार यास ताकीद करून वेठे व शाखभाजी पानभार व करकारसाई आणावयाचा सिरस्ता असे व वाजे माहाली लग्न गेले असता वेठे गावगना दोन तीन प्रमाणे बरावर न्यावयाचा सिरस्ता आहे कलम

१ गावगना हरयेक जातीत गोताई जाहाली असता आम्हास विच्यारून आम्ही जोसी यासी परवानगी सागतो तेथे व आम्हास येथे सामर्थे सेलापागोटे अथवा नारळ पानसुपारी देतात त्या प्रमाणे सिरस्ता आहे कलम

१ गावगना कसबे मजकुरी माहार आहेत त्यास हरयेक चाकरी व कागदपत्र न्यावयास सागितल असता नेत असतो त्याचे पोटास द्यावे लागते कलम

१ गावगना व कसबे मजकूरच्या वेठी दरगावास सालीना ३ प्रमाणे घेतो आणि पोटास मात्र देतो सदरहू वेठीची ताकीद माहार पाटील याणी करून सेतावर वेठी आणून खपवावी कलम

१ वरसातीचे दिवसी वगैरे कारसाई दरगावास सालीना

२ विरली सुमारी

१ दसऱ्यावदल कोवडे सुमारी

१ तवसी काकड्या सुमारी

१ भोपले

१ फारादे सुमारी १५

१ दसरेवकरा बदल रुपया १॥

६

सदरहू प्रमाणे चालत आहे

१ गावगनाचे जमाबंदीचे तेरीज कुलारग वरधाऱ्याचे करून देतो आणि दरगावास येक रुपया घेतो

१ काथाची चूलदाने माहाल मजकुरी नाहीत जाहाली असता दर चूलदानास कात वजन ००७॥ प्रमाणे घ्यावयाचा सिरस्ता आहे

१ हक घ्यावयाचा सिरस्ता आहे ऐन जिनसी व वजनी जमाबंदी होईल त्याजवर दरखडीस ०१॥ प्रमाणे कलम

१ नख्ती जमाबंदी होईल त्याजवर नख्त दररुपयास ०–॥ दिड आणा प्रमाणे घ्यावयाचा सिरस्ता आहे घेतो

१ खंड गुन्हगारी जाहाली असता दर सेकडा साडेसात रुपये प्रमाणे घ्यावयाचा सिरस्ता आहे कलम

१ जकातीवर दरसेकडा रुपये ५ प्रमाणे घ्यावयाचा सिरस्ता आहे

१ इनामगाव पैकी खंड गुन्हेगारी जाहाली असता इनाम तिजाइ सरकार हिसा वजा करून बाकी दोन हिसे आमचे हावाली सन समान इशरीनापासोन खंड गुन्हेगारी होत नाही कलम

१ गावगना डोहास माज घालून मासे मारितात त्याणी माक्षी आणून द्यावी कलम

१ बकरीमाच ज्या गावी असतील त्या माचीस बकरा येक घ्यवयाचा सिरस्ता आहे कलम

१ गुजरवाणी वगैरे दुकानदार आहेत त्याणी दररोज दुकानास पानसुपारी व तबाखु पैशामार द्यावा व दसरा दिवाळी वगैरे सणा मिलोन नारळ व गुळ येक सेर द्यावा कलम

१ कागदी कागदकुटया कसबे मजकुरी आहे त्याजपासून उदमाची आमदानी पाहून दर कागद

१ देशमुख आधिकारी पुडके १ १ देशपाडे कुलकर्णी पुडके १

२

गडी येक घ्यावयाचा सिरस्ता आहे

१ किले रायगडास व कसबेवाडी व कोट पाचाड येथें दसऱ्यावदल व चैत्री पौर्णिमेस देवस्थानास ठाणगाव बकरी व कोबडी देतात त्यास आम्ही जाऊन घ्यावे ते

१ जे वाणी जमदार किल्यावर जातील त्यास सरकारातून देतात

१ बकरे येक व कोबडी २ दोन

१ ठाणग्याचा विभाग

१ विवा येक १ माक्षी येकूण दोन भागाचा मान काढतात

१ मदार साहेब किले रायगड पीरदरगा आहे त्याचे उरस भरतात तेथें आम्हास जेवण आसाम्या जातील त्यास नारळ २ व मानपान आहे + + + + + +

१ मुसलमान लोक याचपासून ताव निकाशादि जाल्यास आम्हास बोलाऊन नारळ मानपान विडा देतात कलम

१ गावचे सेत सिवे शेजारी गावची आगर पर तपेयालगत गाव असल्यास तपसिवेचा तंटा पडल्यास हरदू गावातून कोण्ही खोत सरकारात फिर्याद अल्यास सरकारातून भले माणूस कोण्ही वजनदार देशमुख आधिकारी देशपाडे कुलकर्णी बरोबर देऊन सिमेवर रवाना करावे तेथून त्याही जे सिवे सेजारी पडोसी पाहून गावचे खोत पाटील व माहार व माहातारे कुनबी असल्यास त्यास आणून सीव हरदू गावचे पाटील व माहार याणी दाखवितील त्याच्या वाटा खुणा मुदा पाहून निवाडा करून सरकारात येऊन समजवावे आणी गावास निवाडापत्र सरकारातोन करोन द्यावे तंटा पडला ते साली निवाडा न जाल्यास तेथील तंट्याचे उत्पन्न जो परयेत सिमेचा तंटा चुकोन निवाडा होई तो सरकारात जफ्तीस ठेऊन उत्पन्न अमानतीकडे ठेवावे सरकार तर्फेनी जमदार जातील त्यास पोटखर्च खोतानी द्यावा कलम

१ जमेदार यार्णी दत्तपुत्र आपले भाऊबंदाचा घ्यावा त्याचा नसल्यास गोत्रजाचा घ्यावा तो नसल्यास अफलादीचा घ्यावा तो नसल्यास परकी घ्यावा आपले वौशातील वौश चालत आहे तरी भाऊबंदाचा घ्यावा भाऊबंदाचा येक पुत्र आहे तरी दुसरा घेऊ नये भाऊबंदास पुत्र आसून देईना तरी दुसरा घ्यावा कलम

१ जमेदार याजवर सरकारी आपराध असल्यास त्याचे वतन घ्यावयाची चाल नाही अपराधाप्रमाणे पारीपते करावे जार करिता वतनाची जप्ती + + + + त्यास आपराध पाहून दंड घेऊन ज्याचे वतन त्यास द्यावयाची चाल आहे दुसऱ्यास घ्यावयाची चाल नाही वतनदार काही निमित्यामुळे परागंदा जाहाल्यास त्याचे वतन सरकारात ठेवाव त्यास कौलपत्र देऊन त्या वतंदारास वतनावर आणावे आणि त्याचे वतनाची मोकलिक करून वतन त्याचे स्वाधीन करावे दुसऱ्यास द्यावयाची चाल नाही कलम

१ वतंनदार जमेदार तारांवलीमुळे आगर सरकारबाकीमुळे आगर हरयेक कारणामुळे वतन गाहाण ठेवणे जाहाल्यास आपले भाऊबंदास विचारावे त्यांही ठेविल्यास त्याजकडे ठेवावे आगर परकी याजकडे ठेवण्याची चाल आहे आपली तक्षीम फरोख्त देणे जाल्यास भाऊबंदास द्यावी दुसरे कोणास द्यावयाची चाल नाही

१ जमेदार हा आपले वतन खुसीन कोण्ही वारीसदार नसल्यास हरयेक कोण्हास फरोख्त देऊ लागल्यास सरकारातोन त्याजपासून येथा सामर्थे नजर वतनाचे उत्पन्न पाहून त्याचे नावे सनद देऊन वतन चालवावे याची चाल आहे कलम

१ जमेदार वतंनदार याचे मानपान पानावरून अगर होलीपोलीवरून वगैरे मानाचे कारयामुळे कज्या पडल्यास कदीम पासून वहिवाट चालली असल त्याप्रमाणे चालवाव नच ऐकत तरी सरकारात अनामत ठेऊन निवाडा जाहाल्यावर ज्याचे त्याजकडे चालवावे कलम

१ मल्हार जोसी बिन बाल जोसी राईरकर ब्राह्मण देशस्थ **उपनाम अत्रे** याजकडे जोसीपणाचे वृत्तीचे माहाल बारा पैकी वजा माहाल

१ प्रगणे माहाड कोकण पैकी

१ वरघाटी मावले दोन

१ हिरडस मावल येक

१ गुजन मावल येक

२

३

बाकी माहाल हाली वहिवाटीस आहेत.

४ मावळापैकी

१ मोसे खोरे

१ मुठे खोरे

१ कानद खोरे

१ पऊड खोरे

४

५ कोकणापैकी

१ तर्फ नाते

१ तर्फ त्रिरवाडी

१ प्रगणे **कोढवी** व **विन्हेर** व **दुदुसुधा (?)**

१ तर्फ गोरेगाव

१ तर्फ निजामपूर

५

सदरहू माहालची जोसीपणाची वृती चालत आहे त्यास तर्फ मजकूर हा माहाल वडील तख्ताची जागा सबब समाईक जोसी याजकडे ठेविला आहे त्यात ज्याचे साल येते तो चालवितो त्यास

तर्फ मजकूर येथे ब्राह्मण हरजातीचे व प्रभु व सेणवी व पाताने व खेरीज मंडली जोसीपणाचे प्रकर्ण चालवितात इतर खुमाकडे दरोबस्त अधिकारी जोसीपणा ज्याचे जसे कर्म असेल तसे करितात ज्यास जसे सामर्थ असल तसे देतो ते घेतात व माहाली व किले रायगडास तीथ परवणी सागात्री ज्या समई जोसीपणाचे काम लागल्यास जोसी याणी करावे सरकारातून इनाम धर्मादाय नेमणुकी आहेत या खेरीज किले रायगडास देवीचा नेवद सन्याचा करावा त्याची दक्षेणा रुपये नख्त १४॥। पावणे पंधरा सरकारातून दसन्यास पावतात व माहाली पंच्यांग सांगावे त्याची दक्षेणा अर्ध रुपया देतात कलम

१ जयराममट बिन बालमंभट उपाधे राईरकर ब्राह्मण उपनाम इगले याजकडे उपाधिकपणाचे माहाल आहेत त्याचा तपशिल जोसी याचे कलमात सदरी लिहिला आहे त्याप्रमाणे सदरहू नऊ माहालात उपाधिकपणा ब्राह्मण हरजातीचे व प्रभु व शेणवी व पातान याजकडे शुभ अशुभ कर्म चालवीतात ज्यास जसे सामर्थ असेल तसे देतात घेतात कलम

१ गावगना खोत आहेत ते खोतीची वहिवाट करितात येणे प्रमाणे कलम

१ गावात मुख्यपणा खोताचा त्याचे हुकमात पाटील व रयेत व माहार याणी राहून गावचे सेतकीचे कीर्द माहामुरी करावी

१ गावी कुलास कर्जवाम देऊन कुलभर्णा करून गावची लागवड करावी आणि सरकार दस्त असले यांची उगवणी करावी आणि गावचे उत्पन्न घ्यावे नफा तोटा गावसमधे खोताचा

२ कलम

१ गावी कुले आहेत त्याजकडील भटवटे अथवा वेठवा कुल पाहून येक रुपयापासून दीडदोन रुपये परयेत घ्यावा त्यास वेटवा असे म्हणतात

१ कुलाकडून खोतास पावते

| | | |
|---|---|---|
| १ कोबडे | १ कारादे सुमार १० | १ भोपला |
| १ विरले | १ तवसी | १ नागर सुमारी २ |
| २ | २ | २ |

६

१ खोताकडे कार्ये प्रयोजन जाहाल्यास वेठीचे व वेठव्याचे सिरस्ते आहेत त्याखेरीज खपावे व लाबीचे पल्याची तीस कोस परयेत वेठे दर घरास येक आसामीनी करावी कलम

१ गावात परगावाची गुरे राहावयास आली तरी खोतानी वनचराई त्याचे आपले संतोषेन ठरल ती घ्यावी कलम

१ घरचाकर खोत सेत कामावर व गुराकडे घरी कामास ठेविल्यास त्यास घरपटी व वेठे बेगार व कारकारसाई लग्नटका पाटदाम पाल खर्च पडतो ते कलम

१ गावचे सिवेचा लढा पडल्यास सिघेसमंधाने सरकार व जमेदार वगैरे भवरगावचे कोण्ही सीव पाहावयास येतील त्यास त्याचा खर्च खोतानी करावा सीव दाखविणे ती पाटील माहार याणी दाखवावी निमखर्च माहार पाटील याजपासून घ्यावा कलम

१ गावात देवसकी अथवा देव बसवणे आगर जिर्णोधार कर्णे तरी खोत व जमादार याचा हुकूम घेऊन खर्च खोतानी करावा त्यापैकी निमे गावचे पाटील माहार व रयेत याजपासून घ्यावा व निमे आपण खुद खोतान करावा कलम

१ गावचे रान सिवार खोताची सता आहे सिवार आपल्यास लागल तो तोडावा आगर दुसऱ्यास देणे तरी खोतानी घ्यावा सरकार व जमदार यास सिवार लागल्यास खोताचा हुकूम नाही कलम

१ गावात कार्ये प्रयोजन जाहाल्यास नारळ पान विडा जेवणी घ्यावी कलम

१७१

१ सरकारधान्याचे पेंढे खोतकीचे पोहाचवणे ते कुलाही पोचवावे . कलम
१ गावी गयाल कुलाची झाडे आसतील त्याचा भोगभोगवटा खोतानी करावा कलम
१ गावी खुद असल्यास ज्याचे त्याणी सिरस्ते प्रमाणे खोतास घ्यावे कलम
१ गावचे देवास नवस व जत्रा कर्णे ती खोताचे हुकमानी करावी खोतानी मानपान सिरस्तेप्रमाणे घ्यावा कलम
१ सावज वाखे जाहाले असता वतंनदार खोत आहेत त्याणी सावजाची सात येक घ्यावी व भार्क्षी येक कलम
१ गावचे धारेकरी कुले आहेत त्याचे सेत त्यास न पुरवे तरी सदरहू धान्याचा येक साल पडीचा आकार जो होईल तो खोतास देऊन सेत खोताचे स्वाधीन करावे किंवा गाहाण ठेवणे तरी खोताकडे ठेवावे किंवा दुसऱ्यास देणे तरी खोतास विद्यमाने द्यावे तेव्हा बखडा पडल्यास जमदार यास विचारून कर्णे ते करावे कलम

१७

१ खुमाच शेटे मेहेतर याणी खुमाचा कारभार सरकार देण्याचा व जमेदार याचे कारकारसाईचा करावा त्यास घरपटी व मोहोतर्फा व कारकारसाई वेठ बेगार माफ चालते सणाचे दिवशी सरकारातून त्यास मानपान विडा द्यावा
१ गावगना देवपुजारे गुरव वगैरे आहेत याणी जोसी उपाध्ये व देशमुख देशपांडे याजकडे सोमवारी व प्रदोशास आठ दिवशी बेल आणून द्यावा देवाचे इनाम जेथे आहेत ती तो खातो कलम
१ पाटील गावगना आहेत त्यांणी कामे करावी
१ गाव समधे सरकारातून सिपाई येतील त्यास खोत सर सिधा देईल तो उकडून घालावा आणि त्याची बरदास्त राखावी कलम
१ गावसमध्य रयतेचे बोलणे पडल असता खोताजवल बोलोन बंदोबस्त करावा कलम
१ जमेदार याची बरदास्त सरसिधा वगैरे हरयेक कामाची पाटील याणी करावी कलम
१ पाटील यास गावसमधे पावते ते येणे प्रमाणे
१ गावच्या वेठी २ दोन
१ देवाचा नवेद व डाग सिरस्ते प्रमाणे घेतो
१ चाभार गावी आसल्यास जुती २ घेतो
१ होलीस पोली व घटवात वगैरे खुर्दामुदी व मानपान जो घ्यावयाचा तो घेतो कलम
१ सावजाचे फले येक घेतो
१ कुलाकडे लग्न जाहाल्यास येक विडा व वाळु-सणीची वाटी घेतो
१ जकात सिग सिगोटी व लग्नटका पाटदाम व घरपटी कारकारसाई पाल आहे

१ गावगना भगत कोली देवपुजारी वतनदार आहेत त्याणी चाकरी करावी कलम
१ गावचे देवास पूजा करून रयेत कौलपत्र देवाचा खोताचे विद्यमाने घेत जावा कलम
१ सरकारात पानभारे व शाखभाजी व गावापैकी खोतानी पोहाचवावयास सागितल्यास पोचवावी
१ जमेदार गावी आले म्हणजे त्याची बरदास्त करावी व त्याचे वोझे वैगैरे जे आसल ते दुसरे गावी नेऊन पोचऊन द्यावे कलम
१ गावचे खोताची बरदास्त जी पडल ती करावी कलम
१ भगत यास रयतकडून पावते ते

१७२

१ बलुते कुल पाहून पायेली पातून तीन पायेली परयेत घेतो
१ मारा सेताचा दर कुळास १ घेतो
१ देवाचे नेवद सिरस्तेप्रमाणे घेतो
१ सिंगसिगोटी वेठ बेगार कारकारसाई घरघरपटी पाळ आहे व लग्नपाटदाम हि
४ पाळ आहे

१ मुजावर सैदुवलद सजण याणी पीरदरगा मदार साहेब किले रायेगड याचे उरुस वगैरे चाकरी जी पडल ती करावी या समधे मुजावर यास खैरात इनाम जमीन मदार साहेब याचे नावे आहे ती खावी व तर्फ मजकुरी दर घरास सेरापासून आधोली पायली परयेत दाणे घेतो व सरकारातून इदीस उरसाबदल पावते नख्त रुपये ३५८१५

१ मुलना कसबे नाते येथे आहे त्यास खरात जमीन बिघे ०।- पाच पाड मसीदीकडे आहे ती खाऊन मसिदीची बरदास्त करून असतो कलम

१ कृष्णसेट बिन माहादसेट व राघवसेट बिन लक्षीमण सेट पाथरे वाणी सेटे याणी पेठेची वाणी उदमी याची लावणी संचणी करावी उदमी लोक याणी बोलणे ते जमेदार याजवळ बलून सरकारांतून दरोबस्त करून घ्यावा सेट यासी पावते ते

१ घर देणे व मोहोतर्फा पाळ
१ बाजार भरल्यास मुठी पसतव सेत्र
१ मानपान सरकारातून व उदमी याजकडून पावतो विडा सुपारी २
३

१ लग्न मुहुर्त पाटदाम पाळ
१ दुकान पाहून सणाचे दिवसी विडा सुपारी तंबाखु घ्यावा
२

५

१ काजी राईरकर वस्ती मौजे कणसी तर्फ निजामपूर याणी तर्फ मजकुरी येऊन पीरदर्गे याचा उरुस करावा व मुसलमान जातीत शादी वगैरे चालवणे ते चालवावे त्यास जसे अनकुल पडल तसे देतो व किले रायगडास इदीबदल रुपये ४ पावतात कलम

१ चाभार व वतनदार तर्फ मजकुरी आहेत त्याजवर दर दुकानास मोहतर्फा सिरस्तेप्रमाणे आहे व सरकारात व जमदार खोत पाटील माहार याजकडे चाकरी करावी

१ सरकारात
१ दर दुकानास जुती सुमारी २ दोन प्रमाणे
१ माहाली मेहेतर याणी जोडा १ येक द्यावा
१ आधोडी सरकारात लागल्यास येक दोन द्यावे मेहेतर याणी
३



१ जमेदार याजकडे दुकानास
१ जोडा १ येक
१ जुती ३ तीन
१ पेठारा वगैरे मदून द्यावे चाकरी जी पडल ती करावी
३

१ खोतास जुती २ दोन
१ माहारास जुती २ दोन
१ पाटील यास जुती २ दोन
१ तर्फ मजकुरी रयते कडील गुराची चामडी चामार याणी घ्यावी

१ जमेदार याची गुरे मरतात त्याची चामडी चाभार याणी घ्यावी त्याबदल जुती घेतात कलम

१ गावात वाद खिला करून याबदल कुलाकडून चाभार याणी भारा कौली व मलणीवर आधोली पायली दाणे देतात

८

१ मांग तर्फ मजकुरी आहेत त्याणी चाकरी करावी

१ कसबे नाते येथे नवचंडी चालवावी यास गावात रयते कडून भारा कौली व मलणीवर सर आधोली दाणे देतात

१ किले रायेगडास **श्री सिरकावाई** देवीस नवचंडी चालऊन नऊ दिवस गोधळ घालावा त्याबदल सरकारातून पोटास सेर व नख्त रुपये ३ तीन व जुने वस्त्र देवीचे १ येक देतात

१ गावगना तर्फ मजकुरी गोधल कार्ये प्रयोजनाचे घालतात त्याबदल पोटास सेर व नख्त रुपया १ येक देतात तो गोधली घेतो

१ मजरे पाचाड व कसबे वाडीस श्रीदेवाचे नवचंडीचा गोधल येक रोज घालावा .

४

१ थलवाइक कराचे कर गावगना आहेत त्याही जमेदार खोत पाटील याचे जवल रयतेचे बोलणे बोलोन गावची आबादी करावी त्यास घरपटी व वेठ बेगार लग्नटका पाटदाम सिंगसिगोटी झाड माडपान असे व देवाचा नवेद्य१ येक देतात तो घेतो

१ सुतार गावगना आहेत याणी चाकरी करावी

१ सरकारात सालीना किल्यास आथवा माहाली नवे जुने काम करणे तरी आठच्यार दिवस खपावे त्यास सरकारातून पोटास द्यावे

१ गावगना पैकी नागर वगैरे नवे तासून भरावे व हरकाम करावे

१ लोखंडकाम जमदार याजकडे बलुत्या खेरीज विले कोयते व फाल वगैरे हरकाम करावे

१ सुतार यास जमेदार व खोत खेरीज करून रयतेकडून पावते ते

१ बलुते कुलाचे नागर असतील तसे दर नागरास भात कैली ००२ दोन पायेली प्रमाणे

१ मलणीस भात आधोली पायेली पावेतो देतात

सदरहू प्रमाणे व घरपटी वगैरे सिगसिगोटी लग्नटका पाटदाम सुधा पाल आहे कलम

१ परीट याणी चाकरी करावी

१ जमदार वतंदार व पाढरपेशे याजकडे कार्ये प्रयोजन जाहाले असता चाकरी पडल ती करावी व नेहेमीची सनगे धुवावी

१ मराठे लोक वगैरे याजकडे लग्न होतात तेथे पाटे मोडावे

१ सरकारी सनगे धुवावयास आली असता धुऊन द्यावी पोटास काही चाकरी पाहून देतात

१ परीट यास पावते

१ पाढरपेशा लोक कोण्ही पैसे देतात कोण्ही सालाचे बलुते भात आदमण च्यार पायली चाकरी प्रमाणे देतात सेताचा भारा देतात

१ मराठे लोक याजकडून पाट्याबदल नख्त१॥ टके व किरकोल नारल पान जे येईल ते घेतात

२

१ घरपटी सिंगसिगोटी वेट बेगार लग्नटका पाटदाप वगैरे फड फरमास पाल असे
५

१ नाहावी याणी चाकरी करावी

१ गावगना जे गाव ज्याजकडे आसतील याचा मोहोतर्फा यात बे गावी पंधरा दिवसी जाऊन गावात हाजामती कराव्या लग्नचे मोहो करावे

१ दिपवलीस माहाली व किल्यास व जमदार याजकडे जाऊन आगास लावावे जी चाकरी पडेल ती करावी

१ मुसुलमानाकडे मोहो वसुलता करावी

१ नाहावी यास पावते

१ कोण्हा पैसे देतो आगर कोण्ही बलुते भात ००२ दोन पायली देतात

१ भाताचा भारा आथवा कोली देतात रयेतलोक

१ घरपटी वेठ बेगार झाडझाडोरा पाल लग्नटका पाटदाम वगैरे पाल असे

१ सुनते बदल मुसलमान लोकाकडून येक रुपया पासून दोन रुपये परयेत पावतात
४

१ मोहोतर्फाबदल च्यार अण्यापासून आठ आणे परयेत दरगावी देतो
५

१ कुंमार तर्फ मजकुरी आहेत त्याणी चाकरी करावी

१ सरकारात माहाली व किल्यास

१ संक्रातीचे खण ५ मडकी पाच प्रमाणे

१ मडकी सिकारा १

१ घटास गाडु व देव आहेरी वगैरे

१ किले रायेगडास कौलाचे शाकारणीस आठच्यार दिवस जावे त्यास पोटास शेर देतात
४

१ जमेदार याजकडे सक्रातीचे खण व मडकी व घट गाडु व लग्न प्रयोजन जाहाले असता देव आहेरी व वद्या घालाव्या व हरयेक काम पडल ते करावे

१ तर्फ मजकुरी कुंभार याणी मराठे जातीकडे ज्याच्या कुंभार क्रिया आसतील त्याच्या कराव्या त्याजबदल जसे जो देईल ते घेतो

१ घरपटी वेठबेगार लग्नटका पाटदाम वगैरे पाल त्यास आहे
४

१ तर्फ मजकुरी मोस्ते सरदार माणूस व चाकरमाने आहेत त्यास घरपटी वेठ बेगार झाज फरमास माफ आहे पाल कलम

१ माहार गावगना तर्फ मजकुरी आहेत त्याणी चाकरी करावी ती येणे प्रमाणे

१ सरकारचाकरी करावी

१ पाहाणी जिराइती व वजनी व सुमारी वटी पाहा ते समई माहार याणी घेर व सेते दाखवावी वगैरे जी बाब आसल ती दाखवावी

१ गावची रसद माहाली पोहोचती करावी

१ सरकारचे सिपाई यासी हजीर बेगारी पावता जावे

१ गावी हरयेक गुन्ह्याची कलमे आगर मारामार व चोरी दरवडा अगर फिरस्ती स्वारी हर कोण्हाची आल्यास सरकारात बातमी द्यावी

१ अवलसाल तागायेत आखेर साल पावेतो सिरस्ते प्रमाणे राबस्ती करीत जावी त्या राबतीचा पैका जमेस गाबगना लिहिला आहे
१ गावी सरकारची स्वारी आली असता फाटे लाकूड व गवत घोड्यास आणून द्यावें
१ गावची कारकारसाई जी जमा होईल ती सरकारात पोहाचवावी
१ सरकारचा कागदपत्र कोण्ही कडून आल्यास सरकारात पोचवावा
८

१ खोताची कामे करावी ते ताकीद करून
१ गावची वेठ काढून नऊन कामावर खपवावी — कलम
१ वेठांस फाटी व पाने वगैरे लागल ते पुरवावे
१ खोताचे हुकुमात राहून हरयेक कामकाजात अंतर करू नये कामाचा बंदोबस्त राखीत जावा
१ खाते कागदपत्र हरयेक कामाचा होईल तो पोचवीत असावा
१ खोताचे घरी हरयेक प्रयोजन असल्यास ते होईतो पावेतो जे काम पडल ते करावे
१ गावात कुलाचे सेतावर साहाणेपण करणे ते खोत सागेल त्या प्रमाणे करावे
१ गावचे फडावर दास्तानाची राखण करावी फड नीट करावा व कुडण घालावे व गल्याचे माप घेत जावे तेथे फसकी मुठ येत + + +
७

१ जमेदार याची कामे करावी ती रावती सिरस्ते प्रमाणे आहे ती व हरयेक कामकाज पडल ते करीत जावे सदरहू गावात वहिवाट करण ती जमेदार याचे हुकुमाप्रमाणे करावी
१ माहारास चाकरी पडते त्यास रयतेकडून पावत ते
१ भात सेत दर विघा
१ भात कैली ०॥ आदमण
१ सुपे मळणींवर २ दोन
१ भारे सुमारी २ दोन येकूण भात ०॥ कैली
३
१ वरकसी बलुते दर खडीस कैली०॥।१पावते व वरकसी भारा दर कुलास येक प्रमाणे देतात
१ काठाण दरमणी पुंज कैली ००।० येक सेर
१ गावात कुलाकडून दररोज भाकरी पाईण मागतात कोण्ही आर्धी आथवा सगली देतो
१ मयत माणसाचे कपन घेतो
१ गावात लग्न आहाल्यास येसीचा पान मान घेतो जसे समर्थ आहे तसे देतात
१ सरकारातून घरपटी वेठ बेगार कारकारसाई सिगसिगोटी लग्नटका पाटदाम फणस आंबाची झाडे ही कलमे माफ आहेत — कलम
१ गावचे चामाराकडून जुती दोन घेतो
१ गावच्या देवाचे नेवद्य ज्या गावी जसा सिरस्ता आहे तसे चाली प्रमाणे नवेद घेतो
१ गावचे देवास जमदार खेरीज करून कोण्ही बकरे कोबडे याचा नवस दिल्हा असता खुरीमुंढी काही गावी पाटील व काही गावी माहार घेतात
१ गावचे होलीस कोबडे महारानी द्यावे
११

१ धान्याचे सिरस्त कुलानी येणे प्रमाणे चालाते

१ धान्याचा आकार माहाल सिरस्ते प्रमाणे नख्त व ऐन जिनस कुलाचे खुसीस आल्यास खोताकडे अखर साल परयेत फडशा करून घ्यावा खोताचे व कुलाचे न बन तरी माहाली धान्याचा हिशब कुलकर्णी याचे हातून अखर साल परयेत फडशा करून द्यावा माहालाची पोहोच पावती घेऊन खोताकडे रुजू करावी आणि आपले जवल ठेवावी कलम

१ आरधेली कुलानी भात सेत केले असता खोताचे तर्फेन साहाण्या नेऊन भारे मोजून ठेवावे पुढे मलणी काढते समई खोताचा साहाण्या नेऊन उत्पन्न होईल त्याचे बीज वगैरे माहार मगत याचे बलुते काढून बाकी राहिले ते निमेनिम वाटून घ्यावे कलम

१ वरकसी हरजिनसी केल्यास तिजाई प्रमाणे खोताचे समजुतीने अल्यास तिजाई द्यावी + वा नजर मोजणी करून तिजाई भाग करून ठराऊन द्यावा कलम

३

१ घेरा कडसरी किले रायेगड हे रान कसबे वाडी व मौजे वाघेरी व मौजे वाघोली येकूण तीन गावचे रान मागे गावचे गावाकडे होते घेरा राखिला तेव्हां रान तसेच राहिले होते पुढे पेशवे कारकीर्दीत परशराम केशव याचे अमलात घेरा कडसरीचे रान तोडिले याचे उत्पन्न पाहून त्याही घेतले हकदारीचे ऐवजी देशमुख देशपांडे याही डोंगर सेत केली होती ती त्यास दरोबस्त दिल्ही ह्या आलीकडे साल गुदस्ता सन इहिदे पासून कडसरीचे रानात जुजवी कीर्द जाहाली होती त्याचे उत्पन्नाप्रमाणे सरकार जमेस आले आहे कलम

१ तर्फ मजकुरी येथील गावचे उत्पन्न करण्यास खर्च काय लागतो व उत्पन्न काय होते ह्यास तोटा नफा होतो त्याचा सुड येणे प्रमाणे

१ भात सेत जमीन बिघा १ येक येकूण राबणुकीस उनाली खर्चाचा आकार व पावसाली वगैरे

८॥। प्रथम मार्गसीर्ष मासापासून आरंभ करावा तो तरवा तयार होई तो परयेत खर्च

३॥ मार्गसीर्ष मासी गवत काढावयास कामकरी सुमारी ३२ येकूण गवत दर आसामीस मोल्या २॥ प्रमाणे मोल्या ८० दर आसामीस मजुरी पोट सुधा भात ०८२ प्रमाणे भात ·।·।१ येकूण दर १५ प्रपाणे रुपये ४ चार पैकी व जो सेताची गुत सिलक आसेल याची किमत ·॥ बाकी मजूर खर्च रुपये

२॥ कवल तोडावयासी मजुरी आसामी २० येकूण आकार पोटासुद्धा दर आसामी आणे दोन ०८= प्रमाणे रुपये

·॥ गवत तरव्यावर टाकावयास आसामी ४ आकार ०८=प्रमाणे रुपये

१॥ कवल डोंगरातून आणावयास पोटगी सुद्धा

·।- माती पाडावयास आसामी पाच दर आसामीस ०८- प्रमाणे माती कुदल्यान पां।

·।- माती लावावयास येकवेल कामकरी १० येकदर ०॥ आर्धा आणा प्रमाणे आकार

०८= तरवा साखलाण्यास आसामी १ येकूण पोट सुद्धा रोज १ येकूण मजुरी

८॥।

५०३ + साली कीर्द

२०३ नागर व नागरी माणूस पोटगी सुधा मजुरी

०७ पेरणीस नागर १ येकूण

·।।। सेताचे उखलर्णास नागर ३ येकूण दर ।· प्रमाणे
·।। सेताचे वेरणी म्हणजे दुसर तास नागर २ दर ·।· प्रमाणे
·।।।· लावणी चीखल करावयास नागर ३ दर ·।· प्रमाणे

२०≡

३०= लावणीस माणसे सुमारी २५ येकूण दर ०= प्रमाणे
।।= बेणीस माणसे २५ येकूण मजुरी

५।।।≡

·।· माच घालावयास कामकरी २ येकूण ०= प्रमाणे पोटसुधा मजुरी आकार रुपये
१। लार्णास कामकरे १० येकूण दर ०= प्रमाणे पोटसुधा आकार रुपये
·।· लाणी बदल वगैरे नवेद देवस्थानास करावा लागतो त्यास कोबड १ व नारळ व तांबाड वगैरे

१०= मलणीस

।।= आसामी ५ दर ०= प्रमाणे
·।। देवास नवेद कोबडा नारळ वगैरे खर्च

१०=

+ + ।·

१०। सरकार देणे दर बिघा भात

खंडी

·।। प्रत गाव १३ दर बिघा
·।३ प्रत गाव १७ दर बिघा

।।।३

पैकी निमे भात दस्त

·।४ ऐन नऊ मण
०।।=। हकदारी

१४।।=।

आकार हकदारी सुधा

१।।।·।।। गलेपटी दर खंडीस रुपये ४ प्रमाणे
०– कागद दाहा ०=।। प्रमणे
६।।।– तसर भात ।३।।–। दर १४ प्रमाणे
।।।= नमणुकी भात वर्तल्या सुधा ०।९०१ दर १६ प्रमाणे
०=। पोतदारी
०≡।। साजीलवार
०≡।। माहाल खर्च
०= पेंढे सुमार २५ येकूण

+ + +

यास उत्पन्न

१७८

१६॥ भात दर बिघा उत्पन्न
१॥ उतम बिघा ०१ येकूण पीक
१। मध्यम बिघा ०१ येकूण
१ कनिष्ट बिघा ०१ येकूण
३॥।

पैकी सरासरी तिसरी तक्षीम भात खंडी १। पैकी वजा खर्च
०२ सेतास बीजे
०१ ऐन पेरावयास घेतले
०१ वाढ दुपटी प्रमाणे सिरस्ता
०२
०१ बलुते माहार वगैरे
०३

बाकी भात १०- खंडी
दर खंडीस रुपये १५ प्रमाणे आकार रुपये
३ पेंढे सुमारी ६०० दर सेकडा २०० प्रमाणे
+ + +
+ + + + तोटा रुपये ८।-
+ + + जमीनीस दर बिघा ०१ येकूण आकार

खर्च रुपये

१ नागली माल जमीन बिघा १ यासी तरवे ३ भाजावे लागतात त्यास खर्च रुपये
१॥ कवल तोडून भारावयासी मजूर आसामी १२ दर ०- प्रमाणे पोटगी सुधा
३॥। गवत मोळ्या सुमार ६० येकूण आा दर ०= प्रमाणे पोट सुधा
०॥। तरव्यावर गवत घालावयास आसामी + प्रमाणे तीन तरव्यास मजूर ६ येकूण प्रमाणे मजुरी खर्च पोट सुधा रुपये
।- माती लावावयास व तरवे साकलावयास मजूर येकवेल १२ दर ०॥ प्रमाणे
।- कवल फोडून तरवा करावयास आा ३ येकूण मजुरी दर ०- प्रमाणे
१।- नागरकीस नागर माणसा सुधा
०= पेरणीस नागर ०॥ व माणूस येकूण आकार
०॥ जमीन प्रथम घ्यावयास नागर २ येकूण दर ०।० प्रमाणे
।= बेरणीस नागर १॥ येकूण
।= आवठाण्यास नागर १॥ येकूण
१।-

१॥ नागली आवठावयास माणसे १२ दर ०- प्रा
२॥ बेणीस माणसे २० येकूण दर ०- प्रा
०॥= बाधून साठवावयास आा ५ येकूण
१ कापणी लाणीस माणसे ८ दर ०- रुपये
०- माची घालावयास १ येकूण

१। मळणीस कामकरी ८ व नवेद ·।· येकूण

·।· खल काढावयास

१५।=॥

५०= सरकार व हकदार याचा आकार कैली ०३॥। येकूण रुपये

२०॥·॥

यासी उत्पन्न नागली ·॥। पैकी वजा वलुते वगैरे नागली ०।॥ बाकी नागली ·॥४।. खडी येकूण दर खडीस रुपये २० प्रमाणे १४। बाकी रु० तोटा सेतकीस येतो विघ्यास ते ६।·॥ रुो

१ नागली डोंगर सेत पड जमीन बिघा ०१ यास खर्च

२॥ डोंगर तोडावयास माणसे २० दर ०= प्रमाणे पोटगी सुधा रुपये

·।· डोंगर साखलावयास माणसे ५ येकूण

·।· बीज नागली ०।· येकूण किमत

५ गवत बेणावयास ४० माणसे चीपाव व बीवल सुधा खर्च रुपये

१। नागली फोडून आवटावयास माणसे १०

१। लाणीस माणसे १० येकूण मजुरी

॥= भारे बाधून साठवावयास माणसे ५

·। खल काढावयास माणसे २

१। मळणी काढावयास माणसे वगैरे खर्च १ मजुरी खर्च आसामी ८ + + +

१३

३।-। सरकार व हकदार सुधा धारा ०=॥

१६।-।

यासी उत्पन्न नागली ·॥ पैकी वजा वलुते माहार वगैरे ०॥ बाकी ·।४॥ येकूण दर खडीस रुपये २० प्रमाणे आकार रुपये ९॥ फाजील ० बाकी तोटा ६॥।-।

१ वरीवदल खर्च उत्पन्न

१ वरी जमीन बिघा ०१ यास खर्च

२॥ कवल तोडून मालावर आणून तरवा भरावयास माणसे सुमारी २० दर ०= प्रमाणे

१॥ गवतास माणसे १२ दर ०= प्रमाणे

·।· माती पाडावयास माणसे २

०= पेरणीस नागर सुधा खर्च

१॥= नागर जमीन घ्यावयास

॥= जमीन उघल घ्यावयास नागर सुमार २॥ येकूण

·॥ जमीन बेरावयास नागर २

·॥ आवटावयास नागर २

१॥=

१। आवटीस माणसे १० येकूण

१॥ बेणीस माणसे १२ येकूण

॥= लाणीस माणसे ५ येकूण

·।· खले काढावयास माणसे २

१ मळणीस खर्च कामकरी पोटगीसुधा व देवचे नेवेद सुधा नख्त

·॥· बीज वरीचे ००॥ आधोलीमर येकूण किमत आर्धा आणा

१०॥।

२॥।= सरकार देणे हकदारसुधा धारा ०२॥ येकूण हकदारसुधा आकार रुपये

१३।–॥

यासी उत्पन्न वरी कैली ·॥= पैकी वजा बलुते माहार वगैरे यास कैली ०॥= बाकी ·॥१॥= दर खडीस रुपये १६ प्रो रुपये ९०– बाकी फाजील ० तोटा ४।–॥

१ डोंगर जमीन वरी सरवा बिघा ०१ यास पहिले साली नागली दुसरे साली वरी करितात त्यास खर्च

॥= सरवा जमीन नीट करावयास माणसे ५ पोटगीसुधा मजुरी दर ०= प्रो

·॥। पेरणी कुदल्यानी करावी लागते त्यास माणसे ६ दर ०= प्रमाणे रुपये

१ वरी फाडून आवठावयास माणसे ८ सुमार दर ०= प्रमाणे पोटगीसुधा रुपये

१॥ बेणीस माणसे १२ येकूण दीड रुपया

॥= लाणीस माणसे ५ दर ०= प्रो

०= खळ काढावयास माणूस १ येकूण

·॥। मळणीस कामकरी व नवद वगैरे खर्च

६

२१·॥ सरकार व हकदार देणे

८।·॥

यासी उत्पन्न वरी कैली ·।३॥ पैकी वजा माहार वगैरे ०।१ बाकी ।=॥२ येकूण दर १६ प्रो ६०= रुपये फाजील ० तोटा रुपये २०=॥

१ हरिक जमीन बिघा ०१ येक आहे त्यास खर्च

१॥। नागरकीस उखलबारे सुधा व पेरणीस नागर येक दर नागर + +

·। बीजे हरिक च्यार आण्याचे

१॥ बेणीस माणसे १२ दर ०= प्रो

·॥। लाणीस माणसे ६ दर ०= प्रो

·॥ मळणीस माणसे दर ०= प्रो

४॥।

१॥= सरकार देणे हकदार सुधा यासी उत्पन्न हरिक कैली ·॥ वजा बलुते बाकी ।४॥ येकूण दर खडीस ८ रुपये प्रमाणे ३॥।·॥। बाकी ० फाजील तोटा २॥=॥

१ काठाणी तील उडीद तुरी वगैरे पावसाली

१ तील दर बिघा पिक आजमास ०१ दर ०।२ प्रमाणे रुपये २।= यास खर्च नागर व माणसे ६ बाकी रुपया १॥ बाकी ॥।=

१ उडीद दर बिघा पीक अजमासे ०=॥ दर ०॥ प्रमाणे रुपये ५ यास खर्च

१॥ नागर ६ येकूण

५०= + +पण व बेणी व वगैरे मजुरी खर्च

६॥=

बाकी नफा ० तोटा १॥=

१ तुरी दर बिघा पीक अजमासे ०१॥ आल्यास दर ०।१ प्रमाणे ४॥ यास खर्च रुपये
·॥ पेरणीस नागर २ येकूण
१॥।~ कुपणीस माणसे १५ येकूण २०= रुपये

+ + +

१ तर्फ मजकुरी हरजिनस पिकतात येणे प्रमाणे

१ भात ऐन जिनस
१ नागली
१ तील
१ मादवे
१ काले
१ उजावे जुजवी कोण्ही केल्यास होतात
३
१ हालद होते
१ प्रजेनकाली शाख भाजी होते

१ वरी
१ हरिक
१ उडीद पावसाली उणाली सेतकीत होतात
१ तुरी पावसाली जुजवी उणाली होतात
४
१ आले केले असता होते
१ उनाले दिवसी जे गावी वाणी आहे ते गावी शाख भाजी व खरबुजे होतात

१ जमीन जिराइती व माल मुरुड वरकसी देणे आगर घेणे जाले तरी
१ जिरायेत भात सेत ज्याचे त्याणी खुसीनी

| बिघा उतम | बिघा मध्यम | बिघा कनिष्ठ | च्यार सिंग |
|---|---|---|---|
| + | ३० | २० | १० |

+ रासी दर बिघा रुपये २७॥ प्रमाणे
१ वरकसी जमीन विकावयाचा सिरस्ता नाही
२

१ हरयेक जमेदार वतंदार याजकडे लाच्यारीमुळे बाकी सरकार दस्ताची राहिली थकली असता त्याजकडे सरकार बाकी ठेऊन सालबंदी लाऊन उगवणी करून घ्यावी याप्रमाणे सिरस्ते पेशवे आमलात त्याचे कारकीर्दीपासून चालत आहे कलम

१ गावचा वतंदार खोत वतनदार आहे आणि गाव नादारीस पडला त्याचेन गावची उस्तवारी न होई तरी सरकारातून त्या गावास तगाई व सरकार बाकी वाढती ठेऊन जमदार याचे विद्यमान्ये गावची उस्तवारी लावणी करून द्यावी आणि त्या गावचे कचे राखावे सरकारातून वतनदार याची घालमेल करावयाची चाल नाही

१ रयेत लोक यास सरकारातून जमेदार याना पुढे जामीन घेऊन भात व रुपये लागतील ते उसने घ्यावे आणि कीर्द माहामुरा करावी

१ हरयेक बाकी सरकार रयतेवर मेहेरबान होऊन गरीबीवर नजर देऊन पाल दिल्यास द्यावयाचा सिरस्ता आहे

१ पारध निघाली असता सरकारचा भाग काढावयाचा सिरस्ता नाही

१ हरयेक जातीत गोताई जाहाली असता सरकारची परवानगी घ्यावी लागते

१ नवीन रयेत गावी आणावी लागल्यास सरकारचा कौल देऊन आणावयाची चाल आहे

१ मोहोतर्फे कुल आहेत त्यात नादार पाहून चौकसी करून कमजाजती करावे लागते

१ जिरायेत जमीन व नदी गर्क जमीन नादारीमुळे व देवस्कीमुळे पडित जाहाल्यास सरकारातोन-चौकसी करून सूट घ्यावयाची चाल आहे

१ भूत जाहाले असता चौकसी करून वजा द्यावयाची चाल आहे

१ उथव बूड व सुकवे व किरकोल कोंडखाद व ठालखाद व उदीरखाद आसमानी सुलतानी जाहाली असता व स्वारीमुळे नुकसानी जाहाली असता चौकसी करून मजुरा घ्यावयाची चाल आहे

१ सरकारी **मधाची** झाडे मेडीची आहेत त्याजवरील कोणगी उतरावयाचे सिरस्त आहेत तेथ जमेदार पाटील माहार याचे हिसे मध जसी काही सापडल त्याप्रमाणे त्यास देऊन बाकी सरकारात आणावी

१ काताची चुलदाने पडल्यास दर केल्यास सरकारचा नख्त ।। घ्यावयाचा सिरस्ता आहे खेरीज जमेदार

१ जमीनीस उनाळी पावसाळी जो धारा पाहाणीस जो लागला आसल तो घ्यावा उन्हाळी लागली यास उन्हाळीचा सिरस्तेप्रमाणे घ्यावा पावसाली लागल्यास पावसाली सिरस्तेप्रमाणे घ्यावयाची चाल आहे

१ मोहोतर्फे पाल देववावयाची चाल आहे

१ देशमुख आधिकारी देशपाडे कुलकर्णी याची दुकाने असल्यास पाल द्यावयाची चाल आहे

१ खुमवार मेहेतर असल्यास त्याचे + + + +

१ मोठा माणुस याचे दुकान असल्यास

३

१ वनचराईवर घाटी बैल चारणीस अल्यास दर बैली ।· च्यार आणे प्रमाणे घ्यावयाचा सिरस्ता आहे खेरीज हकदार

१ जमेदार देशमुख आधिकारी देशपाडे कुलकर्णी याचे नीरवौश जाहाल्यास त्याची आफलादहि नसल्यास सरकारात घ्यावयाचे गाव कुलकर्णी याचा निरवौश जाहाल्यास त्याचे वतन देशपाडे याणी घ्यावे आधिकारी याचे निरवौश जाल्यास देशमुख याणी घ्यावे याप्रमाणे चाल आहे

१ हरयेक वस्तदार याचा निरवौश जाला असता त्याची अफलाद असल्यास जमेदार याचे विद्यमाने द्यावे औलाद अफलाद नसल्यास सरकारात समजाऊन धर्मपुत्र याचे नावे अगर दुसरे कोण्हास देणे तर सरकारात + + + + + +

१ आम्याची झाडे पाण्याचे वाटेवर व गोठणी शिवाय व मार्गाशिवाय खाटी झाडे आसल्यास ज्याचे झाड तो खुशीनी राजी घ्यावयास जाल्यास सरकारातोन चिठी तोडावयास द्यावयाची चाल आहे

१ हाली तर्फ मजकुरी गावगना सरकारचे बाग आहेत आम्याची वगैरे झाडे आहेत ते

१ मौजे कानासे

१ मजरे कोझरे

१ मौजे निजामपूर

३

१ इनामे सरकारातोन घ्यावयाची चाल आहे ती

१ गाव देणे जाल्यास + + + + + + + नबर खोत + + + + + + + + कडे चालते खोत + + वहीवाट ज्याचा तो खोत करितो वतनदार खोत नसल्यास खोती सुधा इनामदाराकड चालते खोतीची वहिवाटहि इनामदार करितो

१ इनाम जमीन देणे आसल्यास पड जमीन वेवा + + + + + + + + धावयाची चाल आहे रकमी धान्याची कुलाची असल्यास ज्यांचे त्याणी सेत करून सरकारात सारा घ्यावा तो इनामदार यासी द्यावा

१ कसबे मजकूरचे + टत सरकारचा विडा घ्यावयाची चाल नाही

१ जकातदार दरदाम सिरस्ते व जातखड तर्फ मजकुरी आहेत ते

१ घाट कावला खुशकीवर घाटी ऐन जिनस वगैरे येईल किंवा जाईल त्यास सवाई सुटे देऊन व आवाळु वजा करून बाकी खरी + राहील त्यास दर वैली घ्यावयाचा सिरस्ता रुपये

१ ऐन सरकार

१ बैल मरून जिनस येईल जाईल त्यास दर बैल सिरस्ता

| | | | |
|---|---|---|---|
| ०। | मिरच्या | ०= | तादुल |
| ०। | तंबाखु | ०= | कात |
| ०।०। | तेलजाडी | ०≡ | सुपारी |
| १ | कापड | ०= | खाजूर |
| ०= | लसून | ०।० | दारु कलाली |
| ०– | कादे | ०= | मासली |
| ०= | गहू | ०= | नारळ |
| ०–॥ | हरभरे | ०– | भात वरवाटी जाईल त्यास |
| ०– | बाजरी | ०।० | लोखड |
| ०– | जोरी | ०= | काली मिरे |
| ०= | दाल तुरीची | ०= | खोबरे |
| | + + + + | ०।० | तिखे राजवल |
| ०॥ | | ०।० | काबली |
| ०= | | ०= | बुका पिंजर उदबत्या |
| ०।० | साखर पिठी व खडी | ०– | कथील |
| ०= | भुइमुगाच्या सेगा | ०= | खारिख |
| १ | पानवेलीची विड्याची | ०।० | हिंग ०।० च्यार आणे |
| ०= | पापडखार | ०= | माग |
| ०॥ | सूत | ०= | ताग |
| ०= | बडीसोप | ०= | सारा |
| ०= | वावा आजमा म्हणतात | ०= | + + |
| ०।० | ताबे | ०= | + + |
| ०।० | पितल | ०।० | + + |
| ०।० | कापूर | ०।० | + + + |
| ०॥ | लवगा वेलदोडे जायफल जायपत्री सुधा दर येक आठ आणे प्रमाणे | ०।० | + + + |
| | | ०= | गुरगुडीचे मससुधा |
| | | ०– | मीठ |
| ०= | ———— | ०= | किरकोल जिनस पाहून |
| ०॥ | रेसीम | | |

+ + + + सिरस्ता
·।· कापड मारी १ येकूण
॥· काठाण हरजिनसी
॥· मीठ
॥· मासली
सूत

॥ गुळ
तबाखु
तूप घागर
॥· नारळ खादाडी
॥. पानेवलीची
॥· किरकोल जिनस मान पाहून

१ सुमारी सुमारी
१ बकरी व मेंढरे सवाई वजा करून बाकीस
१ मस्तेकरी याणी कौल देऊन आणविली त्यास दर प्रतवार आहे
१॥ १॥। १॥।
१ रहदारी आली असता दर सेकडा रुपये २॥ अडीच प्रमाणे
२
१ + + स किमतीस दर रुपयास येक आणा प्रमाणे
१ कुवविणीस किमतीस दर रुपयास + + + + ॥ आर्ध आणा प्रमाणे
+ + सिगोटी बदल
+ म्हैसीस सिगोटी १ ·॥
१ टोणगा १ ·॥ ·॥।
१ बैल ·॥ ·।·
३
४

( एकदोन ओळी फाटल्या आहेत )

( पांच ओळी फाटल्या आहेत )

१ टिपणीस पाणसरे याचा हक हर जिनस बैल वगैरे येतील जातील त्याचा सरकारी आकार सिरस्त प्रमाण होईल त्याजवर दर रुपयास दोन आणे पर्यंत पोटगी मीकण्या सुधा व किरकोळी मीठ व भात वगैरे येईल त्यास दर बैली टिपणीसी रुका १ व पाणसरे यास येक रुका १ येणे प्रमाणे व मालवी जिनस वगैरे येईल तो पाहून + + + + । प्रमाणे
१ सेटे यास कसबे मजकुरी हर जिनसे येईल जाईल त्यास
१ वजनी जिनसा सदर बैली पावसेर १ नऊ ठाक मान पाहून घ्यावा
१ कैली जिनसास बैलास वगैरे मूठ पसा जसा माल असल त्याप्रमाणे
२
३
+ + ले तर्फ मजकुरी मार्गावर + + + + + + + + + + गणपती
+ + + + + विठोबा

( ३ पान फाटलें आहे )

१
१ मसी + + + व नाते
कसबे नाते येथे सरकारी ठाणे माहालचे येक आहे याशिवाय किले रायेगडास सरकारी इमले आहेत
सदरहू हकीकत लहून दिल्ही ती खरी आहे छ ११ जिल्हेज

# टीप

मोडींत कानामात्रा कमजास्ती लिहिल्या जातात. अनुस्वार तर बहुधा नसतोच. शब्द तुटक रीतीनें लिहिले जात नाहींत; तसेंच निरनिराळीं अक्षरें जवळ जवळ सारखींच लिहिलीं जातात यामुळें मोडीचें बालबोध करतांना अनेक चुका होतात. तशा वरील हकीकतींत झाल्या आहेत. त्यापैकीं उदाहरणार्थ कांहीं देतों.

पृ. १ पारवडी = पारवाडी
,, २७ घट = घाट
,, २८ १५९५ = १५९६
,, ,, आधिला = बांधिला
,, ३९ वोडे-ढे = वोंडे = ओंडे
,, ४२ तलमाना = तलवाना
,, ,, खुप = खुद
,, ४५ सोनाजाई = सोमजाई
,, ५१ कनावीस = कमावीस
,, ,, तल्माना = तलवाना
,, ,, कालटकर = कोलटकर
,, ५२ } कालटकर = कोलटकर
,, ५३ }
,, ५३ बाहेन्याचे = वेहेड्याचे
,, ,, इसाफल = इसाफत
,, ५५ धराचे = घराचे
,, ५७ खुला = कुला
,, ,, विच्यार्ची = विड्यार्ची
,, ,, कमलकाच्या = कलालाच्या
,, ,, रेदवामकखोदार = रेंदवा मक्तेदार
,, ५९ सिधेसमंधानें = सिवेसमंधानें
,, ६१ पस्तव = पसा
,, ६३ पाटदाप = पाटदाम
,, ,, वसुलता = व सुनता

---

(८) **कवींची भेट व पर्वती** — ( वि. कृ. नेरूरकर, बी. ए. ) श्री. नेरूरकर यांना थोडक्या वेळांत पुष्कळ कविता करण्याची हातोटी साधलेली दिसते. कविता एकदां वाचण्यासारख्या आहेत.

(९) **उदात्त वाणी भाग २ रा** ( कवि श्री. उत्साहतीर्थ महाजन, किं. ४ आणे ) ह्या पुस्तकांत उत्साहतीर्थ यांच्या कवितांचा संग्रह असून कविता बऱ्यापैकीं आहेत. कवीचा राष्ट्रीय बाणा त्यांत दिसतो.

(१०) **नेत्रबलसंवर्धन व नेत्रव्यायाम शिक्षण**— ( लेखक. श्री. बाळासाहेब पंतप्रतिनिधि, संस्थान औंध, प्रकाशक, ज्ञानमित्रमाला. ) सदरहू पुस्तक सुप्रसिद्ध बर्नार मॅकफॅडन याच्या पुस्तकाच्या आधारें श्रीमंत बाळासाहेब पंत यांनीं लिहिलें असून ज्ञानमित्रपुस्तकमालेंत प्रसिद्ध झालें आहे. मॅकफॅडनच्या स्वतःच्या अनुभवाला श्रीमंतांच्या अनुभवाची जोड मिळाल्यामुळें ह्या ग्रंथाच्या उपयुक्ततेंत चांगलीच भर पडली आहे. लेखकांनीं ह्यांत सांगितलेले डोळ्यांचे व्यायाम घेतल्यास चष्मा लावण्याचा प्रसंग येणार नाहीं. तरी याचा अनुभव अवश्य घ्यावा.

(११) **होळकरशाहीच्या इतिहासाचीं साधनें** खंड १२
(१२) **ऋद्धिपुरवर्णन** ( प्रकाशक, यशवंत खुशाल देशपांडे, यवतमाळ )
(१३) **साधनचिकित्सा** ( वासुदेव सिताराम बेंद्रे )
(१४) **सुमनहार** ( प्रकाशक-महाराष्ट्रसाहित्यसभा, इंदूर )
(१५) **गोविंदाग्रज** ( रा. ग. हर्षे )
(१६) **अविमारक** ( विष्णु दामोदर देशपांडे, धुळें )

# प्राकृत व्याकरणांतील धात्वादेश.

( लेखकः- प्र. धों. कानिटकर. )

( १ ) आदेश म्हणजे काय ? :— व्याकरणाच्या परिभाषेंत आदेश याचा अर्थ 'प्रतिनिधि' ( Substitute ) असा आहे व त्यावरून आदेश म्हणजे 'समानार्थक अन्य शब्द' असा अर्थ निष्पन्न होतो; परंतु प्राकृत व्याकरणांत आदेश शब्दाला विशिष्ट अर्थ आहे, त्याचें लक्षण पुढें दिल्याप्रमाणें आहे:— शब्दांतील कोणत्याहि वर्णाचा किंवा वर्णसमुदायाचा नाश करून त्याच्या स्थानीं जो नवा वर्ण येतो त्याला आदेश म्हणतात. आदेश प्रकरणाला यूरोपिअन वैयाकरण Phonology किंवा Phonetics म्हणतात ( ज्ञानेश्वरी व्याकरण पृ. १ ). भाषाशास्त्रांत ( Philology ) आदेश-प्रक्रियेला अत्यंत महत्त्व आहे. वर्तमानकालीन प्रांतवार हिंदुस्थानांतील बोलण्याच्या भाषा ( Vernaculars ) तद्भवाच्या अपभ्रंशापासून विशिष्ट आदेशप्रक्रिया होऊन बनल्या आहेत, ही गोष्ट पौर्वात्य व पाश्चात्य विद्वानांनीं सप्रमाण सिद्ध केली आहे. संस्कृत व्याकरणांत आदेशप्रक्रिया आहे व तिचा उपयोग संधि करतांना व निरनिराळ्या धातूंचीं रूपें करतांना करण्यांत येतो. परंतु या आदेश प्रक्रियेची मर्यादा संकुचित आहे. प्राकृत भाषांत मात्र आदेशप्रक्रिया मोठ्या प्रमाणांत होत असून अनेक शब्दांत प्रत्येक वर्ण पालटलेला असतो ( युद्ध=जुज्झ–झुंज ). यामुळें आदेश–प्रक्रिया सशास्त्र समजल्या-शिवाय प्राकृत शब्दाचा अर्थ व निरुक्ति कळणार नाहीं. सर्व प्राकृत भाषा आदेश-प्रक्रियायुक्त आहेत; व आदेशप्रक्रियेनें बनलेले शब्दच मराठींत रूढ आहेत. अशी साधारणपणें आदेशाबद्दल माहिती आहे. आतां या लेखाचा मुख्य विषय–धात्वादेश–त्याकडे वळूं.

( २ ) धात्वादेशः— मूळ संस्कृत धातू ज्या स्वरूपांत असतो त्याच स्वरूपांत प्रत्यय लागून संस्कृतभाषेंतील क्रियापदें सिद्ध होतात; तथापि संस्कृत भाषेंत सुद्धां कांहीं धात्वादेश आहेत; जसें:–दृश्(पश्य्), पा (पिब्), प्रच्छ् (पृच्छ्), दंश् (दश्), ब्रू (आत्थ, आहथुः, आह, आहतुः, आहुः । वर्तमानकाळ ), पत् ( पप्त् –लुङ् Aorist ) हन् ( वध्–लुङ् Aorist ). कालिदासानेंहि धात्वादेशाचा उल्लेख केला आहे:—

धातोः स्थान इवादेशं सुग्रीवं संन्यवेशयत् ॥ र० १२।५८

संस्कृत भाषेंतील धात्वादेश परिमितच आहेत. प्राकृतांत मात्र बहुतेक धात्वादेशच आहेत, तत्सम धातू फारच थोडे सापडतात. यामुळें मराठींतहि-महाराष्ट्रीद्वारा धात्वा-देशांचाच भरणा मोठा आहे. जुनाट ( ज्ञानेश्वरीकालीन ) किंवा वर्तमानकालीन मराठी भाषेंतील धातू व त्यांचे अर्थ समजण्यास प्राकृतांतील धात्वादेशांचा फार उपयोग आहे.

व ही गोष्ट ज्ञानेश्वरी व्याकरणांत कै० राजवाडे यांनीं ज्ञानेश्वरीच्या आठव्या अध्यायांतील सर्व धातू (मूळ व आदेश) दिले आहेत ते पाहिले असतां समजून येईल. मराठी भाषेंत देशी शब्दांवरून बनलेले कांहीं नामधातूहि आहेत. ज्ञानेश्वरी व्याकरणांत नामधातूंचा उल्लेख आहे; तसेंच गउडवहो (गौडवध) या प्राकृत काव्यांतहि नामधातूंचा उपयोग केला असून कै. शं. पां. पंडितांनीं परिशिष्टांत ते धातू दाखविले आहेत. हेमचंद्रानेंहि देशीनाममालेंत नामधातू दिले आहेत. संस्कृत धातू, प्राकृत धात्वादेश व देशी नामधातू यांवरून मराठी क्रियापदें बनलीं आहेत. शिवाय मराठीनेंहि आपले कांहीं स्वतंत्र धातू बनविले आहेत. ज्ञानेश्वरींतील धातूंसंबंधीं कै० राजवाडे म्हणतात:– "ज्ञानेश्वरींतील बहुतेक सर्व धातू संस्कृतांतून साक्षात् किंवा महाराष्ट्रीद्वारा आले आहेत. अठराहि अध्यायांत हाच प्रकार आहे" ( ज्ञा० व्या० पृ. १२८ ). मूळ संस्कृत धातूचें आदेशप्रक्रियायुक्त जें रूप, तें मूळ संस्कृत धातूचा प्राकृत धात्वादेश होय. याचें लक्षण Sir George Grierson पुढें दिल्याप्रमाणें देतात:—

"As a grammatical term, *ādēśa* means 'substitute', and a Dhātv-ādēśa (धात्वादेश) is the Prakrit verbal root which is to be, or may be, substituted for a Sanskrit verbal root. Thus according to Hēmacandra, the Prakrit root hō (हो) is one of the *ādēśas* for the Sanskrit root bhū (भू), so that one of the Prakrit equivalents of bhavati (भवति) is hōi (होइ)."

(Memoirs, Asiatic Society Bengal Vol VIII No 2 page 77).

वरील लक्षणाच्या स्पष्टीकरणार्थ कांहीं संस्कृत धातू व त्यांचे प्राकृत आदेश पुढें दिले आहेत:–भी–बिह; ज्ञा–जाण, मुण; पट्–फाल; क्षि–झिज्ज; क्रुध्–जूर; पीड्–पील; कथ्–कह; रुष्–रूस; वृष्–वरिस; मस्ज्–बुड्ड.

( ३ ) ज्याप्रमाणें हिंदुधर्मशास्त्र मुळांत एक असून भिन्न टीकांमुळें त्याचे दायभाग व मिताक्षरा असे दोन संप्रदाय हिंदुस्थानच्या पूर्व व पश्चिम भागांत रूढ झाले आहेत, तद्वतच प्राकृत वैयाकरणांचेहि दोन पंथ आहेत. यासंबंधीं डॉ. सर ग्रीयर्सन म्हणतात:—

"These instances illustrate a fact, hitherto much neglected by European Scholars,- that there was never one uniform school of Prakrit grammarians for the whole of India. There were certainly at least an Eastern and a Western school which had marked variations in their teachings.

The *Eastern Line* of teachers was therefore वररुचि (with वसंतराज) क्रमादीश्वर, लंकेश्वर, रामशर्मन् and मार्कण्डेय.

The *Western School* claims descent, not from वररुचि, to whom its writers never refer by name, but from the author of the so called वाल्मीकिसूत्रs, now extant only in a much expanded form. These were adopted, with their entire grammatical terminology by त्रिविक्रम, लक्ष्मीधर, सिंहराज and others.हेमचंद्र also followed their teaching,

but employed the special terminology used by him for his Sanskrit grammar. We thus see that the two lines of the teachers of the East and of the West were entirely distinct from each other. The only link between them was the Kāshmīrī Bhāmaha (भामह). (Memoirs, Asiatic Society of Bengal; Vol VIII, No 2 page 82).

वास्तविक पहातां हेमचंद्रानें वररुचीचींच सूत्रें संक्षेप-विस्तार करून किंवा शब्दांची उलटापालट करून आपल्या प्राकृत व्याकरणांत दिलीं आहेत. दोघांत मोठा फरक काय तो धात्वादेशांचे बाबतींत आहे. परंतु त्याचें कारण उघड आहे. वररुचि व हेमचंद्र यां दोघांमध्यें जवळ जवळ १४००।१५०० वर्षांचें अंतर आहे. वररुचीच्या काळीं महाराष्ट्री प्राकृत उगम पावत असून मराठी भाषेचा जन्महि नव्हता; हेमचंद्राच्या काळीं महाराष्ट्री प्राकृत पूर्णत्वास येऊन नामशेषहि झाली होती व मराठी भाषा क्रमाक्रमानें वृद्धिंगत होत होती व हेमचंद्राच्या मृत्यूनंतर ११८ वर्षांनीं ज्ञानेश्वरांनीं उत्कृष्ट मराठी भाषेंत ज्ञानेश्वरी लिहिली आहे. या कारणांमुळें—महाराष्ट्रीचा पूर्ण विकास होऊन ती मृत होणें व जुनाट मराठी जवळ जवळ पूर्णत्वास येणें—हेमचंद्राला सर्व प्राकृत काव्यांतील व नाटकांतील व तत्कालीन देशभाषेंतील आदेश संग्राहित करण्याची संधी मिळाली. हेमचंद्रानें सुमारें ९०० धात्वादेश दिले आहेत; परंतु मराठी भाषेला उपयोगी पडतील असे आदेश त्यांपैकीं फारसे नाहींत.

( ४ ) डॉ० सर ग्रीयर्सन यांनीं ज्या प्रसिद्ध वैयाकरणांचे धात्वादेश तुलनात्मक कोष्टकांत ग्रथित केले आहेत, त्यांची माहिती खालीं देतों:—

( अ ) सिद्धहेमचंद्र:— हेमचंद्रानें लिहिलेलें संस्कृत व प्राकृत भाषांचें व्याकरण. यांत ८ व्या अध्यायाच्या ४ थ्या पादांत २५९ सूत्रांत प्राकृत धात्वादेश दिले आहेत.

( आ ) प्राकृतप्रकाश:– वररुचीचें व्याकरण, यावर भामहाची टीका आहे. यांतील आठव्या परिच्छेदांत धात्वादेशांचा विचार केला आहे.

( इ ) संक्षिप्तसार:— क्रमादीश्वरकृत. या व्याकरणांत तिङन्तकार्य या भागांत ४६ ते ८३ या सूत्रांत धात्वादेश दिले आहेत.

( ई ) प्राकृत कल्पतरु:— रामशर्माकृत. या व्याकरणाची छापील प्रत नाहीं. इंडिया ऑफिस लायब्ररीमध्यें हस्तलिखित प्रत आहे. त्यांत पहिल्या शाखेच्या ८ व्या स्तबकांत ४२ श्लोकांत धात्वादेश ग्रथित केले आहेत.

( उ ) प्राकृत सर्वस्व:— मार्कंडेय कवींद्रकृत. या व्याकरणाचे २० पाद असून ७ व्या पादांत महाराष्ट्रीचे धात्वादेश दिले आहेत.

मराठी भाषेला उपयोगी पडणारे असे धात्वादेश वररुचि व हेमचंद्र यांचेच असल्यामुळें त्याबद्दलच पुढें विवेचन होईल.

( ५ ) प्राकृतांतील धात्वादेशांचा विचार केला असतां ६ प्रकार दृष्टोत्पत्तीस येतात, त्यांचें सोदाहरण विवेचन पुढें करितों:—

( अ ) मूळ संस्कृत धातू व प्राकृत आदेश एकाच स्वरूपाचे असून फक्त दोन्ही भाषेंतील क्रियाविभक्तीचे प्रत्यय मात्र भिन्न असतात:— जसें,

( संस्कृत ) चलति = ( प्राकृत ) चलइ;
( सं० ) चुम्बति = ( प्रा० ) चुम्बइ;
( सं० ) आगच्छति = ( प्रा० ) आगच्छइ;
( सं० ) खादति = ( प्रा० ) खाअइ;
( सं० ) ताडयति = ( प्रा० ) ताडेइ;

वरील प्रकारच्या संस्कृत धातूंत मूळ वर्णाचा किंवा वर्णसमुदायाचा नाश झाला नसल्यामुळें असे धातू प्राकृतांत तत्समच राहतात, म्हणून त्यांना आदेश म्हणतां येत नाहीं.

( आ ) ज्या धातूंचीं प्राकृतांतील रूपें आदेशप्रक्रियेच्या नियमानुसार संस्कृत धातूंपासून सिद्ध होतात असे आदेश या वर्गांत येतातः—

| संस्कृत. | | प्राकृत. |
|---|---|---|
| पीडयति | | पीलेइ. ( पिळणें = छळणें ) |
| अर्पयति | | अप्पेइ. ( ओपणें ) |
| खिद्यते | | खिज्जइ. ( प्राकृतांत आत्मनेपद नाहीं ). |
| घटते | | घडइ. ( घडणें ) |
| युद्ध्यति | ........ | जुज्झइ. ( झुंजणें ) |

वरील प्रकारच्या धातूंचीं प्राकृत रूपें नियमानें सिद्ध झालीं असल्यामुळें त्यांना आदेश म्हणतां येत नाहीं.

( इ ) ज्या धातूंचीं प्राकृतांतील रूपें कोणत्याहि नियमानें संस्कृत धातूपासून सिद्ध होत नाहींत असे आदेश या वर्गांत येतातः—

| संस्कृत | | प्राकृत |
|---|---|---|
| चलति | | चल्लइ. |
| राजते | | रेहइ. |
| पर्यस्यति | | पल्हत्थइ. |
| जृम्भते | | जम्भाअइ. |
| जीर्यते | ........ | जीरइ. |

वरील प्रकारच्या धातूंना आदेश ही यथार्थ संज्ञा देतां येईल.

( ई ) प्राकृतांत असे कांहीं धातू आहेत कीं जे कोणत्याहि संस्कृत धातूपासून उत्पन्न झालेले नाहींत किंवा ज्या संस्कृत धातूंचे ते आदेश म्हणून दिले आहेत, त्या संस्कृत धातूंचा एकहि वर्ण आदेशांत समान नाहीं. या वर्गांत येणारे आदेश हेहि आदेश या संज्ञेस सर्वस्वीं पात्र आहेत. इतकेंच नव्हें, तर हे आदेश विशेष महत्त्वाचे असून

१६.२

त्यांपासून मराठी भाषेंतील धातूंची उपपत्ति समाधानकारक लागते. अशा आदेशांचीं उदाहरणें मुद्दाम विस्तारानें खालीं देतों:—

| संस्कृत | प्राकृत | मराठी | संस्कृत | प्राकृत | मराठी |
|---|---|---|---|---|---|
| कथयति | बोल्लइ | ( बोलणें ) | त्रस्यति | डरइ | ( डरणें ) |
| | संघइ | ( सांगणें ) | प्रदीप्यते | तेअवइ | ( तेवणें ) |
| मज्जति | बुड्डइ | ( बुडणें ) | ,, | पलीवइ | ( पळिपणें ) |
| ग्रस् | बुज्जइ | ( बुजणें ) | पिबति | घोट्टइ | ( घोटणें ) |
| कर्षति | कड्ढइ | ( काढणें ) | भवति | होइ | ( होणें ) |
| क्रुध्यति | जूरइ | ( झुरणें ) | भ्रंश् | चुक्कइ | ( चुकणें ) |
| क्वथति | कढइ | ( कढणें ) | ,, | भुल्लइ | ( भुलणें ) |
| क्षरति | झरइ | ( झरणें ) | ,, | फिट्टइ | ( फिटणें ) |
| क्षयति | झिज्जइ | ( झिजणें ) | गवेषयति | ढंढोल्लइ | ( ढांढोळणें ) |
| क्षिपति | पेल्लइ | ( पेलणें ) | मार्ष्टि | पुसइ | ( पुसणें ) |
| समारचयति | समारइ | ( सवारणें ) | आरोहति | चडइ | ( चढणें ) |
| | सारवइ[1] | ( सारवणें ) | लाति | लेइ[4] | ( लेणें ) |
| उल्लसति | ऊसलइ | ( उसळणें ) | निःसरति | धाडइ | ( धाडणें ) |
| विस्मरति | वीसरइ | ( विसरणें ) | | नीसरइ | ( निसरणें ) |
| विलपति | बडबडइ[2] | ( बडबडणें ) | | वरहाडइ[5] | |
| प्रसूते | पसवइ[3] | ( पसवणें ). | सिंचति | सिंचइ | ( सिंचणें ) |
| स्पृशति | छिवइ | ( शिवणें ) | | सिंपइ | ( सिंपणें ) |
| गर्जति | बुक्कइ | ( भुंकणें ) | | | ( शिंपणें ) |

टीप:—

( १ ) सवारणें = सारवणें; जसें झाडणें सवारणें.

( २ ) या आदेशांपैकीं "बडबडइ" हा देशी नामधातू आहे.

( ३ ) पसवणें — घोडी प्रसूत झाली म्हणजे 'पसवली' असें म्हणतात.

( ४ ) लाति = लेइ (घेतो) ; ले हा धातू हिंदी भाषेंत प्रचारांत आहे.

( ५ ) "वरहाडइ" हा धातू मराठींत नाहीं; परंतु नवऱ्या मुलाबरोबर लग्नाला जे लोक (स्त्रीपुरुष) जातात त्यांस वऱ्हाडी म्हणतात; "वरहाडइ" या धातूचा संबंध "वऱ्हाडी" याशीं असणें संभवनीय आहे.

| संस्कृत | प्राकृत | मराठी | संस्कृत | प्राकृत | मराठी |
|---|---|---|---|---|---|
| क्वथति | अट्टइ | अटणें | उद्घाटयति | उग्घाडइ | उघडणें |
| | कढइ | कढणें | पश्यति | देक्खइ | देखणें |
| गवेषयति | ढुंढुल्लइ | धुंडाळणें | दृश्यते | दीसइ | दिसणें |
| गृह्यते | घेप्पइ | घेपणें | दर्शयति | दक्खवइ | दाखविणें |
| | | ( ज्ञानेश्वरींत येतो ) | | दावइ | दावणें |

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| प्रश्नाति | गंठइ | गांठविणें | दहति | अहिऊलइ | आहाळणें |
| प्रक्षरति | पज्झरइ | पाझरणें | भ्रमति | गुमइ | घुमणें |
| मश्नाति | घुसलइ | घुसळणें | | | ( हिंदुस्थानी ) |
| युनक्ति | जुप्पइ | जुंपणें | मिश्रयति | मेलवइ | मिळविणें |
| निष्पद्यते | णिप्पज्जइ | निपजणें | म्रक्षति | चोप्पडइ | चोपडणें |
| व्याप्रियते | वावरेइ | वावरणें | | मक्खइ | माखणें |
| आरोहति | वलग्गइ | वळंघणें | विज्ञापयति | विण्णवइ | विनवणें |
| | | | शृणोति | सुणइ | सुनणें (हिंदी) |

( उ ) प्राकृतांत असे कांहीं धात्वादेश आहेत कीं, ज्यांत मूळ संस्कृत धातूंचें गणचिन्ह ( Conjugational Sign ) अंशतः कायम राहिलेलें आढळतें:—

| | संस्कृत | प्राकृत | मराठी |
|---|---|---|---|
| ( गण ४ ) | नृत्यति | णच्चइ ( त्य = च्च ) | नाचणें |
| ( ,, ) | कुप्यति | कुप्पइ ( प्य = प्प ) | कोपणें |
| ( गण ५ ) | विचिनोति | विचिणइ | वेचणें |
| ( गण ७ ) | भिनत्ति | भिन्दइ | भेदणें |
| ( ,, ) | छिनत्ति | छिन्दइ | छेदणें |
| ( गण ९ ) | जानाति | जाणइ | जाणणें |
| ( ,, ) | गृह्णाति | गेण्हइ | घेणें |
| ( ,, ) | विक्रीणीते | विक्किणइ / विक्केइ | विकणें |
| ( गण ३ ) | बिभेति | बीहइ (बिहाला हें रूप ज्ञानेश्वरींत येतें) | भिणें |

या प्रकारचे आदेश ( इ ) चा पोटभेद असून खरे आदेश आहेत.

( ऊ ) कांहीं धात्वादेश असे आहेत कीं, जे प्राकृत व्याकरणाच्या नियमानें सिद्ध होतात; परंतु त्यांच्या अर्थांत बदल झाल्यामुळें ज्या संस्कृत धातूपासून ते सिद्ध होतात त्या धातूचे ते आदेश दिले नसून बदललेल्या अर्थाशीं सदृश असा जो संस्कृत धातू असेल त्याचा तो आदेश म्हणून दिलेला आहे:—

| संस्कृत | प्राकृतरूप |
|---|---|
| प्रेक्षते | पेक्खदि ( १ ) .... शौरसेनी |
| | पेच्छइ ( २ ) .... महाराष्ट्री |

"प्रेक्षते" याची वरील दोन्ही रूपें जरी नियमानें सिद्ध झालीं आहेत, तरी तीं प्रेक्ष् याचे आदेश म्हणून दिलीं नसून, खालीलप्रमाणें आदेश दिले आहेत:—

| संस्कृत | प्राकृत आदेश. | |
|---|---|---|
| पश्यति | पेच्छइ. | ( पाहाणें ) |
| प्रेक्षते | पेक्खदि. | ( लक्षपूर्वक पाहाणें ) |

तसेंच, "उद्धमति" याचें 'उद्धुमाइ' असें नियमानें रूप सिद्ध होतें तरी "उद्धुमाइ" हा धात्वादेश वेगवेगळ्या धातूंचा दिलेला आढळतोः—

| संस्कृत | | प्राकृत धात्वादेश. | |
|---|---|---|---|
| पूरयति | | उद्धुमाइ | ( हेमचंद्र ) |
| उद्धमति | .... | उद्धुमाइ | ( वररुचि, मार्कण्डेय ). |

अशा धात्वादेशांबद्दल डॉ. सर ग्रीयर्सन म्हणतातः—

"We may here note a difference which I have observed between हेमचंद्र and the Eastern Grammarians. हेमचंद्र seems to prefer to group his Ādeśas according to their generalized sense, while the grouping of the Easterners tends towards specialization." (Memoirs, B. A. S. Vol. VIII No. 2 page 81).

अशा प्रकारच्या आदेशांनाहि खरे आदेशच म्हणणें सयुक्तिक दिसतें. वर दिलेल्या सहा प्रकारांपैकीं ( अ ) व ( आ ) यांशिवाय बाकीच्या प्रकारांत येणारे आदेश हे यथार्थ प्राकृत धात्वादेश होत.

( ६ ) वररुचीचे बहुतेक धात्वादेश हेमचंद्रानें घेतले आहेत; तथापि तो कांहीं धातूंचे वेगळे आदेश देतो, ते खालीं देतोंः—

| संस्कृत | आदेश ( वररुची ) | आदेश ( हेमचंद्र ) |
|---|---|---|
| जिघ्रति | पाअइ, पाइ | आदेश दिला नाहीं. |
| तृप्यति | थिंपइ | थिप्पइ. |
| त्रस्तम् | हित्थम् | आदेश दिला नाहीं. |
| दग्धम् | दड्ढम् | ,, |
| दूयते | दूमइ | ,, |
| नुदति | नोल्लइ | ,, |
| प्रणुदति | पणोल्लइ | ,, |
| पद्यते | पालेइ | ,, |
| बुध्यते | बुज्झइ | बुज्झइ. |
| बिभेति | बीहइ | बीहइ. |
| मज्जति | बुड्डइ | बुड्डइ. |
| मार्ष्टि | { लुभइ<br>{ सुपइ | { लुइइ<br>{ पुसइ |
| रम्यते | { रम्मइ<br>{ रमिज्जइ | { आदेश दिले<br>नाहींत. |
| लिह्यते | लिज्झइ | लिहिज्जइ. |
| शीयते | सडइ | झडइ. |
| सीदति | दिला नाहीं | सडइ |

वरील धात्वादेशांपैकीं 'मार्ष्टि' व लिह्यते' या धातूंचे आदेश मात्र दोघांनीं भिन्न दिले आहेत; बुद्धयते, बिभेति, मज्जति या क्रियापदांचे आदेश बवयोरैक्यत्वात् । या सूत्राप्रमाणें एकच आहेत.

तृप्यति = थिंपइ
= थिप्पइ } यांतहि फारसा भेद नाहीं.

प्राकृत व्याकरणाच्या नियमाप्रमाणें शब्दांतील जोडाक्षरांपैकीं एकाचा नाश झाला असतां, मागील स्वर दीर्घ होतो अगर त्यावर अनुस्वार येतो; या नियमाप्रमाणें थिप्पइ=थिंपइ.

शीयते:– यांत मूळ धातू शद् ( शातने ); यासंबंधीं वररुचीचें सूत्र येणें प्रमाणें आहे:— शद्लृपत्योर्डः । शद्, पत् या धातूंच्या अन्ताचा ड आदेश होतो; सडइ, पडइ. शदोज्झडपक्खोडौ । ( हेमचंद्र ); झडइ, पक्खोडइ. 'झडइ' हा आदेश हेमचंद्रानें गाथासप्तशतीवरून घेतल्याचें दिसतें; सप्तशतींत 'झडिअपत्तो' = शीर्णपत्रः असा शब्द आहे. शद् = to fall off, to decay- दोघांचे आदेश या दोन्ही अर्थांशीं सदृश आहेत. झडणें = to fall off, सडणें = to decay- तेव्हां या बाबतींत हि तत्वतः फरक नाहीं.

सद् ( सीदति ) to sit. या अर्थानें हेमचंद्रानें 'सडइ' हा आदेश दिला नाहीं; परंतु सद् याचा दुसराहि अर्थ आहे तो लक्षांत घेऊन आदेश दिल्याचें दिसतें. सद् ( सीदति ) to decay; to waste away:—

( विपन्नायां नीतौ सकलमवशं सीदति जगत् )

या अर्थानें सीदति = सडइ हा आदेश बरोबर आहे. एकंदरींत हेमचंद्र व वररुचि यांच्या धात्वादेशांत फारसा फरक नाहीं.

( ७ ) डॉ० सर ग्रीयर्सन यांनीं "प्राकृत धात्वादेश" या पुस्तकांत आदेशासंबंधीं बरीच माहिती दिली आहे, त्यांतून हेमचंद्रासंबंधीं माहिती खालीं देतों:—

"Let us take the two authors whose lists are most full— हेमचंद्र (Western) and मार्कण्डेय (Eastern)—and compare the statistics. We have seen that we have altogether 1590 *Ādēs'as*. Of these हेमचंद्र and मार्कण्डेय are together responsible for 1548—हेमचंद्र for 930 and मार्कण्डेय for 618. Yet हेमचंद्र gives 707 *ādēs'as* which are ignored by मार्कण्डेय and मार्कण्डेय gives 395 *ādēs'as* which are ignored by हेमचंद्र. Only 223 *ādēs'as* are common to the two authorities.

We have a valuable list of admitted Deśya Dhātv-ādēśas (देश्य धात्वादेश) in हेमचंद्रs देशीनाममाला. As already stated, of He.'s 930 words, 388 are such Deśyas, while, of Mk.'s 618, there are only 65. This discrepancy is striking, and leads us to suspect that most of हेमचंद्र's Dēśya ādēśas are dēśya words belonging to his part of the country, i. e. are of Western origin."

(Memoirs Beng. A. Society Vol. VIII No. 2, p. 83)

( ८ ) नमुन्याकरितां वररुचि व हेमचंद्र यांचीं धात्वादेशांचीं सूत्रें व रामशर्मन् ( तर्कवागीश ) याच्या प्राकृत-कल्पतरूमधील डॉ. ग्रीयर्सन यांनीं दिलेले धात्वादेशाचे श्लोक पुढें देतों:—

( अ ) प्राकृत-कल्पतरुः— घूर्णेस्तु घोणः प्रभवेच्च घुम्मो ।
नुदेस्तु णोलं समुदीरयन्ति ॥
पाटेस्तु फालश्च वृषेर्ऋतोऽरिः ।
कृषेर्मृषेश्चात्र हृषेरपि स्यात् ॥ २ ॥

वररुचि-प्राकृतप्रकाशः— घुणो घोलः । सू. ६
णुदो णोल्लः । सू. ७
पटेः फालः । सू. ९
वृष-कृष-मृष-हृषामृतोऽरिः । सू. ११

हेमचंद्र—सिद्धहेमचंद्रः— घूर्णेर्घुलघोलघुम्मपहल्लाः । सू. ११७
वृषादीनामरिः । सू. २३४

( ब ) प्राकृत-कल्पतरुः— अवात्तु गाहेः प्रवदन्ति वाहम् ।
कासेस्तु वासम् यदि शब्दकुत्सा ॥
केषांच वावाश्च इमा विहस्तः ।
क्रीञः किणो वेस्तु विकल्पितःक्के ॥

प्राकृतप्रकाशः— क्रीञः किणः ॥ सू. ३० ॥ वेः क्केच ॥ ३१ ॥
अवात् गाहेर्वाहः ॥ ३४ ॥ कासेर्वासः ॥ ३५ ॥

सिद्धहेमचंद्रः— अवात्काशोवासः ॥ १७९ ॥ अवात् गाहेर्वाहः ॥
॥ २०४ ॥ क्रियः किणो वेस्तु क्केच ॥ ५२ ॥

वर दिलेल्या सूत्रांवरून प्राकृतवैयाकरणांनीं वररुचीचींच सूत्रें थोडाफार फरक करून घेतल्याचें दिसून येईल.

( ९ ) प्राकृत व्याकरणांतील आदेशप्रक्रिया व धात्वादेश यांच्या सहाय्यानें जुनाट व वर्तमान कालीन मराठी भाषेंतील शब्द व क्रियापदें यांचा उलगडा कसा होतो ही गोष्ट कै० राजवाडे यांनीं आपल्या ज्ञानेश्वरी व्याकरणांत स्पष्ट करून दाखविली आहे. ज्ञानेश्वरींतील धातू संस्कृतांतून साक्षात् किंवा महाराष्ट्रीद्वारा आले आहेत, त्याचा अर्थ इतकाच आहे कीं ज्ञानेश्वरींत तत्सम ( संस्कृत ) तद्भव ( प्राकृत धात्वादेश व देश्य धातू ) धातू असून तेच पर्यायानें वर्तमान मराठींतहि आहेत. महाराष्ट्र-शब्दकोश-मंडळानें धात्वादेश विचारांत घेतल्यास अनेक मराठी क्रियापदांची व्युत्पत्ति व पूर्वपरंपरा समाधानकारक रीतीनें त्यांस देतां येईल यांत संशय नाहीं. तरी सदर मंडळानें प्राकृत धात्वादेशांचा संग्रह करावा अशी विनंति करून बराच लांबलेला हा लेख पुरा करितों. या लेखाला डॉ. सर ग्रीयर्सन यांच्या "प्राकृत धात्वादेश" या पुस्तकाचा अत्यंत उपयोग झाला हें नमूद करणें अवश्यक आहे.

१९५

---

# अभिप्राय

**( १ ) आत्मसंयमन–** ( ले० – **यशवंत लक्ष्मण गुण्ये,** किं. ८ आणे ) श्री. गुण्ये यानी 'कथा-कथनाच्या मार्गानें लहान मुलांना शीलशिक्षण देण्यासाठीं' काढलेल्या शीलशिक्षण-मालेचें हें पहिलें पुस्तक आहे. ?० पानांच्या ह्या लहानशा पुस्तकांत पौराणिक, ऐतिहासिक, व काल्पनिक निरनिराळ्या प्रकारच्या गोष्टी सांगून आत्मसंयमन ह्या अमोल गुणाचें महत्त्व लहान मुलांच्या मनावर ठसविण्याचा उत्तम प्रयत्न केला आहे. लहान मुलांना गोष्टी फार आवडतात हें ओळखून त्याच मार्गानें मुलांना नीतिशिक्षण व शीलशिक्षण देण्याची ही योजना फारच स्तुत्य आहे. अलीकडच्या शिक्षण-पद्धतींत शील बनविण्यास लागणाऱ्या गुणांचें शिक्षण कोठेंच मिळत नाहीं व त्या दृष्टीनें सध्यांची शिक्षणपद्धती अत्यंत नालायक व टाकाऊ बनलेली आहे. ह्या अत्यंत महत्त्वाचा दोष दूर करणें हें विद्या-खात्याचें पहिलें कर्तव्य आहे. पण सरकारी विद्याखातें नेहमींच निद्रिस्त असल्यामुळें त्याचे डोळे उघड-ण्याची वाट न पाहतां श्री. गुण्ये यांनीं स्वतःच केलेला ह्या उद्योग खरोखरच अभिनंदनीय आहे.

**( २ ) उद्योग**:-हें वरील मालेचें दुसरें पुष्प होय. ह्याच्या अठरा पाकळ्यांत गोष्टींच्या द्वारें मुलांस पटेल अशा रीतीनें उद्योग ह्या गुणाचें महत्त्व वर्णन केलें आहे. वरील व ह्या दोन्ही पुस्तकांची भाषा साधी, सोपी व लहान मुलांस सहज समजेल अशी आहे. गोष्टी मनोवेधक रीतीनें सांगण्याची हातोटी श्री. गुण्ये यांस साधलेली दिसते. मालेचीं पुढील पुस्तकें लौकर प्रसिद्ध करावीं अशी आमची त्यांस विनंती आहे. शाळांच्या अधिकाऱ्यांनीं वाचनपुस्तकांत यांचा अवश्य अंतर्भाव करावा अशी आमची शिफारस आहे.

**( ३ ) टॉलस्टॉयचें तत्त्वज्ञान**— ( ले० – **विठ्ठल कृष्ण नेरूरकर** किं. ६ आणे ) ह्या लहानशा पुस्तकांत कौंट टॉलस्टॉय ह्या विख्यात रशियन तत्त्ववेत्त्याचे कांहीं थोडे विचार एकत्रित केले आहेत. टॉलस्टॉयच्या तत्त्वज्ञानाचा प्रसार अलीकडे महात्मा गांधींच्या शिकवणुकीच्या द्वारें आपल्या-कडे होत आहे, अशा वेळीं ह्या पुस्तकाचा बराच उपयोग होईल. लेखकास टॉलस्टॉयच्या विचारसरणींत कोठें विसंगतता आढळते तशी दुसऱ्या कोणास वाटणार नाहीं. पण एकंदरींत विचारांना चढविलेला मराठी पेहराव बरा आहे.

**( ४ ) देशाचें वैभव** ( ले० – **वि. कृ. नेरूरकर** किं. ६ आणे ) 'देशाचें वैभव देशांतील सुगुणसंपन्न तरुण पिढींत सांठलेलें असतें' ही गोष्ट विशद करण्यासाठीं श्रीशिवलीलामृताच्या चौथ्या अध्यायांतील चंद्रसेन श्रीकाराच्या उपाख्यानावरून मुलांसाठीं ही गोष्ट लिहिली आहे.

**( ५ ) मधुप-रामायण**— ( ले० – **श्री. गं. भट बी. ए. एल्. एल्. बी.** किंमत ६ आणे ) श्रीयुत भट यांनीं रामायणाची गोष्ट भारदस्त पण सुलभ भाषेंत पण भक्तियुक्त अन्तःकरणानें लिहिली असल्यामुळें मुलांच्या हातांत देण्यास त्यांचें मधुप-रामायण योग्य आहे.

**( ६ ) मूळाक्षरवाचनपाठमाला, फूल पहिलें** ( प्रकाशक-**गोळवलकर आणि बंधू** किंमत ५ आणे, सांगली ) — मूळाक्षरांची ओळख म्हणजे लहान मुलांच्या ज्ञानमंदिराची वेसच होय. या वेशींतून सहज गतीनें व सुलभतेनें जाता यावें म्हणून जितके प्रयत्न होतील तितके थोडेच.

**( ७ ) इचलकरंजी ग्रंथमाला**:– ( प्रकाशक, **स. वि. चौधरी**, लॉ कॉलेज, पुणें ४) आकाशाचे देखावे, मानवातिजीवन, मराठीचा संसार आणि जर्मन भाषाप्रवेश हीं चार पुस्तकें इचल-करंजी ग्रंथमालेंत प्रसिद्ध झालीं असून "पत्रिके" कडे अभिप्रायार्थ आलीं आहेत. पुस्तकें आपआपल्या परीनें उपयुक्त व बरीं आहेत. पण असलीं शालोपयोगी पुस्तकें प्रसिद्ध करण्याची महत्त्वाकांक्षा श्रीमंतांनीं बाळगावी याचें आम्हांस वाईट वाटतें.

# महाराष्ट्र-साहित्य-संमेलन

## १५ वें अधिवेशन बेळगांव २६, २७, २८ मे १९२९

## पास झालेले ठराव

(१) ग्वाल्हेरच्या संमेलनानंतर आजतागायत खालीं .निर्दिष्ट केलेल्या व इतर साहित्य-भक्तांच्या निधनानें महाराष्ट्र वाङ्मयाची फार मोठी हानि झाली आहे. ह्याबद्दल हें संमेलन खेद व्यक्त करीत आहे. (१) श्री. कृष्णाजी विनायक वझे, (२) प्रो. महादेव मल्हार जोशी, (३) दि. ब. पुरुषोत्तम बाळकृष्ण जोशी, (४) श्री. बाळकृष्ण अनंत भिडे, (५) श्री. दत्तात्रय भिमाजी रणदिवे, (६) श्री. शिवराम सिताराम वागळे, (७) श्री. द्वारकानाथ माधव पितळे, ( नाथ माधव )

(२) ( अ ) मुंबई; नागपूर, व उस्मानिया विश्वविद्यालयांतील बी. ए च्या अभ्यास क्रमांत सन्मान शाखेत ( Honours Course ) मराठीचा समावेश करावा.

( आ ) एम्. ए. च्या परीक्षेस मराठी विषय घेऊन बसणारास प्रबंध ( Thesis ) लिहून परिक्षेस बसण्याची मोकळीक असावी. सदरहू निबंध मराठींतच लिहिलेला असावा असा निर्बंध करावा.

( इ ) एम्. ए. च्या परीक्षेसाठीं लिहावयाचे इतर विषयावरील प्रबंध ( Thesis ) मराठींतहि लिहिण्याची परवानगी असावी.

( ई ) प्रवेश, प्रथम वर्ष ( F. Y. A. ) इंटर आर्टस् या परीक्षांच्या अभ्यासक्रमांत संस्कृत हा अवश्यक विषय ठेऊन मराठी हा एक विषय ठेवावा.

(३) सरकारी शाळांतून जीं क्रमिक पुस्तकें अभ्यासाकरितां तयार करण्यांत येतात व लावतात तीं महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या संमतीनें व सहाय्यानें तयार करावीं व नेमली जावीं

(४) मराठींत प्रसिद्ध होणाऱ्या ग्रंथांच्या सरकारकडे येणाऱ्या प्रतींपैकीं एक एक प्रत राखून ठेवून सरकारनें एक मराठी ग्रंथ-संग्रहालय सार्वजनिक उपयोगाकरितां चालवावें असें या संमेलनाचें मत आहे.

(५) महाराष्ट्र साहित्य परिषदेचा एक एक प्रतिनिधी सर्व हिंदी विश्वविद्यालयांच्या अधिकार मंडळांत असावा अशी या संमेलनाची त्या त्या प्रांतांतील सरकारास विनंति आहे.

(६) परप्रांतीय महाराष्ट्रीयांच्या ( बृहन्महाराष्ट्रीयांच्या ) मराठी शिक्षणाची सोय करण्या करितां व त्यांच्या अडचणींची माहिती मिळविण्याकरितां साहित्य परिषदेनें प्रचारक नेमावे व त्यांस मराठी पुस्तकें पुरवावीं आणि टिळकविद्यापीठानें पत्रव्यवहारानें व अन्य मार्गानें त्यांस मराठी शिकविण्याची व्यवस्था करावी अशी या संमेलनाची शिफारस आहे.

(७) ब्रिटिश सरकारच्या, कांहीं हिंदी संस्थानिकांच्या व लोकांच्या दुर्लक्षामुळें मोडी लिपीचा प्रसार कमी होत चालला आहे. ही अत्यंत अनिष्ट गोष्ट असून सर्वांनीं मोडीच्या उपयोगास अगत्य उत्तेजन द्यावें असें या संमेलनास वाटतें.

(८) महाराष्ट्र व बृहन्महाराष्ट्र यांसाठीं कायद्यानें मान्य होणारें ( Chartered ) असें महाराष्ट्र विद्यालय स्थापन व्हावें असें या संमेलनास वाटतें.

(९) मुंबई एल्फिस्टन कॉलेजांतील मराठी प्रोफेसराची जागा कमी करण्यांत आली आहे ती ताबडतोब पुनः कायमची भरण्यांत यावी अशी या संमेलनाची मुंबई सरकारास आग्रहाची विनंति आहे.

(१०) मराठी इतिहास पुस्तकांत आढळणाऱ्या पर्शियन व उर्दू नांवांचे शुद्ध उच्चार व शुद्ध लेखन निश्चित करण्यासाठीं व एकवाक्यता करण्यासाठीं यादी करण्याकरितां खालील गृहस्थांची समिति करण्यांत यावी.

(१) श्रीं. सरदार किबेसाहेब (२) श्री. सरदेसाई (३) प्रो. पटवर्धन (४) प्रो. पोतदार (५) डॉ. बाळकृष्ण.

या समितीनें तयार केलेल्या यादीला संमति मिळविण्यासाठीं याच्या पुढील महाराष्ट्र साहित्यसंमेलनामध्यें ती यादी सादर करावी. डॉ. बाळकृष्ण या समितीचे चिटणीस म्हणून काम करतील.

(११) गोमांतकांत पोर्तुगीज व मराठी या उभय भाषांतील नियतकालिकांवर असलेल्या सामान्य निर्बंधाशिवाय मराठी नियतकालिकांना गव्हर्नरांची खास परवानगी मिळविण्याचा विशेष निर्बंध पाळावा लागतो. हा निर्बंध मराठी भाषेस अपमानास्पद व अडचणी उत्पन्न करणारा असल्यानें तो दूर करण्याची शिफारस गोवा सरकारनें पोर्तुगीज सरकारास करावी अशी या संमेलनाची गोव्याच्या गव्हर्नर जनरलना विनंती आहे. तसेंच आजच्या पोर्तुगीज सरकारनें गोमांतकांतील पोर्तुगीज प्राथमिक शिक्षणाच्या केलेल्या योजनेंत मराठी भाषेच्या शालेय शिक्षणास प्रतिबंधक अशी जीं कलमें आहेत तीं काढून टाकावीं व गतवर्षी कायदेमंडळांत पास झालेल्या ठरावानुसार सरकारी मराठी शाळांच्या सुधारणा करून नवीन मराठी शाळा उघडून आणि इतर रीतीनें प्रोत्साहन देऊन मराठी भाषेच्या प्रसारास व अभ्यासास सहाय्य करावें अशी गोंवें सरकारास विनंती आहे.

(१२) मुलांमुलींच्या शिक्षणास उपयोगी पडेल असें मराठी भाषेंतील वाङ्मय प्रसिद्ध करण्याकडे शिक्षणखातीं, शिक्षणसंस्था व साहित्यसंस्था यांनीं विशेष लक्ष द्यावें अशी संमेलनाची विनंती आहे.

(१३) मुंबई, नागपूर, उस्मानिया या विश्वविद्यालयाच्या प्रवेश परीक्षेपर्यंत इंग्रजी भाषेखेरीज सर्व विषयांची बोधभाषा (Medium of Instruction) मराठी असावी व प्रवेश परिक्षेनंतरच्या अभ्यासक्रमांत शक्य तोंवर तीच बोधभाषा असावी असें संमेलनाचें मत आहे.



अनुक्रमणिका

(१४) गतवर्षी ग्वाल्हेरच्या संमेलनांत इंदुरास होळकर व खिश्चन कॉलेजांत इंटरमी-जीएटला मराठीच्या शिक्षणाची व्यवस्था करण्याची विनंती करणारा ठराव पास झाला. सदर ठराव इंदूर महाराष्ट्र साहित्यसभेनें होळकर सरकारच्या निदर्शनास आणला. होळकर दरबारनें इंदूरच्या महाराष्ट्र साहित्यसभेच्या विनंतीस मान देऊन होळकर कॉलेजांत मराठीच्या शिक्षणाची सोय केली त्याबद्दल हें संमेलन दरबारचें अभिनंदन करीत आहे. इंदूर खिश्चन कॉलेजातहि मराठीच्या शिक्षणाची सोय करावी अशी त्या कॉलेजच्या अधिकाऱ्यांस विनंती आहे. त्याप्रमाणेंच ग्वाल्हेरसरकारलाहि हें संमेलन अशी विनंती करीत आहे कीं व्हिटोरिया कॉलेज ग्वाल्हेर, व माधव कॉलेज उज्जैन यांत मराठी शिक्षणाची सोय सत्वर करण्यांत यावी.

(१५) निरनिराळ्या प्रमुख भारतीय भाषांतील वाङ्मयाचा भिन्नभिन्न प्रांतांस सुलभतेनें आस्वाद घेतां यावा म्हणून सर्व हिंदी भाषांनीं देवनागरी लिपीचा स्वीकार करावा अशी शिफारस सर्व साहित्य परिषदांस हे संमेलन करीत आहे.

(१६) सर्व मराठी साहित्यसंस्थांची केंद्रसंस्था म्हणून महाराष्ट्र साहित्यपरिषदेस मान्यता देण्यांत यावी व महाराष्ट्राबाहेर महाराष्ट्र वाङ्मय व संस्कृति कायम ठेवण्याच्या दृष्टीनें ज्या अनेक संस्था अस्तित्वांत आल्या आहेत त्यांच्या अडचणी दूर करण्याकरितां त्या सर्व संस्था महाराष्ट्र साहित्य परिषदेस जोडल्या जाऊन त्यांस संघटित स्वरूप प्राप्त व्हावें असें या संमेलनाचें मत आहे.

(१७) १९३० सालीं आधुनिक मराठी रंगभूमीस पन्नास वर्षें पुरीं होतात. या पन्नास वर्षांचा मराठी रंगभूमीचा सांगोपांग व सचित्र इतिहास मराठी नाट्यवाङ्मय व मराठी रंग-भूमीच्या ज्युबिलीप्रसंगीं प्रसिद्ध करण्याचें काम महाराष्ट्र साहित्य परिषदेनें अंगावर घ्यावें व या कामास महाराष्ट्रांतील सर्व नाटक मंडळ्यांनीं सहाय्य करावें अशी या संमेलनाची विनंती आहे.

(१८) इतिहासाचार्य कै. विश्वनाथ काशिनाथ राजवाडे यांचा अपूर्व संग्रह सुरक्षित ठेवण्यासाठीं व यथावकाश प्रकाशित करण्यासाठीं धुळें येथें जें "राजवाडे-संशोधन मंदीर" व्हावयाचें आहे त्यास सर्व वाङ्मयभक्तांनीं मदत करावी अशी या संमेलनाची आग्रहाची शिफारस आहे.

(१९) आग्रा विश्वविद्यालयाकडून ज्या अर्थी बी ए साठीं मराठी विषय ठेवण्यांत आला आहे त्याअर्थी आतां इंदूर व ग्वाल्हेर येथील दरबारानीं स्थानिक कॉलेजांतून बी. ए. साठीं मराठी शिकविण्याची सोय करावी अशी हें संमेलन सदर दरबारांस विनंति करीत आहे.

(२०) ग्वाल्हेरच्या साहित्य संमेलनांत झालेल्या ठरावान्वयें आग्रा विश्वविद्यालयांत बी. ए. साठीं मराठी विषय ठेवण्यांत आला याबद्दल सदर विश्वविद्यालयाधिकाऱ्यांचें हें संमेलन आभार मानीत आहे.

(२१) महाराष्ट्र साहित्य परिषदेनें मराठी ग्रंथकारांच्या नोंदणीचें एक पुस्तक ठेवावें. त्यांत प्रत्येक ग्रंथकर्त्यांचें नांव, पत्ता, त्याचे ग्रंथ, चरित्र या विषयांची माहिती असावी. हें व परिषदेकडून होणारें पुस्तकपरीक्षणाचें काम सुलभ व्हावें म्हणून सर्व ग्रंथकार, प्रकाशक, व मुद्रक ह्यांनीं त्यांच्या ग्रंथांची एकएक प्रत परिषदेस पाठवावी अशी त्यांस आग्रहाची विनंति आहे.

(२२) शुद्धलेखनासंबंधीं आतांपर्यंत निरनिराळ्या विद्वानांनीं प्रदर्शित केलेले विचार लक्षांत घेऊन व यानंतरही अनेक विद्वानांचें सहाय्य घेऊन आणखी दोन महिन्यांनीं साहित्य-पात्रिकेंत या विषयींचा आपला निर्णय जाहीर करण्याकरतां खालील गृहस्थांचें मंडळ नेमण्यांत यावें.

(१) श्री. चिंतामणराव वैद्य (२) श्री. न. चिं. केळकर (३) श्रीयुत ना. दा. बनहट्टी (४) श्री. कृ. पा. कुलकर्णी, (५) श्री. बळवंत गणेश खापर्डे (६) श्री. ना. गो. चापेकर (७) श्री. रा. दा. देसाई.

(२३) सरकारजमा झालेल्या मराठी पुस्तकांतील वाङ्मयदृष्ट्या बहुमोल असलेल्या कांहीं निवडक पुस्तकांच्या पुनर्मुद्रणास सरकारी अनुज्ञा मिळावी याविषयीं संमेलनाच्या वतीनें मध्यप्रान्त व मुंबईसरकार यांस विनंती करण्यांत यावी. त्यांपैकीं कांहीं पुस्तकें:- (१) निबंधमालेंतील "सद्यःस्थिती" (२) मॅझिनीचें चरित्र (सावरकरकृत) (३) रामदासी बोवा (पांगारकरकृत) (४) ग्रंथमालेंत प्रसिद्ध झालेली "आचार्य परिषद" (५) धनुर्धारी यांचें पुस्तक "शूर अबला"

(२४) हल्लीं कर्नाटकांमध्यें कानडीमराठीचा जो वाद उत्पन्न झाला आहे तो सर्व दृष्टींनीं अत्यंत अनिष्ट असून शक्य तितक्या लवकर मिटविला जाणें हें उभयपक्षींहि अत्यंत जरूरीचें आहे असें या संमेलनाचें मत आहे. म्हणून त्या हेतूनें असें ठरविण्यांत येत आहे कीं:— (१) बेळगांव जिल्ह्यांतील महाराष्ट्रीयांनीं कानडी भाषेला या जिल्ह्यांतील प्रमुख भाषा या नात्यानें योग्य तो मान द्यावा. (२) त्याबरोबरच या जिल्ह्यांतील कर्नाटकीय लोकांनीहि मराठी ही महत्वाची भाषा या नात्यानें तिलाहि योग्य तो मान द्यावा. वर कलम (१) व (२) यांत नमूद केलेल्या तत्वांचें प्रतिपादन कर्नाटक साहित्य संमेलनानेंहि आपल्या ठरावाच्या द्वारानें करून कर्नाटक व महाराष्ट्र यांच्यामधील सलोखा कायम टिकवण्याला मदत करावी अशी या संमेलनाची इच्छा आहे.

(२५) महाराष्ट्र साहित्य संमेलनाचें पुढील अधिवेशन गोवें प्रांतांत भरवावें असें गोवें प्रांतांतील साहित्यभक्तांचें निमंत्रण आलें आहे तें स्वीकरावें अशी शिफारस हें संमेलन महाराष्ट्र साहित्य परिषदेस करीत आहे. तसेंच कोल्हापूर, धुळें, अंधेरी व मिरज यांजकडून आलेल्या आमंत्रणाबद्दल त्यांचे आभार मानीत आहे.

---

## मासिकें वगैरे

( १ ) **लोकमित्र**- एप्रिलच्या अंकांत श्री. कृष्णाजी हरी दीक्षित यांचा 'कानडी भाषा आणि तिचे कैवारी' हा माहितीनें भरलेला लेख आला आहे. बेळगाव संमेलनास कानडी लोकांनीं केलेला विरोध किती निरर्थक आहे याचें साधार विवेचन त्यांत केलें आहे. तसेंच मेच्या अंकांतहि श्री. दीक्षित यांनीं कानडी-मराठी-वाद ह्या लेखांत कानडी लोकांच्या मागण्यांची अयुक्तता साधार दाखविली आहे.
( २ ) **लोकशिक्षण**, ( ३ ) **भा. इ. सं. मंडळ त्रैमासिक**, (४) **सहविचार** जून १९२९
( ५ ) **मनमोहन** वर्ष १ अंक १ (संपादक, महादेव कृष्ण आभिषेकी, मु. मंगेशी, पोष्ट मार्दोळ-गोंवा)
( ६ ) **आर्य-स्त्री-प्रबोध-माला**, द्रौपदी भाग ३ रा (संपादिका- सौ. सरस्वतीबाई गाडगीळ, सांगली ) (७) **आत्मस्वरूप** वर्ष १ अंक १ पार्लें टिळकविद्यालयाचें द्वैमासिक.

'विश्वकद्रु' असें म्हणतात. त्या शब्दाच्या विश्वं कन्दति आह्वयते किंवा विगतं श्वकदनम् अस्य किंवा विश्वकं द्रवति अशा तीन व्युत्पत्ति क्षीरस्वामी (अमर २।१०।२३) देतो. 'विश्वकद्रु' हा शब्द विश्वकद्र ह्याचा कदाचित् अपभ्रंश असेल.

अनेकपर्व तद्धिताचें उदाहरण 'हैयंगवीन' हें होईल. 'तत्तु हैयंगवीनं यद् ह्योगोदोहोद्भवं घृतम् = 'काल काढलेल्या दुधापासून उत्पन्न झालेलें घृत.' असें अमरांत आहे ( २।९।५२ ) हा शब्द ह्यः आणि गो ह्या दोन पदांपासून झाला आहे. 'ईन' हा तद्धित प्रत्यय लावल्यानें ह्यः ह्याला हियं व गो ह्याला गु असे आदेश होतात व हि यांतील ईला वृद्धि होते. अशा रीतीनें हैयंगवीन असा शब्द बनतो. ह्यः याची व्युत्पत्ति यास्कानें १।६ व गो याची व्युत्पत्ति २।५ मध्यें दिली आहे.

**कल्याणवर्णरूपः कल्याणवर्णस्य इव अस्य रूपम्**

कल्याणवर्ण म्हणजे सुवर्ण. त्यासारखें ह्याचें रूप म्हणून ह्याला कल्याणवर्णरूप असें विशेषण लाविलें आहे.

बहुव्रीहि समास सोडवितांना यास्क यस्य ह्याबद्दल अस्य घालतो. या समासांत कल्याण + वर्ण + रूप अशीं तीन पदें आहेत.

**कल्याणं कमनीयं भवति**

कम् = प्रेम करणें. ज्याची आपण इच्छा करितों तें कल्याण. म्हणजे कल्याण शब्द कम् इच्छा करणें, प्रेम करणें ह्या धातूपासून झाला आहे. कल्याण व कमनीय ह्या दोन शब्दांमध्यें क, य व न ह्या अक्षरांचें सादृश्य आहे.

**वर्णः वृणोतेः**

'वृ' = पसंत करणें, आच्छादणें. ह्या धातूचें एक रूप वृणोति; त्यापासून वर्ण शब्द झाला आहे. कारण वर्ण शरीर झांकतो किंवा वर्ण आपणांस आवडतो.

**रूपं रोचतेः**

रूप हा शब्द 'रुच्' शोभणें ह्यापासून झाला आहे. यास्काच्या वेळीं 'रूप्' धातु नव्हता कीं काय हें समजत नाहीं. कदाचित् त्याच्या वेळीं 'शोभणें' ह्या अर्थी 'रूप्' धातु नसेल. अमरकोशांत कल्याणवर्ण ( सुवर्ण ) हा शब्द नाहीं. पाणिनीय कालीं तो होता कीं नव्हता हें सांगतां येत नाहीं.

**एवं तद्धितसमासान् निर्ब्रूयात्**

ह्या रीतीनें तद्धित व समास ह्यांची व्युत्पत्ति करावी.

**न एकपदानि निर्ब्रूयात्**

एकपदांचीं म्हणजे ज्यांचा संदर्भ माहीत नाहीं अशांची व्युत्पत्ति करूं नये. कारण अर्थ लक्षांत घेऊन व्युत्पत्ति करावी असा निरुक्तसिद्धांत आहे. संदर्भाप्रमाणें शब्दांचे निरनिराळे अर्थ होतात. तेव्हां कोणत्या अर्थी शब्द वापरला आहे हें समजल्याशिवाय व्युत्पत्ति कशी करितां येईल ?

**न अवैयाकरणाय**

ज्याला व्याकरण येत नाहीं त्याला

**न अनुपसन्नाय**

जो आपण होऊन ज्ञानप्राप्तीसाठीं गुरूकडे येत नाहीं त्याला

**अनिदंविदे वा**

इदं म्हणजे हें निरुक्तशास्त्र; ह्याची महती जो जाणत नाहीं त्याला शब्दांची व्युत्पत्ति सांगूं नये. ज्याला शब्दांची व्युत्पत्ति जाणावयाची असेल त्याला व्याकरण आलें पाहिजे, तो नम्र असला पाहिजे व त्याला निरुक्ताची महती कळली पाहिजे. असें निर्बंध घालण्याचें कारण

**नित्यं हि अविज्ञातुः विज्ञाने असूया**

अज्ञ जो मनुष्य असतो त्याला ज्ञानाविषयीं तिटकारा असतो किंवा तो ज्ञानाची ( ज्ञानी लोकांची ) हेटाळणी करतो.

**उपसन्नाय तु निर्ब्रूयात्**

पण जो नम्रपणें येईल त्याला हें शास्त्र अवश्य सांगावें.

**यः वा अलं विज्ञातुं स्यात्**

किंवा शास्त्र जाणण्याला जो समर्थ असेल त्याला, म्हणजे

**मेधाविने**

जो बुद्धिवान् असेल त्याला

**तपस्विने वा**

किंवा ज्यानें तप केलें आहे, ज्याचें मन त्याच्या ताब्यांत आहे अशाला.

'उपसन्नाय० तपस्विने वा' ह्याची कांहीं जरूर दिसत नाहीं. वर दिलेल्या निर्बंधांमध्यें त्यांचा अंतर्भाव होतो. ऐतरेय आरण्यकाच्या शेवटीं असे निर्बंध घातले आहेत.

## खंड ४ था

**विद्या ह वै ब्राह्मणमाजगाम**

असें म्हणतात ( ह वै ) कीं विद्या ब्राह्मणाकडे आली (आणि म्हणाली कीं)

**गोपाय मा शेवधिष्टेऽहमस्मि**

माझें रक्षण कर. मी तुझा ( ते ) निधि ( शेवधिः ) आहें.

**असूयकायानृजयेऽयताय**

जो ज्ञानाची असूया म्हणजे हेटाळणी करतो ( असूयकाय ), जो सरळ मार्गानें जात नाहीं ( अनृजवे ) व ज्याचीं इंद्रियें त्याच्या ताब्यांत नाहींत (अयताय) अशाला

**न मा ब्रूयाः**

मला सांगूं नकोस (म्हणजे अशा माणसाला विद्या देऊं नकोस).

**धीर्यवती तथा स्याम्**

तसें केल्यानें ( तथा ) (म्हणजे वाईट मनुष्याला विद्या न दिल्यानें) माझें वीर्य म्हणजे माझी महती कायम राहील.

**य आतृणत्त्यवितथेन कर्णावदुःखं कुर्वन्नमृतं संप्रयच्छन्**

अमृत देणारा जो गुरु दुःख दिल्याशिवाय ( अदुःखं कुर्वन् ) सत्यानें (अवितथेन ) कान टोंचतो

**तं मन्येत पितरं मातरं च**

त्यालाच पिता माता असें समजावें

**तस्मै न द्रुह्येत् कतमच्चनाह**

त्याचा कसलाहि प्रसंग आला तरी ( कतमत् चन अह ) द्रोह करूं नये.

**अध्यापिता ये गुरुं नाद्रियन्ते विप्रा वाचा मनसा कर्मणा वा**

गुरूनें पढविलें असतांनाहि जे ब्राह्मण वाचेनें, मनानें आणि क्रियेनें गुरूला आदर दाखवीत नाहींत

**यथैव ते न गुरोर्भोजनीयाः**

ते जसे गुरूला जवळ करावेसे ( भोजनीयाः ) वाटत नाहींत

**तथैव तान्न भुनक्ति श्रुतं तत्**

त्याप्रमाणेंच त्यांनीं जें गुरूपासून ज्ञान मिळविलें असेल तें त्यांच्याजवळ रहात नाहीं.

भोजनीयाः = भोजनार्हाः असा दुर्ग अर्थ करितो. म्हणजे गुरु त्यास पंक्तिपावन समजत नाहीं. 'भुनक्ति = पालयति = मिळविलेलें ज्ञान त्यांच्या उपयोगी पडत नाहीं. परंतु भुज् ह्याचा अर्थ दोन्ही ठिकाणीं एकच असला पाहिजे. तो अर्थ म्हणजे सेवणें. गुरु अशा शिष्यांना सेवीत नाहीं म्हणजे जवळ करीत नाहीं. ज्ञान अशा शिष्यांना सेवीत नाहीं म्हणजे त्यांच्या उपयोगी पडत नाहीं.

**यमेव विद्याः शुचिमप्रमत्तं मेधाविनं ब्रह्मचर्योपपन्नम्**

जो शुद्ध, प्रमाद न करणारा, बुद्धिमान् व ज्याच्यामध्यें कडकडीत ब्रह्मचर्य आहे असें तूं जाणतोस

**यस्ते न द्रुह्येत् कतमच्चनाह**

व जो कसलाहि प्रसंग आला तरी तुझा द्रोह करणार नाहीं

**तस्मै मा ब्रूया निधिपाय ब्रह्मन्॥ इति**

त्या निधिपाला म्हणजे वेदविद्या पालन करणाऱ्याला हे ब्राह्मणा ! तूं मला कथन कर म्हणजे दे.

**निधिः शेवधिः इति**

पहिल्या श्लोकांत जो ' शेवधिः ' शब्द आला आहे व निधिपाय याच्यांत जो निधि शब्द आहे त्याचा अर्थ एकच. 'शेवधिः निधिः' असें म्हणावयास पाहिजे.

परंतु अर्थ पहिल्याप्रथम व ज्या शब्दाचा अर्थ द्यावयाचा तो मागून ही पद्धत निरुक्तांत पुष्कळ वेळां आढळते.

खण्ड ५ वा

**अथातोऽनुक्रमिष्यामः**

ह्यानंतर नैघंटुक कांडांतील शब्दांच्या व्युत्पत्ति अनुक्रमानें देऊं

**गौः इति पृथिव्याः नामधेयम्**

गौ: हें पृथ्वीचें नांव आहे

**यत् दूरं गता भवति**

( पृथ्वीला 'गौ' म्हणण्याचें ) कारण ती दूर गेलेली आहे म्हणजे दूरवर पसरली आहे

**यच्च अस्यां भूतानि गच्छन्ति**

शिवाय तिच्यावर प्राणी जातात; प्राण्यांची हालचाल तिच्यावर होते.

तेव्हां 'गौ' शब्द 'गम्'धातूपासून झाला आहे.

**गाते र्वा**

किंवा तो शब्द गा = जाणें ह्यापासून झाला असेल.

**ओकारो नामकरणः**

धातु 'गम्' असो किंवा 'गा' असो, नाम बनविणारा 'ओ' प्रत्यय धातूला लागून 'गौ' शब्द बनला आहे. तो असा:— गम् + ओ = ग + ओ = गौ. येथें 'म्' चा लोप झाला आहे. गा + ओ = गौ.

**अथापि पशुनाम इह भवति एतस्मात् एव**

शिवाय 'गौ' शब्द एका जनावराचें नांव आहे तेंहि ह्याचमुळें. कारण तें जनावर इकडे तिकडे जातें व त्याच्या पाठीवर बसून लोक जातात. येथें 'इह' शब्द कां घातला हें समजत नाहीं. दुर्गाच्या पाठांत 'इह' शब्द 'भवति' नंतर होता व 'एतस्मादेव' हे शब्द नव्हते. तो 'इह' ह्याचा अर्थ 'तस्मात् एव धातुद्वयात्' असा करितो.

यास्कानें पृथिवीवाचक गौशब्दाचें उदाहरण द्यावयास पाहिजे होतें. तें त्यानें दिलें नाहीं ह्याचें कारण पृथिवीवाचक गौ शब्द त्याला वेदांत आढळला नाहीं. निघंटु यास्कानें रचिला नाहीं ह्या म्हणण्याला हा एक आधार आहे. तो ग्रंथ जर त्यानें रचिला असता तर पृथिवीवाचक शब्दांमध्यें त्यानें 'गौ' शब्दाचा अन्तर्भाव केला नसता.

**अथापि अस्यां ताद्धितेन कृत्स्नवत् निगमाः भवन्ति**

ताद्धितेन = ताद्धितप्रकारेण = तद्धितार्थे

शिवाय पशुवाचक जो 'गो' शब्द तो सगळा (कृत्स्नवत्) तद्धितार्थी (ताद्धितेन) वापरल्याचीं उदाहरणें वेदांत सांपडतात. 'गो' शब्दाचीं तद्धित रूपें 'गव्य' 'गोमय'

'गोमत्' वगैरे होतात. 'गव्य' ह्या अर्थी गोशब्द खालील उदाहरणांमध्यें आला आहे.

**गोभिः श्रीणीत मत्सरम् (ऋ. सं ९।४६।४)**

गाईच्या दुधांत (गोभिः) सोम (मत्सरम्) मिसळा (श्रीणीत)

**इति पयसः**

हें गो = दूध ह्याचें उदाहरण होय. येथें गो शब्द 'गव्य' ह्या अर्थी वापरला आहे.

**मत्सरः सोमः मन्दतेः तृप्तिकर्मणः**

सोमाला मत्सर म्हणण्याचें कारण सोम हा तृप्ति देतो. म्हणजे मत्सरशब्द 'मन्द्'= तृप्त करणें ह्यापासून झाला आहे. तो असाः—मत्सरः = मद् + सरः. मद्—मन्द्. सर हा नामकरण प्रत्यय आहे.

**मत्सरः इति लोभनाम**

'मत्सर' हा शब्द लौकिक भाषेंत लोभवाचक आहे. पण तसा अर्थ अमरकोशांत नाहीं. मत्सरः अन्यशुभद्वेषे (अमर ३।३।१७३) = मत्सराचा अर्थ दुसऱ्याच्या कल्याणाचा द्वेष. लोभ हा अर्थ यास्ककालीं होता.

**अभिमत्तः एनेन धनं भवति**

एनेन एतेन लोभेन धनम् अभि मत्तः भवति

लोभामुळें धनाविषयीं मनुष्य मत्त होतो. म्हणजे लोभवाची मत्सर शब्द मद् = माजणें ह्यापासून झाला आहे. एतेन ह्याच्या ऐवजीं एनेन शब्द घालण्याचें कारण लोभ शब्द आधीं आला आहे. त्याचें एनेन ह्यानें अनुकथन म्हणजे अनुवाद होतो.

**पयः पिबतेर्वा**

पयस् (दूध) हा शब्द पा पिब् धातूपासून झाला आहे. किंवा

**प्यायतेर्वा**

प्यै = लठ्ठ होणें ह्यापासून. कारण दूध प्यायल्यानें प्राण्याचें शरीर वाढतें. 'पयस्' शब्दानें 'क्षीर' शब्द सूचित होतो. त्याची व्युत्पत्ति

**क्षीरं क्षरतेः**

क्षीर शब्द क्षर् गळणें ह्यापासून झाला आहे. जनावराच्या कासेंतून दूध गळतें.

**घसेर्वा**

किंवा तो शब्द घस् = खाणें ह्यापासून झाला असेल. कारण प्राणी दूध खातात.

**ईरः नामकरणः**

घस् + ईर. ईर प्रत्ययामुळें घस् मधील उपांत्य 'अ' चा लोप होतो. घ्+स्=क्ष्. क्ष् +ईर = क्षीर. जसें

**उशीरम् इति यथा**

ईर ह्या प्रत्ययामुळें 'व' च्या ठिकाणीं संप्रसारणानें 'उ' येतो. उश् + ईर = उशीर. उटण्याची बायकांना इच्छा असते.

अंशुं दुहन्तो अध्यासते गवि । (ऋ. १०।९४।९)

सोम कुटणारे ग्रावे सोमाचें (अंशुं) दूध काढीत असतांना गाईवर (गवि) म्हणजे गोचर्मावर बसतात.

इति अधिषवणचर्मणः

येथें गो शब्दाचा अर्थ ज्याच्यावर सोमाचा रस काढणारे ग्रावे ठेवतात तें चामडें असा आहे. अधिषवण = सोमरस काढणें

अंशुः शम् अष्टमात्रः भवति

अंशुः = अ + म् + श् + श् + उः. उ चा अ करून ह्या अक्षरांची थोडीशी उलटापालट केल्यानें शम् + अश् असे अवयव बनतात. अष्ट हें 'अश' ह्याचें भूतभूतकाळीं विशेषण. खाल्याबरोबर ( अष्टः एव अष्टमात्रः ) सोम सुखकर ( शम् ) होतो. अथवा

अननाय शं भवति इति वा

अंशुः = अन् + शुः. अन् = अननाय. सोमरस अननाया म्हणजे श्वासोच्छ्वास करण्याला म्हणजे जगण्याला (शु=शं) सुखकर म्हणजे सोइस्कर होतो. आयुष्यवृद्धीला सोमरस हें साधन आहे.

चर्म चरतेः वा

अधिषवणचर्मणः याच्यामधील चर्म शब्द 'चर्' धातूपासून झाला आहे. कारण चामडें किंवा कातडें अंगभर चाललेलें म्हणजे पसरलेलें असतें. किंवा चामड्याचा जोडा घालून आपण चालतों. तेव्हां तें आपल्याबरोबर चालतें. चृ + मन् = चर्मन्. किंवा

उच्चृत्तं भवति इति वा

हें जनावराच्या अंगापासून कापलेलें असतें. चृत् = कापणें ह्यापासून चर्म शब्द झाला असेल. चृत् + मन् = चर्मन्. त् चा लोप होतो.

अथापि चर्म च श्लेष्मा च

आणखी गो शब्द चामडें व चरबी ह्या अर्थी वापरलेला आढळतो.

गोभिः संनद्धो असि वीळयस्व (ऋ. ६।४७।२६)

हे रथा ! तूं गाईंनीं म्हणजे गाईच्या चामड्यानें व चरबीनें सर्व बाजूंनीं बांधला गेला आहेस ( म्हणजे रथाला चरबी लाऊन चामडें चिकटविलें आहे ) तेव्हां तूं आतां बळकट हो ( म्हणजे वाटेनें मोडून पडूं नकोस )

इति रथस्तुतौ

अशी रथाची स्तुति म्हणजे रथाला विनवणी केली आहे.

अथापि स्नाव च श्लेष्मा च

खेरीज गोशब्द स्नायु व चरबी ह्या अर्थी वापरलेला आढळतो.

**गोभिः सनद्धा पतति प्रसूता (ऋ. ६।७५।११)**

बाण स्नायु व चरबी यांनीं बांधलेला म्हणजे ( वळकट केलेला ) धनुष्यानें सोडला असतां ( प्रसूता ) जोरानें जातो ( पतति = उडतो )

**इति इषुस्तुतौ**

अशी बाणाची स्तुति म्हणजे वर्णन केलें आहे. येथें 'इषु' शब्द स्त्रीलिंगी आहे.

**ज्या अपि गौः उच्यते**

धनुष्याची प्रत्यंचा ह्या अर्थींहि गोशब्द आढळतो. असा अर्थ असेल त्या वेळीं गो शब्दाची व्युत्पत्ति काय ?

**गव्या चेत् ताद्धितम्**

प्रत्यंचा जर गाईच्या चामड्याची किंवा स्नायूंची बनविलेली असेल तर गो शब्द तद्धितार्थी म्हणजे गव्यसारखा वापरला असेल. पण

**अथ चेत् न गव्या**

पण प्रत्यंचा जर गव्या म्हणजे गाईच्या चामडयाची किंवा स्नायूंची बनविलेली नसेल तर मग

**गमयति इषून् इति**

प्रत्यंचा बाण जावयाला लावते. म्हणजे धनुष्याची दोरी ओढल्यानें बाण फार जोरानें जातात. तेव्हां प्रत्यंचा ह्या अर्थी गो शब्द 'गम्' धातूपासून झाला आहे असें म्हटलें पाहिजे.

## खण्ड ६ वा

**वृक्षेवृक्षे नियता मीमयद्गौस्ततो वयः प्रपतान् पूरुषादः (ऋ. सं. १०।२७।२२)**

**वृक्षे वृक्षे धनुषि धनुषि**

वृक्ष याचा अर्थ धनुष्य. वृक्षे वृक्षे म्हणजे प्रत्येक धनुष्यावर.

**वृक्षः व्रश्चनात्**

वृक्ष शब्द 'व्रश्च्' = कापणें ह्यापासून झाला आहे. 'व्र' मधील 'र्' ला संप्रसारण झाल्यानें 'व्र' चा 'वृ' होतो 'श्च्' + ष = क् + ष = क्ष असा वृक्ष शब्द बनतो.

**वृत्वा क्षां तिष्ठतीति वा**

किंवा वृक्षः = वृ + क्षः = वृ + क्षां. पृथिवीला ( क्षां ) आच्छादून ( वृत्वा ) झाड उभें असतें. म्हणून झाडाला वृक्ष म्हणतात.

**क्षा क्षियतेः निवासकर्मणः**

पृथ्वीला क्षा म्हणण्याचें कारण तिच्यावर प्राणी राहतात. क्षि = वास करणें म्हणजे राहणें ह्या धातूपासून 'क्षा' शब्द झाला आहे. वृक्ष शब्दाची ही दुसरी

व्युत्पत्ति व क्षा शब्दाची व्युत्पत्ति ह्या महाराष्ट्रपाठांतच आढळतात. ह्याप्रमाणें यास्कानें न दिलेल्या व्युत्पत्ति वेळोवेळीं निरुक्तांत ढकलल्या गेल्या आहेत.

**नियता मीमयत् गौः शब्दं करोति**

धनुष्याला बांधलेली ( नियता ) दोरी ( गौः ) ओढल्यानें टणत्कार करिते ( मीमयत् ).

**मीमयतिः शब्दकर्मा**

मीमय् धातूचा अर्थ शब्द करणें.

**ततः वयः प्रपतन्ति पुरुषान् अदनाय**

प्रपतान् = प्रपतन्ति, पुरुषादः = पुरुषान् अदनाय.

नंतर ( ततः ) पक्षी ( वयः= गिधाडें ) मनुष्यांना ( पुरुषान् ) खाण्याकरितां ( अदनाय ) झडप घालतात ( प्रपतन्ति ).

**विः इति शकुनिनाम वेतेः गतिकर्मणः**

विः = पक्षी. पक्ष्याला 'वि' म्हणण्याचें कारण पक्षी जातो. म्हणजे 'वि' शब्द 'वी' जाणें ह्यापासून झालाआहे. लॅटिन मधील avis = पक्षी हा 'वि' सारखाच आहे.

**अथापि इषुनाम इह भवति एतस्मादेव**

आणखी हा शब्द इषुवाचक लौकिकभाषेंत ( इह ) असतो, तोहि ह्याच धातूपासून. हें वाक्य कोणत्या शब्दाला उद्देशून आहे हें समजत नाहीं. सर्व प्रकरण गो शब्दाविषयीं आहे. तेव्हां गो शब्दाचा ह्या ऋचेंत 'इषु' असा अर्थ होईल. तसा अर्थ असूनहि गो शब्दाची तीच व्युत्पत्तिः म्हणजे गम् धातूपासून. तेव्हां ऋचेचा अर्थ पुढीलप्रमाणें होईलः—

प्रत्येक धनुष्याला लावलेला बाण सोडल्याबरोबर घों घों करीत जातो. त्याबरोबर गिधाडासारखे पक्षी मृतदेह खाण्याकरितां झडप घालतात.

परंतु ह्या वाक्याच्या आधीं 'वि' शब्दाची व्युत्पत्ति दिली आहे. तेव्हां तत्संबंधानेंच हें वाक्य असेल. तसें असल्यास वयः = बाण असा अर्थ येथें होइल व तशा अर्थीहि बाणवाचक 'वि' शब्दाची तीच व्युत्पत्ति. म्हणजे बाणवाचक 'वि' शब्द, 'वी' = जाणें ह्यापासून निघाला आहे. दुर्ग ह्या वाक्याचा अर्थ देत नाहीं.त्यावरून तें त्याच्या पाठांत नव्हतें. ऋचेंतल्या वयः शब्दाचा अर्थ तो प्रथम पक्षी असा करतो व नंतर विकल्प म्हणून त्या शब्दाचे दुसरे दोन अर्थ देतो. ते असेः— पक्ष्यांना पंख असतात व बाणांना पंख लावतात. तेव्हां बाणांना 'वयः' म्हणजे पक्षी असें लक्षणेनें म्हटलें आहे. अथवा वयः याचा अर्थ बाण असाच होणें शक्य आहे. कारण तो शब्द वी = जाणें ह्यापासून निघाला आहे. बाण जातात तेव्हां ते प्रत्यक्षच 'वयः' होत.

यास्कानें पुरुषादः ह्याचा पुरुषान् अदनाय असा प्रयोजनवाची मुद्दाम अर्थ केला आहे. पक्षी झडप घालतात ती कशाकरितां ? मेलेलीं माणसें खाण्याकरितां. पण

## सूची

ह्या अंकासोबत मागील वर्षांतील विषयांची सूची पाठविली जात आहे. ती तयार केल्याबद्दल श्री. वि. म. कोल्हटकर यांचे आभार मानणें जरूर आहे.

## परिषदेची हानी

प्रसिद्ध मराठी ग्रंथकार बाळकृष्ण अनंत भिडे यांस ता. २ मे सन १९२९ रोजीं गिरगांव मुंबई येथें देवाज्ञा झाली हें कळविण्यास फार वाईट वाटतें. हे विवेकी लेखक होते. सत्यशोधन हेंच ध्येय पुढें ठेवून निर्विकार मनानें निर्दोष मार्दवतेनें लिहिणें हें त्यांस चांगलें साधलें होतें. साहित्यनिर्मितींत त्यांचे ग्रंथ प्रसिद्ध झालेच आहेत. ते आणखी जगले असते तर पत्रिकेला त्यांचा फार उपयोग झाला असता. हे सुशील, निगर्वी व व्यासंगी होते. मराठीचा त्यांस इतका अभिमान होता कीं इंग्रजीत पत्र लिहिलेलें त्यांस खपत नसे. त्यांच्या निधनानें परिषदेचें मोठें नुकसान झालें आहे.

प्रसिद्ध कवी दत्तात्रय अनंत आपटे उर्फ अनंत-तनय हेहि कालवश झाल्याचें कळविण्यास आम्हांस दुःख होत आहे. हे उत्तम कवी होते.

## संमेलनाचे ठराव

यंदाच्या संमेलनांत मंजूर झालेले ठराव सरकार विद्यापीठें वगैरेंकडे रीतसर पाठविण्यांत आले. कित्येकांकडून पोंच पावत्याहि आल्या.

---

## वर्गणीची पोंच. ( १९२८ )

(मागील अंकावरून पुढें चालू)

| | | | |
|---|---|---|---|
| श्री. नरसिंह चिंतामण केळकर. | ३–८ | श्री. सीताराम नरसिंह घाटे | ३–८ |
| रा. ब. दामोदर गणेश पाध्ये | ३–० | श्री. गोपीनाथ विनायक ओक | ३–८ |
| सरदार खंडेराव चिंतामण मेहेंदळे | ३–८ | श्री. नारायण विश्वनाथ मंडलिक | ४–८ |
| नगरवाचन मंदीर, पुणें. | ४–८ | फर्ग्यूसन कॉलेज–लायब्ररी | ४–० |
| गणेश हरी केळकर. | ३–८ | न्यू पूना कॉलेज–लायब्ररी प्र. २ | ७–८ |
| श्री वामन दामोदर तळवळकर | ३–० | | |

सूचनाः—

१९२८ ची वर्गणी अद्यापि ज्यांच्याकडून येणें आहे त्यांनीं कृपा करून लवकरच पाठवावी.

चालू सालाची वर्गणी साडेतीन रुपये सर्वांनीं लौकर पाठवावी अशी विनंती आहे. ज्यांच्याकडून येणार नाहीं त्यांच्याकडे पुढील अंकाची व्ही. पी. केली जाईल.

ना. गो. चापेकर यांच्यामार्फत झालेल्या वसुलीचा व खर्चाचा हिशेब.

| जमा | | खर्च | |
|---|---|---|---|
| | एप्रील | | एप्रील |
| ७९–८–० | वर्गणी | १६–१५ | टपाल खर्च |
| | मे | | मे |
| २६७–८ | ,, | ५– ७–६ | |
| | जून | | जून |
| ३७–३ | ,, | ५– ९–० | |
| ३८४–३ | | २७–१५–६ | |

वसूल झालेली वर्गणी खजीनदाराकडे भरली

मुंबईस चिटणीसांच्या मार्फत झालेल्या जमाखर्चाचा तपशील

एप्रील

| जमा | | खर्च | |
|---|---|---|---|
| ३१ | सभासदांकडून वर्गणी | ३-- ६--० | टपालखर्च |
| ५ | गोमांतक साहित्यसेवा मंडळाकडून, संस्था जोडून घेण्यासंबंधीं | ५- | मुंबईची वर्गणी गोळा करणाऱ्या शिपायास मुशाहिरा. |
| | | ०- ८-० | टाइपिंगचा खर्च |
| | | १-१३-० | पत्रिकेचे अंक पुण्याहून आले त्याचें रेल्वे भाडे. |
| ३६ | | १०-११ | |

मे १९२९

| | | | |
|---|---|---|---|
| १७ | सभासदांकडून वर्गणी | ११-११ | टपालखर्च |
| १ | किरकोळ अंक विक्री | १० | किरकोळ छपाई [ 'नवाकाळ' छापखान्याच्या बिलापैकीं |
| | | ०--११--० | पहिल्या अंकाच्या १०० प्रति पुण्यास बांधविण्यासाठीं पाठविल्या त्याचें रेल्वे भाडें |
| १८ | | २३--९-० | |

जून १९२९

| | |
|---|---|
| ११ | तिकिटें विकत घेतलीं १ आणावालीं |
| १० | किरकोळ छपाई [ 'नवाकाळ' छापखान्याच्या बिलापैकीं ] |
| ५० | कारकुनाचा पगार माहे ५ जानेवारी ते मे |
| १० | वर्गणी वसूल करणाऱ्या शिपायाचा दोन महिन्यांचा पगार |
| ८१ | |

पुणें येथें आर्यसंस्कृति मुद्रणालय, चिमणबाग, टिळकरोड येथें वासुदेव गोपाळ परांजपे यांनीं छापिलें व मुंबई येथें महाराष्ट्र-साहित्य-परिषदेच्या कार्यालयांत (भाई जीवनजीची गल्ली, मुंबई नं. २) परिषदेकरितां रा. ना. गो. चापेकर यांनीं प्रसिद्ध केलें.